ॐ

# अर्वाचीन मराठी गद्याची पूर्वपीठिका

( इ. स. १८०० – १८७४ )

प्रभू तुम्हीं महेशाचिया मूर्ती ।
आणि मी दुबला अर्चितसें भक्ति ।
म्हणौनि बोलु जर्‍ही गंगावती ।
तर्‍ही स्वीकराल ॥

(भावार्थदीपिका अ. ९, ओं. १४.)

लेखक
गंगाधर बाळकृष्ण सरदार, एम्. ए.



१९३७.

आवृत्ति १ ली

प्रकाशक—
गंगाधर
बाळकृष्ण
सरदार,
$\frac{१९९}{१०}$, सदाशिव,
पुणें २.

मुद्रक—
भगवान
पंढरिनाथ
सोमण,
'मॉडर्न
प्रिंटिंग
प्रेस',
१९५-अ, सदाशिव,
पुणें २.

किंमत

रु. ३

ॐ

॥ पितृदेवो भव ॥

ज्यांच्या कृपाछत्राखालीं
सरस्वतीदेवीची निश्चिंतपणें उपासना करण्याची
मला संधि मिळत आहे त्या



# परमपूज्य पितृचरणीं
## सादर समर्पण

—गंगाधर.

# प्रस्तावना

फोडिले भांडार धन्याचा हा माल।
मी तंव हमाल भारवाही ॥
—तुकाराम

‘ अर्वाचीन मराठी गद्याची पूर्वपीठिका ’ हा ग्रंथ वाचकांच्या हातीं सादर करतांना मला अत्यंत समाधान वाटत आहे. मराठी गद्य वाङ्मयाच्या बाल्यावस्थेत ज्या अनेक व्यक्तींनीं त्याचें परिश्रमपूर्वक संवर्धन केलें, त्यांची स्मृति महाराष्ट्रीयांच्या अंतःकरणांत निरंतर जागृत ठेवावी या भावनेनें मी हा ग्रंथ लिहिण्यास प्रवृत्त झालों. एकोणिसाव्या शतकांतील पहिल्या पाऊणशें वर्षांत प्रसिद्ध झालेल्या मराठी गद्य ग्रंथांचें विषयवार विवेचन करण्याचा मी या पुस्तकांत प्रयत्न केला आहे. हे ग्रंथ दिवसानुदिवस दुर्मिळ होत चालले आहेत आणि त्यासंबंधीं जी थोडीबहुत माहिती आज उपलब्ध होण्याचा संभव आहे तीहि पांचपंचवीस वर्षांनंतर मिळणें कठीण जाईल, असें वाटल्या-वरून मी हें काम प्रथम हातीं घेतलें. दोनतीन वर्षांच्या परिश्रमानें संपादिलेली माहिती सुव्यवस्थित रीतीनें लोकांसमोर मांडावी एवढ्याच उद्देशानें हा ग्रंथ लिहिला आहे. तो उद्देश कितपत सफळ झाला आहे याचा निर्णय वाचकांवर सोंपविणेंच इष्ट आहे.

माझे मित्र श्री. शंकर गणेश दाते यांनीं मला प्रस्तुत ग्रंथ लिहिण्याच्या कामीं निरपेक्ष बुद्धीनें साह्य केलें याबद्दल मी त्यांचा अत्यंत ऋणी आहे. त्यांचा अमूल्य ग्रंथसंग्रह पाहूनच मला हें पुस्तक लिहिण्याची इच्छा झाली. त्यांनीं आपल्या संग्रहांतील ग्रंथांचा व ‘ मराठी ग्रंथ-सूचि ’ या पुस्तकासाठीं

मिळविलेल्या माहितीचा मला भरपूर उपयोग करू दिल्यामुळे माझे बरेच श्रम वाचले.

हा ग्रंथ लिहिताना मला ज्यांच्या पुस्तकांचा व लेखांचा आधार घ्यावा लागला त्या पुस्तकांचा, लेखांचा व मिळेल तेथे ग्रंथकर्त्यांच्या नांवाचा उल्लेख टीपांतून केलेला आहे. त्या ज्ञात व अज्ञात लेखकांचा मी अत्यंत ऋणी आहे.

यांशिवाय पुणें मराठी ग्रंथालय, मुंबई मराठी ग्रंथालय, ठाणे मराठी ग्रंथालय, भा. इ. सं. मंडळाचा ग्रंथसंग्रह, फर्ग्युसन कॉलेजमधील मंडलीक लायब्ररी या ग्रंथालयांचाहि मला पुष्कळ फायदा झाला. वरील संस्थांच्या चिटणीसांनी मला माझ्या सोयीप्रमाणे त्यांतील ग्रंथांचा उपयोग करून दिला याबद्दल मी त्यांचा अत्यंत आभारी आहे. तसेंच 'केसरी' व 'मराठा' पत्रांचे सहसंपादक श्री. मा. प. सोमण, एम्. ए., श्री. चिं. ग. कर्वे, श्री. पु. म. जुवळे, श्री. एम्. जी. नाडकर्णी, डॉ. ग. त्र्य. कारखानीस, एल्. सी. पी. एस्., वा. गो. गोखले, यांनीहि मला स्नेहभावानें जरूर तें साह्य केलें याबद्दल मी त्यांचे आभार मानणें अवश्य आहे.

'मॉडर्न प्रिंटिंग प्रेस' चे व्यवस्थापक श्री. भ. प. सोमण यांनी छपाईचें काम परिश्रमपूर्वक थोड्या अवधींत, शुद्ध व सुबक रीतीनें करून दिल्याबद्दल मी त्यांचा आभारी आहे.

विजयादशमी शके १८५९.
पुणे शहर,

गंगाधर बाळकृष्ण सरदार.

# अनुक्रमणिका

# संक्षेपचिन्हांचा खुलासा

| | |
|---|---|
| ग्रां. कॅ. | ग्रांट कॅटलॉग |
| ब्रि. म्यु. | ब्रिटिश म्युझियममधील लायब्ररीचा कॅटलॉग |
| इं. ऑ. | इंडिया ऑफिसमधील लायब्ररीचा कॅटलॉग |
| म. वा. | महाराष्ट्रीय वाङ्मयसूचि |
| वि. ज्ञा. वि. | विविधज्ञानविस्तार |

# शुद्धिपत्र

## नजरचुकीमुळें राहून गेलेल्या सनांच्या चुकीची दुरुस्ती

| पृष्ठ | ओळ | चूक | दुरुस्त |
|---|---|---|---|
| ४७ | २३ | १८१४ | १८१५ |
| ५६ | ९ | १८५४ | १८५५ |
| ५९ | १९ | १७७१ | १८७१ |
| ६० | ३ | १८६८ | १८५८ |
| ८३ | १७ | १८५९ | १८५१ |
| १२७ | ५ | १८६१ | १८७१ |
| १३६ | १४ | १८६२ | १८५८ |
| १३९ | १३ | १८६० | १८६२ |
| १५५ | ४ | १८२७ | १८५७ |
| १९८ | १४ | १८५० | १८५७ |
| २३० | १७ | १८७८ | १८६८ |
| २४२ | १६ | १८७४ | १८७३ |
| ३०३ | ११ | १८५ | १८५२ |

जून १९३८ अखेर प्रसिद्ध होणार!

डयूइच्या जगप्रसिद्ध दशांश
पद्धतीनें वर्गीकृत केलेली

# मराठी ग्रंथ-सूचि

[ १८०० – १९३६ ]

संपादक

शंकर गणेश दाते

सुपर रॉयल ] [ पृष्ठें १२००

किं. २० रुपये

# १ सामान्य निरूपण

## १

**प्राचीन गद्याचें सामान्य स्वरूप.**

सहाव्या शतकाच्या आरंभापासून मराठी भाषा प्रचारांत येऊ लागली. विचारप्रदर्शनाचे प्रभावी साधन म्हणून तिच्या अगीं पुरेशी पात्रता येण्यास मध्यंतरी दोनतीनशें वर्षे तरी गेली असली पाहिजेत. त्यानंतरच्या काळांत मराठी भाषेमध्ये निर्माण झालेलें वाङ्मय प्रायः पद्यमय आहे. ग्रहज्योतिष, फलज्योतिष, वैद्यक इत्यादि विषयांवरील लहान लहान चोपडीं, महानुभाव पंथांतील लेखकांचे लीलाचरित्रादि धर्म–ग्रंथ, लहान मुलांच्या उपयोगासाठीं पौराणिक कथांचे सारांश, पेशवाईच्या उत्तरार्धांत लिहिलेल्या पांच पंचवीस ऐतिहासिक बखरी, आणि महाराष्ट्रीय मुत्सद्यांचा खासगी व राजकीय पत्रव्यवहार एवढेंच काय ते आज उपलब्ध असलेलें प्राचीन मराठी गद्य होय. या काळांतील पद्यवाङ्मयाच्या मानानें हें गद्य अगदीं संकुचित स्वरूपाचें आहे. शिवाय मुद्रणकलेची माहिती नसल्यामुळे त्याचा फारसा प्रसार झाला असणेंहि संभवत नाहीं. महानुभावीय ग्रंथाची भाषासरणी साधी, सुटसुटीत व प्रसादपूर्ण आहे. परंतु ते सांकेतिक लिपींत लिहिले गेल्यामुळें मराठी गद्याच्या वाढीला त्यांचा प्रत्यक्ष असा कांहीं उपयोग झाला

नाहीं. मराठेशाहींतील कारकुनी बाण्याचे लेखक आपल्या मनांतील अभिप्राय स्पष्ट व जोरदार शब्दांत परिणामकारक रीतीने व्यक्त करूं शकत. मराठयांच्या अमदानींतील असंख्य घडामोडींच्या प्रसंगी लिहिलेल्या त्यांच्या लिखाणांत उत्कृष्ट मराठी गद्याचे मासलेहि इतस्ततः विखुरलेले आढळतात. तरीपण वाङ्मयाच्या दृष्टीने या हजार वर्षांच्या काळांतील प्रतिभासंपन्न कविमालिके-प्रमाणे महाराष्ट्रांत गद्यलेखकांची अविच्छिन्न परंपरा निर्माण होऊ शकली नाहीं हें उघड आहे. पेशवाईच्या उत्तरार्धांत मराठी गद्य व्यवहाराची मर्यादा ओलांडून वाङ्मयाच्या क्षेत्रांत वावरूं लागले होतें. पण मुद्रणकलेसारख्या वाङ्मय-प्रसाराच्या साधनाची अनुकूलता नसल्यामुळें त्याचे पाऊल मंदगती-नेंच पुढें पडत होतें. प्राचीन मराठी वाङ्मयाचे वैभव पद्यांत आहे, गद्यात नाहीं. अर्वाचीन मराठी गद्याचा उदय एकोणिसाव्या शतकाच्या आरंभीं झाला. त्यावेळच्या लोकांना आज उपलब्ध झालेल्या प्राचीन गद्याची मुळींच माहिती नव्हती असें म्हटलें तरी चालेल. ह्यामुळें अर्वाचीन गद्याची उभारणी करतांना त्यांना पुन्हां नवीन पाया घालावा लागला. प्राचीन गद्याचा आधार न मिळाल्यामुळे फार परिश्रम करूनहि त्यांचे सुरवातीचे लिखाण अगदीं निकृष्ट प्रतीचें उतरलें. त्याचा सविस्तर वृत्तांत यथाक्रम येईलच. अर्वाचीन गद्याच्या घटनेंत प्राचीन गद्यवाङ्मयाचा प्रत्यक्ष संबंध फार थोडा आहे एवढेंच या ठिकाणीं दाखवावयाचें आहे.

---

# २

## ( इ. स. १८००—१८२२ )

**मराठी मुद्रण कलेचा प्रारंभ श्रीरामपुर मिशन**

अर्वाचीन मराठी गद्यवाङ्मयाच्या पूर्वपीठिकेचा विचार करताना हिंदुस्थानांतील मुद्रणकलेचा इतिहास लक्षात घेणे अवश्य आहे. गेल्या सव्वाशे वर्षांच्या काळांत पद्यात्मक लेखनाची प्रथा मागे पडून गद्य रचनेच्या प्रवृत्तीला जोर चढण्याचे मुख्य कारण म्हणजे मुद्रणकलेचा प्रसार हे होय. एतद्देशीय भाषात ग्रंथ छापण्याची कल्पना प्रथमतः मिशनरी लोकास आली. हिंदी, बंगाली, मराठी, तामिळी, तेलगू इत्यादि निरनिराळ्या भाषातून खिस्ती धर्मग्रथाची भाषातरें प्रसिद्ध करण्यासाठीं वंगदेशातील ' बॅप्टिस्ट मिशन ' या खिस्ती धर्मप्रसारक मडळीनें श्रीरामपुर येथें इ. स. १८०० त आपला स्वतःचा छापखाना काढिला, व प्रांतोप्रांतींचें पंडित बोलावून त्यांच्याकडून हिंदुस्थानातील प्रत्येक भाषेंत बायबलाचें भाषातर करविण्याचा उपक्रम केला. या धर्मप्रसारक मडळीचे नेतृत्त्व डॉ. विल्यम केरी या महापंडिताकडे होतें. एतद्देशीय पंडिताच्या सहाय्यानें त्यांनीं हिंदुस्थानातील अनेक भाषांचे परिश्रमपूर्वक अध्ययन करून, चाळीस भाषात बायबलाचीं भाषांतरे प्रसिद्ध केलीं व श्रीरामपुर मिशनचा संकल्प सिद्धीस नेला. ह्या प्रचंड योजनेतूनच अर्वाचीन मराठी गद्यवाङ्मयाचा प्रवाह उगम पावला. डॉ. केरी यानी इ. स. १८०५ सालीं इंग्रजींत लिहिलेले ' मराठी भाषेचें व्याकरण ' व ' सेंट मॅथ्यू ' हीं दोन पुस्तके प्रसिद्ध करून मराठी मुद्रणकलेचा पाया घातला.

**डॉ. विल्यम केरी**

डॉ. केरी यांचा जन्म इ. स. १७६१ त इंग्लंडमधील पालर्स्परी या लहानशा खेड्यात झाला. याचे वडील ह्या खेड्यांतील कारकून व शिक्षक होते. लहानपणापासून केरीला शास्त्रीय व ऐतिहासिक पुस्तके वाचण्याची आवड होती. बालवयांतहि जलपर्यटनाच्या कल्पनेनें त्याला आनंद होई. घरच्या गरिबीमुळें वयाच्या चवदाव्या वर्षी केरी यांनी जोडे शिवण्याचा धंदा पत्करला. पोटासाठीं दिवसभर काबाडकष्ट करूनहि त्यांनीं आपला विद्याव्यासंग अखंड चालूं ठेवला होता. याच सुमारास त्यांनीं लॅटिन, डच, हिब्रू, ग्रीक, फ्रेंच इत्यादि भाषाचें ज्ञान संपादन केलें व खिस्ती धर्मग्रंथांचा मननपूर्वक अभ्यास केला. इ. स. १७९२ त केरी यांच्या धर्ममंदिरातील उपदेशानंतर विधर्मी लोकांस पवित्र शास्त्राचा उपदेश करण्याकरिता 'बॅप्टिस्ट सोसायटी' ( The Baptist Society for Propagating the Gospel Among the Heathen ) या नांवाची संस्था स्थापन झाली व तिच्या विद्यमाने ईस्ट इंडिया कंपनीचे शिप-सर्जन डॉ. थॉमस व मि. केरी हे इ. स. १७९३ त शुभवर्तमानाचा प्रसार करण्यासाठीं हिंदुस्थानांत दाखल झाले. जहाजांत असतांनाच डॉ. थॉमस यांच्या सहाय्याने केरी यांनी बंगाली भाषेचा अभ्यास केला. हिंदुस्थानांत आल्यानंतर हे बंगालमध्यें मदनाबत्ती येथें निळीची लागवड करणारे शेतकरी म्हणून राहिले. त्यानीं आपला मिशनरी पेशा उघड केला असता तर त्यांस कंपनी सरकारने लागलीच हद्दपार केले असते. पांच सहा वर्षांनंतर केरी यांस निळीचा कारखाना सोडावा लागला. पुढें काय करावे याचा विचार करीत असतांनाच त्याना मि. मार्शमन, वार्ड व इतर काहीं मिशनरी हिंदुस्थानात आल्याची आनंददायक बातमी समजली. ब्रिटिश मुलखांत तर धर्मप्रचाराच्या कार्याला मनाई होती. यामुळें त्यांनीं डॅनिश सत्तेखालीं असलेल्या श्रीरामपुर शहरी आपलें ठाणे दिले. श्रीरामपुर

येथील गव्हर्नर कर्नल बाय यांची त्याना पूर्ण सहानुभूति व पाठिंबा मिळा-ल्यामुळें त्यांचे कार्य पुष्कळच सुकर झाले. इ. स. १७९८ त त्यांनी एक जुना लांकडी छापखाना व बंगाली टाईप विकत घेतले आणि सेट मॅथ्यूचे शुभवर्तमान छापून प्रसिद्ध केले.

**फोर्ट विल्यम कॉलेज**

इ. स. १८०० त लॉर्ड वेलस्ली यानीं हिंदुस्थानातील सनदी नोकरास शिक्षण देण्यासाठी कलकत्ता येथे 'कॉलेज ऑफ फोर्ट विल्यम' या नावाचे महाविद्यालय स्थापिलें. त्यांत केरी यास संस्कृत व बंगाली भाषांचे अध्यापक नेमले होते. या विद्या-लयांत आरबी, फारशी, संस्कृत, बंगाली, हिंदी, तेलगू इत्यादि अनेक पौर्वात्य भाषा शिकविण्याची व्यवस्था करण्यांत आली होती.

> "In that institution more than fifty of the most eminent scholars of the East were collected together, and it was in this association that he (Dr. Carey) was enabled to discover the genius of Oriental philology and the true principles of translation "$

इ. स. १८०३ त वसईचा तह होऊन मराठ्याचे व इंग्रजाचे राजकीय संबंध जास्त दृढ झाले. यामुळें फोर्ट विल्यम कॉलेजांतील शिक्षणक्रमात मराठी भाषेचाहि अंतर्भाव होऊन शिक्षकाच्या जागी डॉ. केरी याचीच नेमणूक झाली.

> "The political relations that arose between the British Government and the Mahratta States, about the date of the institution of the College of Fort-

$**John Clark Marshman**—*The History of Serampore mission Vol. 1 P. 180.*

William, recommended the introduction of the study of the Mahratta tongue, and to Dr. Carey was assigned the office of teaching it. In this, as in the other dialects, elementary books were wanting, and Dr. Carey to use his own expressions, 'thought it his duty to do the utmost in his power towards facilitating its acquisition by attempting a grammar.'" †

मराठी भाषेचा पहिला वर्ग इ. स. १८०४ त सुरू झाला. ता. ९ फेब्रुवारी इ. स. १८०५ रोजीं कॉलेजचा चवथा बक्षीससमारंभ झाला, त्यावेळीं मराठी भाषेच्या परीक्षेत उत्तीर्ण झालेला पहिला विद्यार्थी मि. ट्रावर यास एक सुवर्णपदक व १००० रुपये बक्षीस देण्यांत आले.

**पंडित वैजनाथ शर्मा**

यापूर्वीच श्रीरामपुर येथील मिशनऱ्यांचे मराठी भाषेकडे लक्ष गेलें होतें. ७ सप्टेंबर १८०३ च्या पत्रांत डॉ. केरी म्हणतात.—

" We have also some thoughts of the Mahrattas. A Mahratta Pundit, whom we have retained, has made a beginning of some small portions of the scripture in that language, and the Devnagur letter will answer for that tongue, and the Hindustani as well as the Sanskrit " ‡

या पत्रांत ज्याचा उल्लेख आला आहे,ते महाराष्ट्रीय पंडित वैजनाथ शर्मा हे होत. यांच्याच साह्याने डॉ. केरी यांनीं पंचतंत्र-हितोपदेशादि मराठी गद्यग्रंथ

† **E. Carey**—*Memoirs of W. Carey—P. 564.*
‡ *Memoirs of W. Carey. P 425*

प्रसिद्ध केले. पंडित वैजनाथ हे कलकत्ता येथील नागपुरकर भोसल्यांचे वकील वेणीरामपंत यांचे आश्रित होते. हे मोठे संस्कृतज्ञ असून महाराष्ट्र भाषेंत निष्णात होते. डॉ. केरी यांचे सहाध्यापक म्हणून यांनीं फोर्ट विल्यम कॉलेजांत काम केले. याच्या हाताखालीं कित्येक युरोपियन गृहस्थ मराठी भाषेत प्रवीण होऊन हिंदुस्थानांत प्रसिद्धीस आले. त्यापैकीं नागपूरचे रेसिडेंट सर रिचर्ड जेन्किन्स हे एक होत. बायबलाच्या मराठी भाषांतराची तरफदारी करतांना श्रीरामपुर मिशनच्या इतिहासांत पंडित वैजनाथ यांच्या भाषाशास्त्राच्या ज्ञानाबद्दल खालील उल्लेख आढळतो.

> " But the Mahratta version was more likely to be free from such inaccuracies than several others. It was executed under the eye of the Mahratta Pundit attached to the College of Fort William, who had been selected for the office, amid many competitors, for his superior attainments in Oriental philology"*

अर्वाचीन मराठी गद्यरचनेच्या ह्या आद्यप्रवर्तकाची यापेक्षा जास्त माहिती मिळूं नये हे आपलें दुर्दैव होय.

**मराठी ग्रंथ-प्रकाशन**

श्रीरामपुर येथे इ. स. १८०५ त सेंटमॅथ्यू व मराठी भाषेचें व्याकरण (Grammar of the Mahratta Language to which are added—Dialogues On Familiar Subjects) हीं दोन पुस्तकें प्रसिद्ध झालीं. हींच मराठी भाषेंतील पहिलीं छापील पुस्तके होत. हीं देवनागरी लिपींत छापलीं आहेत. यापैकीं सेंट मॅथ्यूची एक प्रत फोर्ट विल्यम कॉलेजच्या अधिकाऱ्यांनीं महा-

---

**History of Serampore mission Vol II P. 445*

राजा दौलतराव शिंदे याच्याकडे ब्रिटिश रेसिडेंटमार्फत पाठविली होती. मराठी भाषेचे व्याकरण हे डॉ. केरी यांनीं इग्रजींत लिहिले होते. स्टिफेन्स यानीं लिहिलेल्या मराठी व्याकरणाची त्यांना माहिती होती, परंतु त्यावेळी ते हिंदुस्थानांत उपलब्ध नसल्यामुळे या व्याकरणाची रचना डॉ. केरी यांना स्वतंत्रपणे करावी लागली. यानतर इ. स. १८१० त त्यांनी आपला मराठी-इंग्रजी कोश प्रसिद्ध केला. हा मोडी लिपींत छापला आहे. यांत सुमारे दहा हजार मराठी शब्दांचा समावेश केला आहे. या कोशाच्या इंग्रजी प्रस्तावनेंत डॉ. केरी यांनी मराठी भाषेच्या अभ्यासाचे महत्त्व निवेदन केले आहे. तसेंच ग्रथाच्या अपूर्णतेची जाणीव व्यक्त करून शेवटी पंडित विद्यानाथ यांच्या साह्याचा निर्देश केला आहे.

श्रीरामपुर मिशनच्या विद्यमाने डॉ. केरी व पंडित वैजनाथ यांनी प्रसिद्ध केलेलीं पुस्तकें:—

१ सेंट मॅथ्यू (The Gospel of St. Matthew) पृ. १०८. इ. स. १८०५

२ मराठी भाषेचे व्याकरण (Grammar of The Mahratta Language to which are added Dialogues on Familiar Subjects) इ. स. १८०५

३ बायबल पांच भाग इ. स. १८०७--२१

४ मराठी-इंग्रजी कोश इ. स. १८१० पृ. ६५२

५ मंगळसमाचार (New Testament) इ. स. १८११

६ सिंहासनबत्तीसी इ. स. १८१४ पृ. १८३

७ पंचतंत्र इ. स. १८१५ पृ. २४९

| | | | |
|---|---|---|---|
| ८ | हितोपदेश | इ. स. १८१५ | पृ. २४८ |
| ९ | राजा प्रतापादित्याचे चरित्र | इ. स. १८१६ | पृ. १२८ |
| १० | रघूजी भोसल्याची वंशावळी | इ. स. १८१६ | पृ. १०३ |
| ११ | मराठी भाषेतील अस्सल पत्रसंग्रह | इ. स. १८१६ | |
| १२ | न्यू टेस्टॅमेंट ( कोंकणी ) | इ. स. १८१८ | पृ. ७०६ |

याप्रमाणे डॉ. केरी व पंडित वैजनाथ यांनी अर्वाचीन मराठी गद्य-वाङ्मयाचा पाया घातला. यांतील बहुतेक पुस्तके बंगाली भाषेत प्रथम प्रसिद्ध झाली होती. याची भाषा आपल्या रोजच्या व्यवहारांतील भाषे-प्रमाणे साधी व सुटसुटीत आहे. व्याकरणाच्या दृष्टीने तिच्यांत पुष्कळ दोष आहेत. सिंहासनबत्तीसीतील खालील गोष्टीवरून श्रीरामपुर येथें प्रसिद्ध झालेल्या ग्रंथातील भाषेची कल्पना येईल.

> " अवंती पुरीत् राजा विक्रमादीत्य साम्राज्य करीत् असे. यके दीवसी राज्यानें सेवकास आज्ञा केली तुम्ही कोणते देशाची कशी चरीत्र समजून या. चाकर राजाज्ञा पावून अवघे देशांत् भ्रमण करून् काश्मीर देशांत् पावलेत्. त्या देशांत धनवान् यके मनुष्याने मोट यक तळे केल आहे परंतु त्यांत पाणी नसे. तदनंतर यके दिवसी आकाशवाणी झाली उत्तम पुरुष कोण्ही जर आपल शरीर बळी दे तर या तळ्यांत् पाणी होईल् नाही तर होणार नाही. हे आकाशवाणी आयकून् त्या धनी मनुष्याने दहा भार सोन्याचा यक पुरुष करून त्या तळ्याचे जवळ ठेवला. त्या स्थानी पाथरावर लीहून ठेवल जो बळीचेसाठी आपल शरीर देईल हा स्वर्ण पुरुष त्यास् देईन्. अन्य देशाहून जे माणसं येतेत ते आपल शरीर बळी द्यायास स्वीकार करीत नाही. तो न सकून् परतून जातेत राजा विक्रमा-

दित्याचे चाकराही हे अव्घ पाहून अवंती नगरांत् येऊन् राज्याचे समोर निवेदन केल. राजा हे अव्घी गोष्ट आयकून कौतुकास्तव काश्मीर देशास गेला. संध्याकाळी तळ्याजवळ प्रच्छन्नवेश होऊन् ईष्ट देवतेच चितन केल. तदनन्तर अर्धे रात्रीं राजा विक्रमादित्य कृतांजली होऊन् बोल्ला. अहो अव्घे देवता मी विनयपूर्वक निवेदन करीत आहे. नरबळीच रक्त पिऊन ज्या देवाची तृप्ती होते तो देव माझ रक्त पिऊन तुष्ट होवो. हे म्हणून आपल शिर कापल. देवीने त्या क्षणी मस्तक शरीरावर ठेवून राज्यास वाचवील आणी म्हटल अरे राजा तुला प्रसन्न झाले वर प्रार्थना कर. राज्याने म्हटल अग देवी जर माझ्यावर प्रसन्न झालीस तर अवघे प्राणीचे उपकारासाठी हे तळ पाण्याने पूर्ण कर. देवताने म्हट्ल अरे विक्रमादित्य तुझ अतीशय धार्मिकपण तुझ्यावर अनुग्रह केला. हे म्हणून प्रत्यक्ष झाली. राजा आपले देशास् आला. काश्मीर देशाचे लोक प्रातःकाळी पाणीनें पूरल तळ पाहून विस्मीत् झालेत्.''¶......

**बालबोध मुक्तावलि तंजावर**

मराठी ग्रंथप्रकाशनचा दुसरा अल्पसा प्रयत्न तंजावर येथील राजाश्रयाखालीं झाला. सरफोजी राजे यांनी इ. स. १८०६ त सरल्वन पडिताकडून इसापनीतीचें मराठी भाषांतर करवून ' बालबोध मुक्तावलि ' या नांवानें छापिलें. याची एक प्रत ब्रिटिश म्युझियममधील ग्रंथालयांत आहे. सरफोजींना दत्तक घेतल्यानतर तुळाजी राजे यांनीं त्यांना डेनिश मिशनरी रेव्हरंड स्वार्त्झ यांच्या स्वाधीन केलें होतें. रेव्हरंड स्वार्त्झ यानीं बालराजांचे पुत्रवत् पालन करून त्यांच्या सर्वांगीण उन्नतीला पोषक अशा तऱ्हेचे त्यांना शिक्षण

¶ सिंहासनबत्तीसी पृष्ठ ५९–६१

दिलें. ते इंग्रजी अस्खलित बोलत. विविध विषयांवरील ग्रंथ प्रकाशित करण्यासाठीं त्यांनी एक छापखानाहि काढिला होता. त्यांतच वरील मराठी पुस्तक छापलें गेलें. " त्यानीं आपली सर्व कारकीर्द, विद्याप्रसार, ग्रंथ-संग्रह, आणि विद्वत्समागम यांमध्ये घालविली असें म्हटलें तरी चालेल. त्यांनीं तंजावर येथें मोठमोठे विद्वान पंडित जमवून व त्याना उत्तेजन देऊन, त्यांच्याकडून कित्येक संस्कृत ग्रंथ व काव्ये व नाटकें तयार करविलीं. तंजावर येथील बृहदीश्वराच्या देवालयामध्ये प्राचीन चोल राजांनीं लिहिलेल्या शिला-लेखाप्रमाणें सरफोजीराजे यांनीं आपल्या राजघराण्याचा संपूर्ण इतिहास मराठी शिलालेखामध्ये कोरून तयार केला आहे. तंजावरच्या राजवाड्यांत एक सरस्वतीमंदिर निर्माण करून, तेथें अनेक विषयांवरील प्राचीन ग्रंथ, ताम्रपत्रें, ताडपत्रे, भूर्जपत्रे इत्यादि जमवून, प्रत्यक्ष विद्यादेवीस तेथें सदैव विहार करावयास लाविलें होते. सरफोजीराजांचा तंजावर येथील ग्रंथ-संग्रह पाहून पाश्चात्य विद्वान् थक्क होऊन गेले. डॉ. बर्नेलसारख्या जर्मन पंडितांनी वर्षांच्या वर्षें खर्च करून त्या ग्रंथाच्या नामावली तयार केल्या आहेत. असा अपूर्व ग्रंथ-संग्रह करणाराची विद्याभिरुचि अवर्णनीय असली पाहिजे हे उघड आहे " ।

**डॉ. रॉबर्ट ड्रमंडकृत मराठीचें व्याकरण**

मराठी ग्रंथ-प्रकाशनाचे वरील दोन्ही प्रयत्न बंगाल व मद्रास या परप्रांतांत झाल्यामुळे महाराष्ट्रांतील लोकांना त्याबद्दल माहिती असण्याचा संभव नव्हता. इ. स. १८०८ त डॉ. रॉबर्ट ड्रमंड यांनीं

" Illurtations of the grammatical parts of the Guzerattee, Mahratta and English languages "

---

। द. ब. पारसनीस—तंजावरचें राजघराणें. पृ. ११६

हे पुस्तक मुंबईस कुरियर छापखान्यांत छापिले. हे इंग्रजींत लिहिले असून मधूनमधून येणारा मराठी मजकूर मोडी लिपींत छापला आहे. डॉ. केरी यांचे व्याकरण या प्रांतांतील लोकांना दुर्मिळ असल्यामुळे आपण हे पुस्तक लिहिलें आहे, असे ड्रमंडसाहेबाने प्रस्तावनेत म्हटले आहे. या पुस्तकात गुजराथी भाषेवर जास्त भर देऊन मराठी व्याकरण अगदीं थोडक्यांत लिहिले आहे. संस्कृत व्याकरणाची परिभाषा सर्रास उपयोगांत आणिली आहे. उदा० अच्, हल्, तिंगंत, सुबंत इत्यादि. शेवटी लहानसा शब्दकोशहि जोडला आहे. मुख्यतः युरोपियन लोकांना मराठी शिकण्याच्या कामी मार्गदर्शक म्हणून हें पुस्तक लिहिले आहे.

**खिस्ती धर्मप्रसार व मराठी ग्रंथप्रकाशन**

याच सुमारास खिस्ती धर्मप्रसारकाची दृष्टि मुंबई इलाख्याकडे वळली. प्रथमतः लंडन मिशनरी सोसायटीचे दोन प्रचारक मुंबईस आले. त्यानंतर इ. स. १८१२ त हॅरिएट् न्युवेल ( Harriet Newell ) व ज्युडसन ( Judson ) हे अमेरिकन मिशनचे दोन प्रचारक कलकत्त्यास उतरले, व त्यानीं इ. स. १८१५ च्या सुमारास मुंबईत आपले कार्य सुरू केले. इ. स. १८२२ त स्कॉटिश मिशनरी सोसायटीच्या लोकानींहि मुंबईस ठाणे दिले. अर्वाचीन महाराष्ट्राच्या सामाजिक, शैक्षणिक व वाङ्मयीन इतिहासात ह्या मिशनरी लोकांच्या चळवळींचे स्थान अत्यंत महत्त्वाचे आहे. त्यांनीं आपल्या कार्याची आखणी फार दूरदर्शीपणानें केली होती. त्यांचे कार्यक्षेत्र व्यापक व बहुविध होते. सामान्य लोकांच्या मनावर आपल्या उपदेशाचा परिणाम व्हावा म्हणून आपल्याला त्यांच्या मातृभाषेचाच अवलंब केला पाहिजे, हे लक्षात घेऊन या धर्मोपदेशकानी मराठी भाषेचा अभ्यास केला. खिस्ती धर्माची थोरवी पटवून देताना ज्या धर्मविषयक कल्पनांचा

उहापोह करावा लागणार त्याचे आकलन होण्यासाठी एतद्देशीय बहुजन समाजाचा शैक्षणिक दर्जा वाढविणें जरूर होते. यासाठी मिशनरी लोकांनीं खेडयापाडयांतून शाळा स्थापन करून साक्षरता--प्रसाराचे कार्य प्रथम हातीं घेतले. सामुदायिक शिक्षणाचा हा पहिला संघटित प्रयत्न कल्पनेबाहेर यशस्वी झाला. हळुहळू लोकांना शिक्षणाची गोडी लागत चालली व मुलामुलींची संख्या वाढत जाऊन लोकांकडून जास्त शाळांसाठीं तगादा सुरूं झाला. विद्यार्थ्यांसाठी लहान लहान क्रमिक पुस्तकाची उणीव भासूं लागली. तीं तयार करण्याचें कामहि या धर्मोपदेशकानाच करावें लागलें. तसेंच देशी भाषांत बायबलचें भाषांतर करून त्याच्या प्रती खेडयापाडयांतून वाटणें हें मिशनरी लोकाच्या कार्याचे एक प्रमुख अंग होते. यासाठीं अमेरिकन मिशनच्या लोकांनीं श्रीरामपुरहून देवनागरी टाइप आणविले व इ.स. १८१७ त बायबलच्या कांही भागाचे मराठी भाषांतर प्रसिद्ध केलें. त्यांतील एका पृष्ठावरील मजकूर नमुन्यादाखल खाली देत आहे.

" **पर्व ॥ १२ ॥ मात्थी २९**

र माझे जोकड घ्या आणि मजपासी शिका कां तर अंतःकरणामध्ये मी नम्र आणि लीन आहे आणि तुम्ही आपले मनामध्यें विसांवा पावाल ॥ यास्तव कीं माझें जोकड सोपें आणि माझें वोझें हलके आहे. ॥

पव ॥ १२ ॥ त्यासमई येशू शब्बाथामध्ये दाण्याचे शेतातून जात असता त्याचे शिष्ये भुकेले होऊन कणसे मोडून खाउं " †

---

† सुंदरराव भास्करराव वैद्य—टॉमस ग्रॅहॅम पृ. ६४३. नवयुग जुलै १९१४

याप्रमाणे मिशनरी लोकांनीं शिक्षणप्रसाराचें व शालोपयोगी आणि धार्मिक मराठी ग्रंथ प्रकाशित करण्याचें कार्य आरंभिलें. त्यांचा हेतु कसाहि असला तरी त्यांच्या या उपक्रमामुळें मराठी गद्यवाङ्मयाचें पाऊल पुढे पडण्याला थोडीफार मदतच झाली, हें मान्य केल्यावांचून गत्यंतर नाही.

## २

### ( इ. स. १८२२–१८३६ )

**विद्यादानाचा उपक्रम**
**बॉ. ने. ए. सोसायटी**

मिशनरी लोकाची ही शैक्षणिक चळवळ यशस्वी होत आहे असे पाहून सरकारनेही त्याकामीं अधिक लक्ष घालण्यास सुरवात केली.* यापूर्वीच इ. स. १८१३ सालीं ब्रिटिश पार्लमेंटने ईस्ट इंडिया कपनीला नवी सनद देतांना तिच्या ४३ व्या कलमांत हिंदुस्थानातील रयतेला शिक्षण देण्यासंबंधी खालीलप्रमाणें स्पष्ट खुलासा केला होता.

> " A sum not less than 1,00,000 Rs. should be spent every year for the revival and improvement of oriental literature, for the encouragement of the learned natives of India and for the introduction and promotion of the knowledge of the sciences among the inhabitants of the territories of British India. " †

---

* **Rev. J. Murray Mitchell**—Recollections of my early missionary life " *It was the success of mission schools that by and by led the Government to attend to the education of the masses.* "

† वि. ज्ञा. वि. पु. ४७ अं. १

या कलमांतील वार्षिक खर्चाची मर्यादा फक्त एक लक्ष रुपयांचीच अस-ल्यामुळें शिक्षण प्रसाराच्या कार्याला विशेष जोर चढणें शक्य नव्हते. इ. स. १८१५ साली गरीब लोकांमध्ये विद्याभिवृद्धि करावी, म्हणून एक 'विद्यो-त्तेजक सभा' ( The society for promoting the education of the poor within the Government cf Bombay ) स्थापन झाली. परंतु तिच्या हातून चारपांच वर्षेपर्यंत म्हणण्यासारखे कांही कार्य झाले नाही. यानंतर मुंबई इलाख्यातील लोकप्रिय गव्हरनर नामदार मौंट स्टुअर्ट एल्फि-स्टन यानी हा प्रश्न मोठ्या आस्थेनें हातीं घेतला. त्यांच्या प्रेरणेने इ. स. १८२० सालीं बंगालमधील एज्युकेशन् सोसायटीच्या धर्तीवर मुंबईत 'नेटिव-स्कूल बुक आणि स्कूल सोसायटी' ही संस्था स्थापन झाली. तिचा मुख्य उद्देश देशी भाषांच्या द्वारे एतद्देशीय लोकांना शिक्षण द्यावे असा होता. लव-करच या सोसायटीला सालीना ५,००० पौंडांचे सरकारी साह्य मिळून तिचे कार्य सुरळीत चालू झाले. मुंबई इलाख्यांत ठिकठिकाणी मराठी व इंग्रजी शाळा स्थापन झाल्या आणि लोकांमध्ये विद्येची गोडी उत्पन्न व्हावी म्हणून सर्व बाजूंनी प्रयत्न करण्यात येऊं लागले. एल्फिन्स्टन साहेबाचे शिक्षण-विषयक धोरण किती उदार आणि व्यापक होतें, हे त्याच्या खलित्यांतील ( minute ) खालील उताऱ्यावरून लक्ष्यात येईल.

> "एतद्देशीय लोकामध्ये ज्ञानाचा प्रसार होण्यास उपाय म्हटले तर असे आहेत. पहिला–त्याच्या शाळातून शिक-विण्याची जी तऱ्हा आहे ती सुधारावी आणि शाळाची संख्या वाढवावी. दुसरा–शालोपयोगी पुस्तके पुरवावी. तिसरा–याप्रमाणे शिक्षणाची सोय करून दिली म्हणजे त्याच्यात खालच्या प्रतीचे जे लोक आहेत त्याच्या मनांत आपण शिकावे असे यावे म्हणून त्याना काही तरी उत्तेजन द्यावे. चौथा–

युरोपियन शास्त्रें आणि उच्च प्रतीच्या विद्येत ज्या सुधारणा आहेत त्या शिकविण्याकरिता शाळा स्थापाव्या. पांचवा–नीतिशास्त्र आणि पदार्थविज्ञानशास्त्र यावर देशभाषांत पुस्तकें तयार व्हावीं आणि तीं छापून प्रसिद्ध व्हावीं अशी तजवीज करावी. सहावा–इंग्रजी ही अभियुक्त भाषा ( Classical language ) म्हणून आणि युरोपामध्ये जे नवे नवे शोध लागतात त्याचे ज्ञान संपादन करण्यास साधन म्हणून ज्याच्या मनात ती शिकावें असें येईल त्यांना शिकविण्यास शाळा स्थापाव्या. सातवा–ह्या ज्या ज्ञानाच्या शाखा सांगितल्या त्या शिकण्याविषयी एतद्देशीय लोकास उत्तेजन द्यावे " *

याच सुमारास पुणें येथेंहि विद्यादानाचें पवित्र कार्य आरंभिलें गेलें.

**पुणें-पाठशाळा**

" मेहेरबान मिस्तर चापलेनसाहेब, चीफ कमिशनर ( मुख्य कारभारी ) यांस असें वाटलें कीं, कांहीं तरी पुण्यांतील लोकांस विद्याधन द्यावें, म्हणून त्यानीं सरकारात असे लिहिलें कीं, " हिंदूच्या विद्येचे जे उपयोगी भाग आहेत ते चांगले रीतीनें वृद्धिंगत करण्याकरितां एक विद्यालय घालावें. त्यास पैसे दक्षिणेसाठीं जे पन्नास हजार ५०००० रुपये आहेत त्यापैकीं वीस हजार रुपये निराळे काढून विद्याखात्याकडे द्यावे. " हे मंजूर होऊन आल्यावर सन १८२१ म्हणजे शा. शके १७४३ या सालीं येथें पाठशाळा स्थापिली. † या पाठशाळेंत ऋग्वेद, यजुर्वेद, न्यायशास्त्र, धर्मशास्त्र, व्याकरण, वैद्यक, अलंकार इत्यादि विषय शिकविण्यासाठीं गुरु व उपगुरु नेमिले होते. मुख्य अध्यापकाच्या

---

* कृ. ब. गोडबोले—मौंट स्टुअर्ट एल्फिन्स्टनसाहेब यांचें चरित्र उत्तरार्ध पृ. १२३

† ना. वि. जोशी—पुणें शहरचें वर्णन पृ. ७४

जागी न्यायशास्त्राचे गुरु राघवाचार्य यांची योजना करण्यात आली होती. कालांतराने वेदशाळा मोडून तिचें शास्त्रशाळेत रूपांतर झालें. मराठी व इंग्रजी भाषाचे वर्गहि या पाठशाळेला जोडण्यात आले. इ. स. १८३७ त या विद्यालयाच्या व्यवस्थापकाच्या जागी मेजर क्याँडी साहेबाची नेमणूक झाली. कृष्णशास्त्री चिपळूणकर, नानाशास्त्री आपटे, महादेव गोविंदशास्त्री कोल्हटकर, कृष्णशास्त्री राजवाडे वगैरे याच पाठशाळेतील विद्यार्थी पुढे महाराष्ट्रांत नावारूपास आले.

**सातारा विद्यालय**

याच सुमारास साताऱ्चे महाराज यांनींहि एक विद्यालय स्थापन केले होते. त्यात इंग्रजी, मराठी, संस्कृत, आरबी, फारशी इत्यादि भाषा शिकविल्या जात. विद्यार्थ्यांची संख्या २४० ( इ. १८३३–३४ ) होती. मुख्य अध्यापक माधवराव हे होते. हिंदुधर्मप्रकरणीं विल्सन साहेबांशी ज्यांचा वाद झाला ते नारायणरावहि याच विद्यालयात शिक्षक होते.* महाराष्ट्राच्या इतर भागातहि याप्रमाणेच खासगी, सरकारी व मिशनरी लोकांच्या शाळा निघू लागल्या होत्या. शिक्षण प्रसाराच्या या उपक्रमाचा मराठी भाषेतील तत्कालीन ग्रंथनिर्मितीशी अत्यंत निकटचा संबंध असल्यामुळे त्याचा वृत्तांत थोडक्यात वर्णिला आहे

**मुंबई-शिक्षा-मंडळीचें जाहीर पत्रक**

सामुदायिक शिक्षणप्रसाराचा हा प्रयत्न अगदी नवीन असल्यामुळें शाळेतील विद्यार्थ्यांसाठीं सुबोध पुस्तके तयार करण्याचें कामहि ओघानेंच प्राप्त झालें. 'मुंबईच्या हैंद शाळा–शाळा पुस्तक मंडळी'ने मराठी व गुजराथी भाषात स्वतंत्र किंवा भाषांतरात्मक ग्रंथ लिहिणाऱ्या उदयोन्मुख

*Oriental Christian Spectator Vol. V ( 1834 )*

लेखकाना बक्षिसाच्या द्वारे उत्तेजन देण्याचे ठरवून ता. ८ एप्रिल १८६५ रोजीं इंग्रजी–मराठी–गुजराथी असें त्रैभाषिक पत्रक प्रसिद्ध केले. त्यात पर-भाषेंतील प्रौढ ग्रथांचीं सुरस भाषांतरें, स्वतंत्र काल्पनिक ग्रंथ, आणि शालोपयोगी ग्रंथांचीं बालबोध भाषांतरें बक्षिसासाठी मागविलीं होती. बालबोध ग्रंथ करणारास शंभर रुपयापासून चारशेंरुपयेपर्यंत प्रति पुस्तकी बक्षीस मिळेल व प्रौढ ग्रंथाचीं भाषांतरं करणारास दोन हजार रुपयापासून पाच हजार रुपयेपर्यंत बक्षीस मिळेल ' असे या पत्रकात जाहीर केलें आहे. त्याबरोबरच पुस्तकांचे विषय आणि नावेंहि सुचविली आहेत. शिवाय " इंग्रजी भाषेच्या पुस्तकाचें भाषांतर जे करितील त्यांनीं हें लक्षात ठेवावें कीं या देशांतील लोकांचे चालीस व समजुतीस जसे नीट येईल तसे कोठें कोठे मूळ ग्रंथ थोडा थोडा फिरवून अर्थ संपूर्ण येईल असें केलें पाहिजे." अशा तऱ्हेची सूचना केली आहे. भाषांतर करताना प्रथमतः नेहमीच्या प्रचारांतील देशी शब्द वापरावे, त्यानंतर संस्कृत व फारशी भाषेंतील शब्द योजावे आणि शेवटी जरूर तर इंग्रजी शब्द उपयोगात आणावे असा शब्द-योजनेचा क्रमहि सांगितला आहे. या पत्राच्या प्रसिद्धीकरणाचा फार उपयोग झाला. बक्षिसाच्या आशेने नवीन नवीन लेखक निर्माण होऊं लागले आणि त्यामुळें मराठी भाषेत निरनिराळ्या विषयावरील गद्यग्रंथाची भर पडत चालली.

**मराठी व्याकरण**

कोणत्याहि भाषेचा सांगोपांग व पद्धतशीर अभ्यास करणे, कोश आणि व्याकरण याच्या साह्यानें पुष्कळ सुलभ होते. एकोणिसाव्या शतकाच्या आरंभीं मराठी भाषेत या दोन्ही ग्रंथांची उणीव होती. डॉ. केरी व रॉबर्ट ड्रमंड यांनी मराठी भाषेचीं व्याकरणें लिहिली होतीं, पण तीं इंग्रजीत असल्यामुळें निव्वळ मराठी जाणणाऱ्यांना त्यांचा फारसा उपयोग होण्यासारखा नव्हता. यास्तव मुंबईच्या शिक्षा

मंडळीचे सेक्रेटरी जार्ज जर्व्हिस यांनी जगन्नाथशास्त्री क्रमवंत, गंगाधरशास्त्री फडके आणि बाळशास्त्री घगवे या तिघा पंडितांना मराठी भाषेचे व्याकरण करण्याविषयी आज्ञा केली. " त्याजवरून संस्कृत व्याकरणाध्ययनबलेंकरून (त्यांनी) एक वर्षांत व्याकरण तयार केले. परंतु तें केवळ बरोबर झाले नाहीं. तथापि राहिल्ये विषयास सूचक झाले. "* रामचंद्रशास्त्री जान्हवेकर यांनी या व्याकरणाचा प्रश्नोत्तररूप साराश तयार केला. ही दोन्ही व्याकरणे छापिली गेली नव्हती. त्यांच्या हस्तलिखित प्रतीवरूनच बारा वर्षेपर्यंत काम चालले. इ. स. १८३६ साली बाळशास्त्री जांभेकर, गंगाधरशास्त्री फडके आणि दादोबा पांडुरंग या तिघा पंडितांनी आपली तीन व्याकरणे प्रसिद्ध केली. या सर्वांत दादोबांचे व्याकरण उत्कृष्ट उतरले आहे व तेंच पुष्कळ वर्षेपर्यंत शाळांतून चालू होते.

**महाराष्ट्र भाषेचा कोश**

इ. स. १८१० साली डॉ. केरी यांनी आपला मराठी–इंग्रजी कोश प्रसिद्ध केला; परंतु महाराष्ट्रांत त्याचा फारसा प्रसार झालेला नव्हता. कर्नल केनेडीसाहेबांचा कोशहि ( इ. स. १८२४ ) लहान व अनेक दृष्टींनीं अपुरा होता. मुंबई येथे शिक्षामंडळीची स्थापना झाल्यानंतर लवकरच तिने हे काम हातीं घेतले. त्यासाठी बाळशास्त्री घगवे, गंगाधरशास्त्री फडके, सखाराम जोशी, दाजीशास्त्री शुक्ल आणि परशुरामपंत गोडबोले या पाच पंडितांची नेमणूक करण्यांत आली. त्यांनी मोठ्या परिश्रमाने महाराष्ट्र भाषेचा सर्वांगसुंदर कोश तयार केला. हा इ. स. १८२९ सालीं प्रसिद्ध झाला. त्यानंतर इ. स.

* गंगाधरशास्त्री फडके—प्रस्तावना. महाराष्ट्र भाषेचें व्याकरण ( आवृत्ति चौथी )

१८३१ त मोल्स्वर्थ यानीं आपला मराठी–इंग्रजी कोश छापला. अशा रीतीने मराठी भाषेतील महत्त्वाची उणीव अल्पावकाशातच भरून निघाली.

यानंतर सरकारी उत्तेजनानें व खासगी प्रयत्नानें संस्कृत आणि इंग्रजी भाषेतील निरनिराळ्या ग्रंथाची मराठीत भाषांतरें होऊं लागलीं. इंग्रजी गद्यालाहि प्रथमतः समर्थ व संपन्न होण्यासाठी ग्रीक, लॅटिन, फ्रेंच वगैरे भाषातील ग्रंथाचा आश्रय घ्यावा लागला. त्याप्रमाणेच मराठी गद्य प्रारंभी परभाषातील वाङ्मयाच्या जोरावरच धष्टपुष्ट बनलें. विदुरनीति, सिंहासनबत्तीसी, वेताळपंचविशी इत्यादि ग्रंथाचे मराठी तर्जुमे तयार झाले. बाळमित्राच्या दोन्ही भागाचें मराठी भाषांतर प्रसिद्ध झालें. भाषांतरित ग्रंथात मूळ ग्रंथातील भाषासरणीचें प्रतिबिंब उमटणें अपरिहार्य आहे. संस्कृत पुस्तकांच्या भाषांतरात मधून मधून सामासिक शब्द व संस्कृत भाषेच्या धर्तीवर शब्दप्रयोग आढळतात. संस्कृत पुस्तकाचीं भाषांतरें करणें एका दृष्टीनें बरेंच सुलभ होतें, परंतु इंग्रजीचें मराठीशीं फार कमी साम्य असे त्यामुळें त्या भाषेंतील ग्रंथाचीं भाषांतरें करताना मोठी अडचण पडे. लिहिण्याची स्वतंत्र व सर्वमान्य अशी मराठी गद्यशैली अद्याप तयार झालेली नव्हती. त्यामुळें सामान्य व्यवहारातील बोलण्याच्या भाषेचाच ग्रंथलेखनासाठीं उपयोग करावा लागला.

संस्कृत व इंग्रजी पुस्तकांचीं भाषांतरें

" So the only prose style which they had for a model was that of everyday speech Now, the structure of speech is synthetic; that is, the speaker is always inclined to build up his sentences in the exact order in which his thoughts come into his mind In conversation there is no time to consider and

rearrange words, phrases, and clauses, one speaks as ons thinks, and no one invariably thinks in correct complex sentences, nor speaks in such a way that improvement is unnecessary "†

इंग्रजीवरून केलेले बाळमित्र (दोन्ही भाग) व इसापनीति हे दोन्ही ग्रंथ फार चांगले उतरले आहेत. शब्दयोजना

**कथा ग्रंथ**

नेहमीच्या प्रचारातील आहे. अगा, ओड, आगोतल्या, साज, मातस्मान् इत्यादि कोंकणी शब्द मुबलक आहेत. शब्दयोजनेत क्वचित् ग्राम्यताहि आढळते. दिव्याउजेडी, .जेवणघर, नेसूपचा, पाखरेविक्या इत्यादि सामासिक शब्द सुटसुटीत, गोड व अर्थपूर्ण आहेत. वाक्यरचना शिथिल स्वरूपाची आहे. वाक्ये लहान लहान पण अव्यवस्थित आहेत. शब्दांच्या क्रमाकडे जागोजाग दुर्लक्ष झाले आहे. काही ठिकाणी अध्याहृत शब्दांची जरूरी भासते तर काही ठिकाणी अनावश्यक शब्दांच्या योजनेमुळे घोटाळा होतो. भाषा एकंदरीत साधी, अकृत्रिम, मनोहर व रसाळ आहे. परंतु तिच्यात संस्कारशुद्धतेचा अभाव असून कमावलेले कौशल्य व सफाई यांचा मागमूसहि नाही. पुष्कळ ठिकाणी वाक्यरचना व शब्दप्रयोग इंग्रजी भाषेच्या धर्तीवर गेले आहेत.उदा० १ माझे लहानगे धन्या, २ माझे लाडके मुलानो! काय सुखाचा दिवस आजचा होता, जर पोराचे द्वाड गुण याला विरजण नसते ३ ईश्वरे मला तुजमध्ये दुसरा लेक दिला आहे, ४ तूं आपल्ये उदार बापाची प्रतिमा आहेस, म्हणून माझे अत्यंत प्रीतीपात्र आहेस जसा तो मला गुरुस्थानी होता. इ. इत्यादि. मराठी गद्याच्या बाल्यदशेत निर्दोष ग्रंथलेखनाची अपेक्षा करणें चुकीचे होईल. त्या काळाच्या

---

† **C. Bullock**— *Introduction*—‘ *English Literary Prose in the making*

मानानें बाळमित्र व इसापनीति यांची भाषाशैली ' सरळ , सुबोध व सुरम्य ' होती, यांत शंका नाहीं. बाळमित्रातील खालील उताऱ्यावरून त्यावेळच्या मराठी गद्यशैलीची कल्पना येईल.

" एके आदितवारी प्रातःकाळा, अमृतराव, बापाबरोबर माहिमाम मौज मारायासाठी जावयास, सजून तयार झाला होता. तेथे जायाचे ते पूर्वी पंधरा दिवस त्याचे मनात सर्वदा घोळत होते. तो लवकर निजून उठत नसे, तो त्या दिवशी कोंबडे आरवणी उठला. घरचे सगळये माणसांस उठविले; गाडीवानास ताकीद केली, आणि आपण न्हाऊन धुऊन सिद्धतेत आहे; इतक्यात अकस्मात् आकाश काळे झाले; अभ्रे दाट झाली; मोठा वारा सुटला, त्याणे सर्व झाडें डोलूं लागली; आणि चोहोंकडे धुळीने दिशा धुंद झाल्या. अमृतराव क्षणाक्षणां आगण्यांत जाऊन आकाशाकडे पाही; फिरून माडीवर जाई तो तीन तीन पायऱ्या उडे, आणि सोकाजी आपला बाप, यास आशा देई कि, बाबा, कांही चिंता नाही, हे आता सगळे जिकडे तिकडे जिरेल; आणि दिशा निर्मळ होतील. मला वाटते कि आपण निघालो तरी चिंता नाही.

सोकाजीने मुलाचो भविष्य ऐकून तसे केले नाही. तो म्हणाला, बाबा अंमळ वाट पाहिली पाहिजे; इतके म्हणतो आहे तो विजा कडकडूं लागल्या; आणि मोठा पाऊस कोसळला. तेव्हा अमृतरावाचा पस्तावा जो झाला आहे, ता सांगता येईना. तो म्हणाला हा जळला आजच कशास लागला. संध्याकाळचा प्रहर दिवसपर्यंत पाऊस पडून, मग जिकडे तिकडे निरभ्र झाले, आणि ऊन पडलें; झाडे पानें सगळीं टवटवीत दिसूं लागली. मग अमृतराव बहूत दिक दोऊन राहिला होता: तो अंमळ हुशारीत आलासा पाहून

बापानें त्यास महालक्ष्मीपर्यंत बाहेर फिरायास नेलें. तेव्हा हवेची स्वच्छता पाहून, पक्षांचे शब्द ऐकून, जिकडून तिकडून सुगंध येतो आहे तो घेऊन, त्याचा हृदयास समाधान झालें. त्यास मोकाजी म्हणतो; पाऊस पडल्यानें सर्वत्र काय फेरफार झाला तो तूं पाहिलास ना? कालच जिकडे तिकडे धुंद कसें दिसत होतें? उष्मा काय होत होता? सर्व व्याकुल कसे झाले होते? इतकी जिकडे तिकडे टवटवी दिसायास काय प्रयोजन बरें !

अमृतराव म्हणाला, " आजचा पाऊस."

तो पाऊस भरून आला म्हणून सकाळीं चडफडत होता; त्यास ते शब्द उच्चारता बहुत जाचलें. तो लज्जित झाला; ते वेळेस बापाचे लक्षांत आलें कि, यास ही गोष्ट समजली कि, जात बहुताचें कल्याण, ती गोष्ट आपलें अकल्याण होऊनहि झाली, तरी चांगली. ती करायाची आपल्ये वाटयास जरी आली, तरी मोठे हौसेनें करावी, चडफडूं नये."*

'मराठ्यांची बखर', 'इंग्लंड देशाची बखर', 'इंग्लंड देशाचें वर्णन' वगैरे भाषांतरात्मक इतिहासग्रंथ याच सुमारास प्रसिद्ध झाले. ऐतिहासिक बखरींची परंपरा मराठी भाषेंत पूर्वीपासूनच चालू असल्यामुळें हीं भाषांतरें इतर ग्रंथांच्या मानानें सरस उतरलीं आहेत. विशेषतः मराठ्यांच्या बखरीची भाषा प्रौढ व भारदस्त आहे. या ग्रंथामधील एक उतारा खालीं सादर करितों:—

**इतिहास**

" रायगडाहून तानाजी मालुसरे, माघ कृष्ण नवमीस, एक हजार मावळे लोक बरोबर घेऊन चोर वाटेनें रात्रीस सिंहगडाजवळ येऊन पोहचताच, त्या हजार लोकांचे दोन भाग करून, एका

* बाळमित्र भाग १ ( आशाभंग ) पृ. ३५५–५७

भागाचे पुढे चालविले, ते जेथे भिंतीसारिखा काळा दगड तासतास हात उंचीचा आहे तेथे जाऊन पोहचले, आणि दुसऱ्या भागाचे अंमळसे मागून चालविले; ते काहीसे मागे राहिले. जे पुढे जाऊन पोहचले, त्यांतील कोणी एक चतुर माणूस आपल्ये कमरेस दोरांची शिडी बांधून घेऊन वर चढला, मग त्या शिडीवरून एकएक माणूस जाऊन तीनशे लोक चढले; आणि लपून राहिले; आणखी लोक चढत होते तो किल्ल्यात कांही तयारीची गडबड होत आहे, असे समजून ते मावळे लोक एक माणूस आपलेकडे येतो आहे असे दृष्टीस पडताच, त्याला आपल्ये लोकास काही शब्दादि खुणेने वर्तमान कळवावयास वेळ न सापडूं देता मावळे यांणी तत्काळ मारिला. असे असताही किल्लेकरी अधिक सावधगिरीत आहेत असे मावळ्यास वाटले. तेव्हा जे जवळ मावळे होते ते घेऊन, तानाजी मालुसरा जिकडे ती गडबड होत होती तिकडे चालिला; तो कांहीसा पुढे गेला तो त्या किल्लेकऱ्यानी अकस्मात हिलालाचा व चुडीचा मोठा उजेड केला. तेव्हा ते रजपूत लोक तयार होऊन येतात, व कित्येक कंबरा बांधितात. व मावळे त्यावर चालून जातात, तो ते सारे एकसमयावच्छेदेकरून, दृष्टीस पडले, तेव्हा ते युद्ध मोठया निकराचे झाले. त्यात मावळ्यापेक्षा रजपूत फार होते तरी मावळ्याचा जय होईलसे दिसूं लागले; इतक्यात तानाजी मालुसरा पडला. तेव्हा मावळे लोक जिकडे दोरांची शिडी होती तिकडे पळून गेले, ते त्या भिंतीशी जाऊन पोहचतात तो सुऱ्याजी मालुसरा तानाजीचा भाऊ, बाकी मावळे लोकांसहित येऊन पोहचला, तो हे लोक पळतात असे पाहून मोठयाने ओरडून निषेध करून बोलिला, की तुमचा बापाचे प्रेत महार नेऊन अमंगळ जागीं टाकतील; त्या दोषाचे अधिकारी मात्र तुम्ही व्हाल; आम्ही तर दोरांची शिडी तोडिली. आता मोंगल तुम्हाला मारितील किंवा तुम्ही त्यांला माराल.

> असे म्हणून आपल्या बरोबरचे लोकासहित त्या लोकास पुनः युद्धास नेले; तेव्हा ते लोक एकदाच हरहर महादेव: म्हणून मोंगलाचा पराभव करिते झाले, असा तो किल्ला घेतला. मग दिवस उगवल्यावर असा ठिकाणा लागला की मावळे लोक तीनशे पडले; व रजपूत पाचशे पडले, याखेरीज दोन तीनशे मुमारें रजपूत जीव घेऊन पळाले, ते किल्ल्याचे भितीवरून बाहेर उड्या टाकून मृत्यु पावले."†

**शास्त्रीय विषयांवरील प्राथमिक ग्रंथ**

वैद्यक, ज्योतिष, खगोल इत्यादि विषयावरील टिपणवजा पुस्तके वगळली, तर मराठी भाषेत शास्त्रीय वाङ्मय मुळीच नव्हते, असे म्हटले तरी चालेल. प्रत्येक शास्त्राची परिभाषा नवीन बनविल्यावाचून गत्यतर नव्हते. इ. स. १८२८ त डॉ. मॅकलेनन यानी ' निदान, ' व औषधकल्पनाविधि हे दोन वैद्यकीय ग्रंथ इंग्रजीवरून तयार केले. त्यानंतर क्यापटन जॉर्ज जर्व्हिस यानी जगन्नाथशास्त्री क्रमवत यान्या साह्याने ' विद्येचे उद्देश, लाभ, आणि संतोष या विषयाचे वाद ' ( Preliminary treatise on the objects, advantages and pleasures of science) हे पुस्तक प्रसिद्ध केले. ' यात कित्येक विद्यांतील कांही कांही विषयाची संक्षेपकरून दिशा मात्र दाखविली आहे. ' या ग्रंथातहि परिभाषेची अडचण व्यक्त केलेलीच आहे. गौझाड, ज्वालाग्राही, भारमान, लंबपातळी, शीतोष्णता-मापकयंत्र, हिमडोंगर, चेपण इत्यादि नवीन बनवलेले शब्द या पुस्तकात आढळतात. याशिवाय सिद्धपदार्थविज्ञान ( Physics ) व शिल्पविद्या ( Mechanics ) या विषयावरहि दोन पुस्तके प्रसिद्ध झाली. अशा रीतीने मराठी भाषेतील शास्त्रीय वाङ्मयाचा पाया घातला गेला. ह्या काळातील शास्त्रीय ग्रंथांची

† मराठ्यांची बखर पृ. ६९–७०

भाषा फारच क्लिष्ट व बोजड आहे. 'विद्येचे उद्देश, लाभ आणि संतोष'य ग्रथामधील खाली दिलेल्या उताऱ्यावरून या विधानाची सत्यता पटेल.

" जिज्ञासेची केवळ पूर्ति; कालचेपेक्षा आज अधिक जाणणे; जें पूर्वी गूढार्थ आणि दुर्बोध भासले ते स्पष्ट समजणे; सामान्य सत्यतांचा विचार करणे; आणि वेगळाल्या पदार्थास परस्पराशी ताडणें,—हाच मनाचा संतोषकारी उद्योग आहे, आणि हा उद्योग तत्कालीन भोगावाचून, सर्व इंद्रियाचे वृत्तीस नीच कर्मासक्ततेतून सोडवून, मोठ्या आणि उत्कृष्ट कर्मासक्त अशा करितो, स्वभावास पवित्र आणि निर्मळ करितो, आणि त्या स्वभावाचे उद्धततेचा दमनाविषयी आत्म्यास सहाय्य होतो." †

" विद्येचे प्रथम पाठ बहुतजनास पाहिल्याने भयंकरस्वरूप दिसतात, हे सत्य आहे, का कि, नित्याचे व्यवहारकर्म समजण्याविषयी मनास जो यत्न पडतो, त्याहून विद्येचा पाठ समजायास कांही अधिक यत्न पाहिजे, परंतु बहुतच अधिक नको; आणि त्याच कारणास्तव विद्येचे अत्यंत उपयोगी भाग, म्हणजे जे बहुतकरून व्यवहारकामांवर लाविता येतात, त्याचे शिकण्यास सुगमपणा न्यून आहे; आणि ते भाग मनास विशेषतः असंमिश्र उद्देश थोडे दाखवितात, याजकरिता ते शिकल्यावर हर्षहि न्यून आहे. त्याची गोष्ट सागत्ये समयी कल्पनेस साहाय्य करण्याविषयी साप्रत कांही आकृति घ्यावयाची नाही; इंद्रियव्यापाराचे साहाय्यावाचून चित्ताचीच प्रार्थना करितो. परंतु जा सत्यता, विद्येकरून उघड होतात त्यांपासून जो हर्ष होतो तो अमूल्य आहे, हे मत विचार केल्यावांचून तिरस्कारूं नये. जे आधारविषय उघडून सांगितले आहेत, त्यांजकडे स्वस्थपणे केवळ अवधान मात्र द्यावे; आणि जांत

† विद्येचे उद्देश, लाभ आणि संतोष पृ. ४–५

व्यावहारिक कामाशीं किंवा कांहीं सिद्ध गोष्टींशीं संबंध नाहीं, असें कांहीं आम्हीं सांगत नाहीं, असा विश्वास ठेविला असतां, जे पाठ तुम्हीं शिकतां ते कितीं उपयोगी आहेत हें सत्वर तुमच्या ध्यानांत येईल, आणि ते समजायाविषयीं आणि स्मरणांत ठेवायाविषयीं तुमचें मन लागूं लागेल; "‡

**बॉम्बे बुक आणि ट्रॅक्ट सोसायटी**

ख्रिस्ती–धर्मप्रसारक चळवळीचें एक प्रमुख अंग म्हणून देशी भाषांत पुस्तकें प्रकाशित करण्यासाठीं इ. स. १८२७ त 'बॉम्बे बुक आणि ट्रॅक्ट सोसायटी'ची स्थापना झाली. तिच्या विद्यमानें पुढील पन्नास वर्षांत अनेक लहानमोठे ग्रंथ प्रसिद्ध झाले. याच सुमारास मुंबईचे प्रसिद्ध ख्रिस्ती–धर्मप्रचारक जॉन् विल्सन व सातारा विद्यालयांतील अध्यापक नारायणराव यांचा हिंदुधर्मप्रकरणीं कडाक्याचा वाद झाला. नारायणरावाच्या मतांचें खंडन करण्यासाठीं विल्सनसाहेबानें हिंदुधर्मप्रसिद्धीकरणाचे दोन भाग प्रसिद्ध केले.

## ४

## इ. स. १८३६–१८५७

मागील चौदा वर्षांच्या काळांत गद्यवाङ्मयाच्या वाढीला बरीच अनुकूल परिस्थिति निर्माण झाली. सरकारी व मिशनरी लोकांचे छापखाने निघाले. गांवोगांवीं इंग्रजी व मराठी शाळा स्थापिल्या गेल्या. व्याकरण आणि कोश यांची रचना झाली. अनेक लहानमोठीं शालोपयोगी पुस्तकें लिहिलीं गेलीं.

‡ विद्येचे उद्देश, लाभ आणि संतोष पृ. ५

इंग्रजी भाषेतील शास्त्रीय ग्रंथांची भाषांतरे होऊं लागलीं. नवीन शिक्षण घेतलेल्या लोकांत मराठी भाषेविषयी आस्था उत्पन्न झाली आणि त्यांपैकी कित्येकांनी आपल्या मगदुराप्रमाणे मायभाषेच्या वाङ्मय–संपत्तीत भर घालण्याचाहि प्रयत्न केला.

**नियतकालिकांचा उगम**

अर्वाचीन काळात वृत्तपत्राचा व मासिकाचा मान फार मोठा आहे. प्रत्यही चालू असलेल्या जगातील घडामोडींची सामान्य जनतेला वेळोवेळी माहिती करून देण्याला वृत्तपत्र हेंच एकमेव साधन आहे. लोकशिक्षणाच्या भरीव कार्याला आजपर्यंत मराठी मासिकांनी पुष्कळच हातभार लाविला आहे. मराठी भाषेत प्रथम बाळशास्त्री जांभेकर यांनी हा उपक्रम सुरू केला. त्यांनी 'दर्पण' या नावाचें साप्ताहिक व 'दिग्दर्शन' या नावाचें मासिक सुरू केलें. मराठी भाषेची प्रगति आरंभीं आरंभीं तरी बंगालीच्या पावलांवर पाऊल टाकून चालली होती असें दिसतें. पहिलें बंगाली मासिक इ. स. १८१८ त निघालें; व त्याचें नांवहि 'दिग्दर्शन'च होतें. यानंतर गोविंद विठ्ठल ऊर्फ भाऊ महाजन यांनीं इ. स. १८४० त 'प्रभाकर' पत्र काढिलें. हें दर रविवारीं निघत असे. उत्तम मराठी लिहिण्याविषयी भाऊ महाजन यांची फार ख्याति होती, त्यामुळें 'प्रभाकर' पत्र लवकरच फार लोकप्रिय झालें. इ. स. १८४२ त मिशनरी लोकांनी 'ज्ञानोदय' नामक इंग्रजी-मराठी पाक्षिक सुरू केलें. त्यामधून वारंवार होणाऱ्या हिंदुधर्मावरील हल्ल्याचा प्रतिकार करण्यासाठीं 'उपदेशचंद्रिका' 'विचारलहरी' 'धूमकेतु' इत्यादि नियतकालिकें निघालीं. याशिवाय 'ज्ञानप्रसारक,' 'चंद्रिका', त्रैमासिक ज्ञानदर्शन', 'वर्तमानदीपिका'.

'सत्यदीपिका' इत्यादि अनेक मासिकें व वृत्तपत्रें त्याकाळीं प्रसिद्ध होऊं लागलीं. अशा रीतीनें मराठी गद्यांत एका नवीन वाङ्मय–प्रकाराची भर पडली.

**मराठी गद्य इ. स. १८२२–१८४०**

इ. स. १८४० सालीं मुंबईची शिक्षामंडळी मोडून 'बोर्ड ऑफ् एज्युकेशन' या नावाची एक सभा सरकारनें स्थापन केली. बॉ. ने. ए. सोसायटी स्थापन झाल्याला अठरा वर्षे होऊन गेलीं. "इतक्या मुदतींत महाराष्ट्र भाषेत ग्रंथसंग्रह जेवढा व्हावा तेवढा जरी झाला नाहीं तरी गद्यात्मक लेखनपद्धतींत बरीच सुधारणा झाली आणि अनेक विषयांवर उपयुक्त ग्रंथहि झाले."* गणित, इतिहास, भूगोल, खगोल, वैद्यक इत्यादि विविध विषयांची माहिती पुस्तकरूपानें प्रसिद्ध होऊं लागली. मराठी गद्याचें क्षेत्र वाढत चाललें. नवीन नवीन शास्त्रीय व व्यावहारिक विषयांचें ज्ञान, महाराष्ट्राला मराठीतून मिळूं लागलें. ललित वाङ्मयापेक्षा प्रमाणग्रंथ व विशेषतः शास्त्रीय ग्रंथलेखनावरच या काळांत जास्त भर दिला गेला.

**प्राचीन मराठी कवितेचें प्रकाशन**

प्राचीन मराठी कवितेचा संग्रह करून तो प्रकाशित करणें गद्यवाङ्मयाच्या विकासाच्या दृष्टीनेंहि अत्यंत आवश्यक होतें. या बाबतींत पांडुरंग बापू जोशी पावसकर यांनी प्रथम प्रयत्न केला. इ. स. १८४० त 'ज्ञानचंद्रोदय' मासिकाच्या द्वारें त्यांनी जुनीं मराठी काव्यें प्रसिद्ध करण्यास प्रारंभ केला. त्यानंतर परशुरामपंत गोडबोले यांनीं इ. स. १८५४ त प्राचीन मराठी काव्यांतील निवडक वेंच्यांचा संग्रह करून 'नवनीत' या नावानें प्रसिद्ध केला. ह्या 'काव्यामृताच्या मेल्याची' लोकांना किती चटक लागली

* वि. ज्ञा. वि. पु. १० अंक ३

हे त्या पुस्तकाच्या आजपर्यंत निघालेल्या अनेक आवृत्त्यावरून लक्षांत येण्यासारखे आहे.

**पतितपरावर्तन, पुनर्विवाह**

इ. स. १८४० नंतर पतितपरावर्तन आणि पुनर्विवाह ह्या दोन महत्वाच्या सामाजिक प्रश्नाची चर्चा सुरू झाली. बाळशास्त्री जांभेकर यांनी त्या काळच्या समंजस शास्त्रीपंडितांच्या साह्याने श्रीपत शेषाद्रि या खिस्ती झालेल्या इसमाला प्रायश्चित देऊन पुनः हिंदुधर्मात घेतले. या शुद्धिकरणाला जगद्गुरु श्रीशंकराचार्य मठ कोल्हापूर यांचीहि अनुमति मिळविली होती. यासबंधींचा पत्रव्यवहार ' उपदेशचंद्रिका ' मासिकांत प्रसिद्ध झाला आहे. बाळशास्त्री जांभेकर हे महाराष्ट्रांत फार थोर पुरुष होऊन गेले. त्यांची बुद्धि अत्यंत कुशाग्र होती. विद्वत्ता, दिर्घोद्योग, धडाडी इत्यादि गुणामुळे त्याचे चरित्र त्यावेळच्या महाराष्ट्रीय तरुणाना आदर्शभूत वाटे. त्यांनी मराठी भाषेत अनेक वाङ्मय प्रकार रूढ केले. त्यांचे बाळव्याकरण, भूगोलविद्या, सारसंग्रह, हिंदुस्थानाचा इतिहास इत्यादि ग्रंथ प्रसिद्ध आहेत. त्यांच्यासारखा बहुश्रुत, विद्वान आणि कर्ता सुधारक वयाच्या अवघ्या छत्तिसाव्या वर्षी दिवंगत व्हावा हे महाराष्ट्राचे दुर्दैव होय. इ. स. १८४१ त ' पुनर्विवाहप्रकरण ' या नांवाचे एक लहानसे तीस पानी पुस्तक प्रसिद्ध झाले. त्यात शास्त्रग्रंथातील आधार देऊन पुनर्विवाहाची थोडक्यात तरफदारी केली होती. याच सुमारास बेळगावात दोन पुनर्विवाह झाल्याचें वृत्तहि ' प्रभाकर ' पत्रात ( २३ जानेवारी १८४२ ) प्रसिद्ध झाले होते.

**एकवीस वर्षांतील प्रगति**

गेल्या छत्तीस वर्षांच्या मानाने या एकवीस वर्षांत मराठी गद्याचा प्रसार बऱ्याच मोठ्या प्रमाणावर झाला. पूर्वीच्या गद्यवाङ्मयातील एकांगीपणा नाहीसा होऊन त्यामध्ये विविधता आली. नवे नवे वाङ्मयप्रकार रुढ होत चालले. निर-

निराळ्या शास्त्रीय विषयाची परिभाषा तयार होऊं लागली. भाषेतील प्रचलित शब्दप्रयोग आणि वाक्यरचना याना नियमबद्धतेची जोड मिळाली; आणि यथातथ्य रीतीने लेखकाचे मनोगत व्यक्त करण्याचे सामर्थ्य मराठी गद्यांत निश्चितपणे येत असल्याची सुचिन्हे दिसू लागलो.

इ. स. १८५० त दादोबा पांडुरंग यानी आपल्या मराठी भाषेच्या व्याकरणाची सुधारून वाढविलेली दुसरी आवृत्ति प्रसिद्ध केली. या व्याकरणाची पहिली आवृत्ति निघाली, त्यावेळी दादोबांचे वय अवघे बावीस वर्षांचें होतें. त्यामुळें त्यात बरेच दोष व अपूर्णता राहणे स्वाभाविक होतें. ही आवृत्ति शक्य तितकी निर्दोष व शास्त्रशुद्ध करण्याचा त्यांनी प्रयत्न केला आहे. प्रस्तावनेतील त्याच्या खालील उद्गारावरून तिचे महत्त्व लक्षात येईल "पूर्वी जे व्याकरण केलें होते, त्याचे गुणदोष तदुपपन्न भिन्नभिन्न विषयांचा न्यूनाधिकभाव, व त्या ग्रथाच्या पूर्णतेस आणखी नवे नवे असे जे अनेक विषय, त्याचे प्रतिपादक जे नियम, त्यांचा शोध आणि उपपत्ति यांचे सापेक्षत्व, या सर्व गोष्टींचे मी फार दिवस मनन करून, स्वशक्त्यनुसार हा ग्रंथ जितका पूर्णतेस नेववेल तितका नेऊन, विद्वज्जनांच्या आदरास पात्रीभूत करण्याचा उपाय शोधित होतो: ...... पुढे जसजसा हा ग्रंथ शोधित गेलो, तसतसा विस्तृत होऊन पुनः या ग्रथाची केवळ नवी रचना करावी लागली." इ. स. १८५४ त रेव्हरंड बर्जेस यानी मराठी भाषेचें व्याकरण इंग्रजीत लिहिले. जे. टी. मोलस्वर्थ यांनी हाती घेतलेले इंग्रजी—मराठी कोशाचे काम तसेच अर्धवट राहिलें होतें· तें मेजर क्याडी यांनी सतत सहा वर्षे परिश्रम करून इ. स. १८४७ त पुरें केलें. इ. स. १८५३ त अनंतशास्त्री तळेकर यांचा संस्कृत-प्राकृत कोश प्रसिद्ध झाला. या काळांत शास्त्रीय विषयांवर बरेच ग्रंथ निर्माण झाले. अर्थशास्त्रावर 'लक्ष्मीज्ञान,' 'संपत्तिविवेचन,' 'देशव्यवहार'

व्यवस्था ' आणि ' अर्थशास्त्रपरिभाषा,' वैद्यकावर ' निघंटप्रकाश,' ' शार्ङ्गधर वैद्यकग्रंथ,' हिंदुधर्मशास्त्रावर ' मिताक्षराव्यवहाराध्याय व मयूखदायभाग ' इत्यादि अनेक लहान मोठे शास्त्रीय ग्रंथ प्रसिद्ध झाले. याशिवाय पदार्थ-विज्ञानशास्त्र, रसायनशास्त्र, सृष्टिजन्य-ईश्वरज्ञान, यंत्रशास्त्र इत्यादि विविध विषयांवर ग्रंथरचना झाली. निबंध, इतिहास, चरित्रें, गोष्टी इत्यादि वाङ्मयविभागातहि हळुहळू भर पडत होती. इ. स. १८४८-५० या काळात गोपाळ हरी देशमुख ऊर्फ लोकहितवादी यांनी ' प्रभाकर ' पत्रात शंभराहून अधिक पत्रे प्रसिद्ध केली आणि त्यांत सामाजिक, ऐतिहासिक, राजकीय, धार्मिक वगैरे निरनिराळ्या विषयावरील आपली पुरोगामी विचार-प्रणालि निर्भीडपणे लोकापुढे मांडली. त्यानंतर विश्वनाथ नारायण, भवानी विश्वनाथ, गोविंद नारायण, बाबा पद्मनजी, कृष्णशास्त्री चिपळूणकर कृष्णशास्त्री राजवाडे, गणेशशास्त्री लेले इत्यादि नवीन लेखक उदयाला आले आणि त्यांनी मराठी गद्यवाङ्मयाला प्रौढ आणि भारदस्त स्वरूप देण्याचा यथाशक्ति प्रयत्न केला.

**उपयुक्त ज्ञानप्रसारक सभा**

मराठी गद्यवाङ्मयाच्या विकासाला प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष रीतीने कारणीभूत झालेल्या तत्कालीन संस्थाविषयी या ठिकाणी थोडीबहुत माहिती देणे अवश्य आहे. इ. स. १८४८ त स्टुडण्टस् लिटररी ॲन्ड सायण्टिफिक् सोसायटी या नावाची एक संस्था इंग्रजी शिक्षण घेतलेल्या काही एतद्देशीय गृहस्थांनी स्थापन केली. "उपयुक्त ज्ञानप्रसारक सभा" ही वरील संस्थेचीच एक शाखा होती. तिचे पहिले अध्यक्ष दादोबा पांडुरंग आणि उपाध्यक्ष व चिटणीस महादेव गोविंद शास्त्री कोल्हटकर हे होते. "शास्त्रीय व व्यावहारिक विषय स्वभाषेमध्ये शुद्ध रीतीने लिहिता यावे, व

स्वदेशामध्ये उपयुक्त ज्ञानप्रसार व्हावा, हा या सभेचा मुख्य उद्देश''* होता. तिची बैठक दर पंधरवड्यास भरत असे. तींत कोणातरी विद्वान व बहुश्रुत वक्त्याचे भाषण होई किंवा एखादा होतकरू तरुण आपण लिहून आणलेला निबंध वाचून दाखवी. या सभेने 'मराठी ज्ञानप्रसारक' या नांवाचें एक मासिकहि काढले होते त्यात वरील निबंध व व्याख्याने प्रसिद्ध होत असत. या संस्थेच्या विद्यमाने पहिल्या वर्षी सात व्याख्याने झाली; व उद्योग, एकी, सत्य, सृष्टिसौंदर्य, मराठ्याचा उत्कर्षापकर्ष इत्यादि विषयावर बारा निबंध वाचले गेले.

**दक्षिणी भाषेत पुस्तकें प्रसिद्ध करणारी मंडळी**

यानंतर इ. स. १८४९ त कर्नल फ्रेंच आणि क्याप्टन हार्ट या दोघांनी मुंबई इलाख्यातील अनेक थोर व उदार धनिकांच्या साहयाने "दक्षिणी भाषेत पुस्तकें प्रसिद्ध करणारी मंडळी" या नावाची दुसरी एक संस्था स्थापन केली. "हिचा मुख्य उद्देश असा होता की इंग्रजी भाषेतील उत्तम ग्रंथांचा मराठी भाषांतर करवावे व ती छापून मूळ किंमतीस लोकांना विकावी. ग्रंथ पसंत करण्याचे काम सभासदाकडे सोपविले होते. त्याच्या सल्ल्याप्रमाणे इंग्रजी ग्रंथाची योजना होत असे.''† या संस्थेचे पहिले अध्यक्ष नामदार विलबी साहेब कौन्सिलर हे होते. या मंडळीने बराच पैसा खर्च करून 'देशव्यवहारव्यवस्था', 'नानाफडणवीस याची बखर' 'शास्त्रीयज्ञानदर्शन' इत्यादि मनोरंजक व उपयुक्त ग्रंथ प्रसिद्ध केले. परंतु आमच्या लोकाची अनास्था व उपेक्षाबुद्धि यामुळे ह्या मंडळीचा उद्देश व्हावा तितका सफळ झाला नाही.

---

* मराठी ज्ञानप्रसारक पु १

† वि ज्ञा वि पु. १० अं ३

...३

## अर्वाचीन मराठी गद्याची पूर्वपीठिका

**दक्षिणा प्रैज कमिटी**

इ. स. १८५१ त पुणे येथें 'दक्षिणा प्रैज कमिटी'' या नांवाची आणखी एक वाङ्मयोत्तेजक संस्था स्थापन झाली. पेशवाईत दरवर्षी विद्वान् ब्राह्मणांस दक्षिणा वांटण्याची चाल होती. इंग्रजी राज्य स्थापन झाल्यानंतर आमच्यांतील सुधारलेल्या विद्वान् व वजनदार गृहस्थाच्या विनंतीवरून सरकारने ती चाल बंद केली, व या द्रव्याचा विनियोग मराठी ग्रंथ-लेखनाला उत्तेजन देण्याकडे व ''कॉलेजात फेलो म्हणून शिष्य-गुरु नेमण्याकडे करावा असे ठरविलें'' ह्या कामी गोपाळराव हरी देशमुख यांची खटपट मुख्य होती. ''त्यांनी त्यावेळी मराठी व इंग्लिश वर्तमानपत्रांतून याविषयी वारवार लिहून लोकांचे व सरकारचे डोळे उघडले'' वरील सरकारी ठरावाची अंमलबजावणी करण्यासाठीं 'दक्षिणा प्रैज कमिटी'ची स्थापना झाली. या सभेचे उद्देश, ''उपयुक्त विषयांवर मराठी भाषेत नवे नवे ग्रंथ तयार करवावे, होतकरू ग्रंथकारास त्याच्या योग्यतेप्रमाणे बक्षिसे द्यावी आणि महाराष्ट्रभाषा प्रौढ आणि ऊर्जितदशेस आणावी''‡ असे होते. या कमिटीच्या प्रोत्साहनाने मराठी भाषेत काही उपयुक्त गद्यपद्यात्मक ग्रंथ प्रसिद्ध झाले; परंतु कमिटीच्या कार्याला अपेक्षेप्रमाणे यश आले नाही, हे मान्य केल्यावाचून गत्यंतर नाही.

याशिवाय परमहंससभा, कल्याणोन्नायक मंडळी, ज्ञानप्रकाशसभा इत्यादि संस्था त्या काळी आपआपल्यापरीं महाराष्ट्राची सेवा करीत होत्या. इ. स. १८५४ त सरकारी विद्याखातें निर्माण झालें, इ. स. १८५७ त मुंबई विद्यापीठाचीहि स्थापना झाली; परंतु त्यापासून मराठी वाङ्मयाच्या दृष्टीने कांहीं विशेष लाभ झाला नाहीं, हे येथे नमूद करणे भाग आहे.

---

‡ वि. ज्ञा. वि. पु. १० अं. ३

इ. स. १८५७ त मोलस्वर्थकृत मराठी-इंग्रजी कोशाची दुसरी आवृत्ति निघाली. तिला जोडलेल्या विल्सन साहेबाच्या निबंधात गेल्या अर्धशतकातील मराठी वाङ्मयाविषयीं खालील उल्लेख आढळतो. त्यावरून अर्वाचीन मराठी वाङ्मयाचे वैशिष्ट्य ध्यानांत येईल.

"With the establishment of the English Government in Dakhan and Konkan, on the fall of the Peshwah's Government in 1818, a new era in Marathi literature commenced. It is not as yet an era of poetry, but of prose, and that to a great extent, especially where early translations are concerned, of a rugged character. It is destined, however, in the good providence of God, to be one of great importance. Religion and philanthrophy are the moving powers in generating and extending what may be denominated the reformed authorship of the Maharashtra, as well as that of other provinces in India"

याच कोशाच्या प्रस्तावनेत गेल्या पंचवीस वर्षांतील मराठी भाषेच्या प्रगतीसंबंधीं खालील अभिप्राय व्यक्त केला आहे.

"Above a quarter of a century has elapsed since the publication of the Marathi and English Dictionary. During this period ( 1831-57 ) much attention has been directed, and as well of natives as of Europeans and Americans, towards the culture of the Marathi language and the formation of a Marathi literature. General grammar has been studied; the grammar of the Marathi has been evolved and set in order, and terms of science and art have been created by translators and teachers"

# अर्वाचीन मराठी गद्याची पूर्वपीठिका

## ५

## ( इ. स. १८५७–१८७४ )

**कथा–कादंबऱ्या**

मागील एकवीस वर्षांच्या काळात मराठी भाषेमध्ये मुख्यतः शालोपयोगी व शास्त्रीय ग्रंथच प्रसिद्ध झाले. ह्या सतरा वर्षांत मात्र ललितवाङ्मयाच्या निर्मितीला अल्प प्रमाणावर का होईना, पण प्रारंभ झाला. इ. स. १८५७ त बाबा पदमनजी यांनी ' यमुनापर्यटण ' या नावाची मराठी भाषेतील पहिली स्वतंत्र कादंबरी लिहिली. त्यानंतर मुक्तामाला, रत्नप्रभा, मंजुघोषा, सुहास्यवदना, विचित्रपुरी, चंपकमाला इत्यादि अनेक अद्‌भुतरम्य कादंबऱ्या प्रसिद्ध झाल्या. या सर्व कादंबऱ्यांचा शेवट आनंदात झाला आहे. ' राजा मदन ' हीच काय ती त्या काळातील एक दुःखपर्यवसायी कादंबरी आहे. इ. स. १८७१ त गुंजीकरांची ' मोचनगड ' ही ऐतिहासिक कादंबरी प्रसिद्ध झाली. या काळच्या सगळ्या कादंबऱ्या कथानकप्रधान आहेत. स्वभावरेखनादि कलात्मक अंगांचा त्यात लवलेशहि नाही. अद्‌भुतरम्यता हेंच काय तें त्यांचें सारें भांडवल; आणि त्यावरच त्यांनी आपल्या लोकरंजनाचा कार्यभाग कसाबसा साधला. याशिवाय इंग्रजी भाषेतील काही कल्पित गोष्टींची भाषांतरेंहि या काळीं प्रसिद्ध झाली. त्यांतील कृष्णशास्त्री चिपळूणकर यांची " आरबी भाषेतील सुरस व चमत्कारिक गोष्टी " आणि ' रासेलस ' ही दोन भाषांतरें उत्कृष्ट वठली आहेत. त्याप्रमाणेच ' शेरास सव्वाशेर, ' ' विलक्षण न्यायचातुर्य, ' ' इलिझाबेथ, ' ' रिचर्डसनचरित्र ' इत्यादि भाषांतरात्मक ग्रंथही सुरस उतरले आहेत.

कादंबऱ्याप्रमाणेच मराठी नाट्य–वाङ्मयाचा उगमहि याच काळात झाला.

**नाटकें**

परशुरामपंत गोडबोले, कृष्णशास्त्री राजवाडे, गणेशशास्त्री लेले वगैरे पंडितांनीं संस्कृत भाषेतील उत्तमोत्तम नाटकांचीं मराठीत भाषांतरे करण्याचा उपक्रम केला. शेक्स्पीयरच्या नाटकाचा रसास्वाद मराठी वाचकांना घेता यावा म्हणून महादेवशास्त्री कोल्हटकर यांनी ‘ अथेल्लो ’ या नाटकाचें मराठी भाषांतर केले. त्यानंतर काशिनाथपंत नातू यांचे ‘ विजयासिंग ’ नाटक ( जुलियस सीजरचे भाषांतर ) प्रसिद्ध झाले. विनायक जनार्दन कीर्तने यांनी विद्यार्थी-दशेतच ‘ थोरले माधवराव पेशवे ’ आणि ‘ जयपाळ ’ हीं दोन नाटके लिहून मराठी भाषेतील स्वतंत्र नाट्य-वाङ्मयाचा पाया घातला. या काळातील पुष्कळशीं नाटकें भाषांतरात्मक आहेत आणि स्वतंत्र नाट्यग्रंथांतहि पौराणिक नाटकांचाच भरणा अधिक आहे. या नाटकांत तंत्रशुद्धतेचा लेशहि नाही. केवळ संवादरूप असल्यामुळेच त्यांना नाट्य-वाङ्मयात स्थान मिळाले. ‘ मनोरमा ’ आणि ‘स्वैरसंकेशा’ हीं दोनच सामाजिक नाटकें लिहिली गेलीं आणि त्यांत ह्या काळातील विधवाविवाहाच्या चळवळींचें प्रतिबिंबहि पडले आहे. याशिवाय ‘ अफझलखानाच्या मृत्युचे नाटक, ’ ‘ झाशीचे राणीचें नाटक, ’ ‘ श्रीभिल्लिणी, ’ ‘ सायुज्यसदन, ’ ‘ हंसपालिका ’ इत्यादि अनेक नाटकें या काळीं प्रसिद्ध झालीं पण त्यात वाङ्मयाच्या खऱ्या कसोटीला उतरेल असे एकहि नाही असे म्हटले तरी चालेल.

या काळातील निबंध–वाङ्मय बव्हंशी नियतकालिकांतून प्रसिद्ध झाले.

**निबंध**

गोविंद नारायण, भवानी रामकृष्ण, बाळ मंगेश वागळे, जनार्दन सखाराम गाडगीळ, विनायक जनार्दन कीर्तने, महादेव मोरेश्वर कुंटे, इत्यादि लेखकांनीं धार्मिक, सामाजिक,

ऐतिहासिक, औद्योगिक वगैरे निरनिराळ्या विषयावर 'मराठी ज्ञानप्रसारकांत' लहान लहान पण मुद्देसूद व मार्मिक निबंध लिहिले. त्यांची रचना सामान्यतः इंग्रजी भाषेतील शालेय निबंधांच्या धर्तीवर आहे. भवानी विश्वनाथ यांचा 'मुंबईतील सुशिक्षित तरुण हिंदु लोक' हा निबंध फारच उत्कृष्ट वठला आहे. याशिवाय 'हिंदु लोकांचा मध्यन्तरीय अवस्थेविषयी विचार' 'सुख-दायक राज्यप्रकरणीं निबंध.' 'नावल व नाटक ह्याविषयीं निबंध,' 'आमचें कर्तव्यकर्म कोणतें' इत्यादि निबंध या काळीं लिहिले गेले.

**पुनर्विवाह**

इ. स. १८६४–७४ या दहा वर्षांत पुनर्विवाहाच्या प्रश्नावर महाराष्ट्रात मोठी खडाजंगी झाली. दोन्ही पक्षाच्या अभिमान्यानीं लेख, व्याख्याने, वादविवाद, इत्यादि साधनांच्या द्वारें आपआपला मतप्रचार जोरांत सुरू केला होता. विष्णुशास्त्री पंडित यांनीं इ. स. १८६५ त गोपाळराव देशमुख व महादेव गोविंद रानडे यांच्या सहकार्यानें 'पुनर्विवाहोत्तेजक मंडळी'ची स्थापना केली आणि तिच्या विद्यमानें कांहीं पुनर्विवाहहि घडवून आणिले. या विषयावर अनुकूल–प्रतिकूल असे 'विधवाविवाह,' 'विधवाविवाहखंडन,' 'विधवा-विवाहनिषेध,' 'विश्वस्तोद्वाहकलिका' इत्यादि सात–आठ ग्रंथ ह्या दशकांत प्रसिद्ध झाले.

**जोतिबा फुले**

जोतिबा फुले यानी 'ब्राह्मणाचें कसब' (इ. स. १८६९) व 'गुलामगिरी' (इ. स. १८७३) हीं दोन पुस्तकें लिहून ब्राह्मणांच्या सामाजिक वर्चस्वावर जोराचा हल्ला चढविला, आणि खालच्या जातींतील लोकाना आपल्या हक्कांची जाणीव करून दिली. 'एका हिंदूनें' लिहिलेला 'जातिभेदविवेक-

सार ' हा ग्रंथहि त्यांनींच प्रसिद्ध केला. संघटित रीतीनें आपल्या मतांचा प्रचार करतां यावा म्हणून त्यांनी इ. स. १८७३ त सत्यशोधक समाजाची स्थापना केली. मिशनरी लोकांच्या आहारीं गेल्यामुळे त्यांचे प्रचारात्मक लिखाण द्वेषमुलक झाले असले तरी त्यात ब्राह्मणांच्या जळजळीत द्वेषाबरोबरच दलित वर्गाविषयींची तीव्र तळमळहि दिसून येते ही गोष्ट मान्य केल्यावाचून गत्यंतर नाहीं.

**इतिहास-चरित्रें**

हिंदुस्थानाच्या इतिहासाविषयी प्रसिद्ध झालेल्या पुस्तकांत एल्फिन्स्टन–मालकम–मरे–मॉरिस या परकीय इतिहासकाराच्या ग्रथांची भाषांतरेच माहितीच्या व मांडणीच्या दृष्टीने महत्त्वाची आहेत. विष्णु गोपाळ भिडे यांनी "श्रीमंत छत्रपति शिवाजी महाराज यांचे वंशाचा व प्रतिनिधि आणि अष्टप्रधान यांचा इतिहास" ( इ. स. १८६६ ) हा स्वतंत्र ग्रंथ लिहिला. नीळकंठ जनार्दन कीर्तने यांनी ' ग्राट-डफकृत मराठ्यांच्या बखरीवर टीका ' करून स्वदेशाच्या इतिहासाचा आस्थापूर्वक अभ्यास करण्याची दिशा दाखवून दिली. इंग्लंड, ग्रीस, रोम या देशांचेहि संक्षिप्त इतिहास प्रसिद्ध झाले. हिंदुस्थानांत होऊन गेलेल्या असंख्य थोर पुरुषांपैकीं नाना फडणवीस, राजा राममोहनराय आणि विष्णुबावा ब्रह्मचारी या तिघांचीच चरित्रें या काळीं प्रसिद्ध झालीं. महाराष्ट्रातील उदयोन्मुख लेखकांना शिवाजी महाराज, पहिले बाजीराव, महादजी शिंदे, सदाशिवरावभाऊ इत्यादि पराक्रमी वीरांचीं चरित्रे लिहिण्याची इच्छा झाली नाहीं; उलट इंग्रजी भाषेतील चरित्र–ग्रंथांचीं भाषांतरें करण्यांतच त्यांनी धन्यता मानली.

**व्याकरण–कोश-साहित्य-शास्त्र**

कृष्णशास्त्री गोडबोले यांनी व्याकरणशास्त्राचा तुलनात्मक अभ्यास करून ' मराठी भाषेचे नवीन व्याकरण ' लिहिले. त्यात त्यांनी शब्दविचार, वाक्यविचार, पद्य–विचार आणि संस्कृत व प्राकृत भाषांशी मराठीचा निकट संबध याचे विवेचन करून, शेवटी प्राकृत भाषेचे संक्षिप्त व्याकरण आणि संस्कृत–प्राकृत शब्दकोशहि दिला आहे. रघुनाथ भास्कर गोडबोले, विष्णु परशुराम पंडित. रावजी केशव सावारे, बाबा पदमनजी, श्रीकृष्णशास्त्री तळेकर, आणि माधव चंद्रोबा यांनी निरनिराळे कोश तयार करून मराठी कोश–ग्रथात बरीच भर घातली. वृत्तदर्पण, रसमाधव आणि साहित्यशास्त्र हे साहित्यविषयक ग्रंथ या काळीं प्रसिद्ध झाले.

**धर्म–नीति तत्त्वज्ञान**

धर्म, नीति व तत्त्वज्ञान या विषयावरील बहुतेक ग्रथ टीकात्मक अथवा भाषांतरित आहेत. विष्णुबावा ब्रम्हचारी यांचा याचा ' वेदोक्त–धर्मप्रकाश ' हा ग्रंथ स्वतंत्र असून त्यातील विवेचनपद्धति नावीन्यपूर्ण आहे. रघुनाथ शास्त्री पर्वते यांनी ' भाषाविवृति ' या नावाची गीताशास्त्राची प्राकृत टीका प्रसिद्ध केली. या शिवाय मार्टिन हौग याचे ' वेदावरील निबंध ' ' वेदांतसाराचे मराठी भाषांतर ' ' महाभारत ग्रंथातील राजधर्म, ' ' पंचदशी या ग्रथाची महाराष्ट्र व्याख्या ' इत्यादि धार्मिक व तत्त्वज्ञानविषयक ग्रंथ या काळी लिहिले गेले. ब्राह्मधर्मासंबधीहि दोन पुस्तके प्रसिद्ध झाली. पाश्चात्य तत्वज्ञानासबंधी मात्र एकहि ग्रथ लिहिला गेला नाही.

**शास्त्रीय वाङ्मय**

शास्त्रीय वाङ्मयातहि या सतरा वर्षात बरीच भर पडली. कृष्णशास्त्री भाटवडेकर यांनी संस्कृत भाषेतील ' वैद्यावतंस ' 'वैद्यजीवन,' 'वैद्यामृत,' 'माधवनिदान' इत्यादि वैद्यकीय ग्रंथाची मराठीत भाषांतरे केली. पाश्चात्य वैद्यकासंबधीहि इंग्रजी

ग्रथांच्या आधाराने ' वैद्यतत्व, ' ' न्यायवैद्यक, ' 'शास्त्रवैद्यक,' ' बालरोग चिकित्सा,' 'गर्भविद्या आणि प्रसूतिकरण,' इत्यादि ग्रथ प्रसिद्ध झाले. भिकाजी अमृत चोभे यानी ' मानुषशारीरशास्त्र ' आणि ' मानुषइदियविज्ञानशास्त्र ' हीं दोन पुस्तकें लिहिलीं. ' गृहसाधनाचीं कोष्टकें, 'ज्योतिःशास्त्र,' ' आकाश-सौंदर्य, ' 'तिथिचिंतामणि ' इत्यादि ज्योतिषविषयक ग्रथ लिहिले गेले. ' हिंदु धर्मशास्त्र,' 'महमदीशास्त्र,' "अपकृत्यशास्त्र,' 'प्रमाणशास्त्र ' इत्यादि कायद्याची पुस्तकें प्रसिद्ध झालीं. याशिवाय पदार्थविज्ञानशास्त्र, रसायनशास्त्र. शिल्पशास्त्र, नौकानयनशास्त्र, मल्लविद्या, शिवणकला, सगीत, फोटोग्राफी, इत्यादि विषयावर अनेक लहान मोठे ग्रथ लिहिले गेले. यातील बहुतेक पुस्तकें भाषातरवजा आहेत, तरीपण त्याच्यामुळेच मराठी भाषेत निरनिराळ्या शास्त्राची परिभाषा तयार होऊ लागली, ही गोष्ट विसरून चालणार नाहीं.

**नियतकालिकें**

या काळात मराठी भाषेत बरीच नियतकालिकें निघाली त्यापैकीं पुणे पाठशालापत्रक, विविधज्ञानविस्तार, दभहारक आणि ज्ञानसंग्रह या चार मासिकाचा प्रामुख्याने उल्लेख करणे जरूर आहे. यामधून प्रसिद्ध झालेल्या विविध विषयांवरील प्रौढ व भारदस्त लेखांनी मराठी गद्यवाङ्मयाच्या या विभागाला फार चागले वळण लाविले. वृत्तपत्रसृष्टींत ज्ञानोदय, ज्ञानप्रकाश आणि इंदुप्रकाश ही तीन पत्रे ठळकपणे लक्षात घेण्यासारखी होतीं.

**प्राचीन ग्रंथ-प्रकाशन**

माधव चद्रोबा यांनीं इ. स. १८६० सालीं प्राचीन काव्याचें परिश्रमपूर्वक संशोधन करून, तीं ' सर्वसंग्रह ' मासिकाच्या द्वारें प्रकाशित करण्याचा उपक्रम केला; आणि पुढील सात आठ वर्षांत समग्र आर्याभारत व आनंदतनय, वामन

पंडित, तुकाराम, रामदास, मुक्तेश्वर, वगैर प्राचीन कवींची बरीच कविता प्रसिद्ध केली. इ. स. १८६९ त विष्णुशास्त्री पंडित आणि शंकर पाडुरंग पंडित यांनीं तुकारामाचा गाथा चिकित्सापूर्वक शोधून छापला. याशिवाय बापू हरशेट देवळेकर, विठ्ठल सखाराम अग्निहोत्री आणि नारो आप्पाजी गोडबोले यांनीं बऱ्याच मोठ्या प्रमाणावर मराठी काव्ये प्रकाशित केलीं.तसेंच चौबळ, बापट आणि दिघे यानीं ' रामदासस्वामीची बखर ' प्रसिद्ध करून अर्वाचीन महाराष्ट्राला प्राचीन गद्याची प्रथम ओळख करून दिली.

**संकीर्ण वाङ्मय**

' मुंबईचे वर्णन ' व ' पुणे शहरचे वर्णन ' हे दोन स्थलवर्णनात्मक ग्रंथ आणि 'प्रसिद्ध स्थळें,' 'इंग्लडांतील प्रवास' 'गोकर्णमहाबलेश्वराच्या यात्रेप्रकरणी वृत्तान्त ' आणि ' काशीयात्रा ' ही प्रवासवर्णनपर पुस्तके या काळीं लिहिलीं गेली. मोरोपतांच्या केकावलीवर दादोबांची ' यशोदापाडुरंगी ' आणि परशुराम तात्यांचा 'केकादर्श' हे दोन टीकाग्रंथ प्रसिद्ध झाले. याशिवाय ' निःशास्त्र-वादपरिक्षा, ' ' बालोपयोगी सर्वसग्रह, ' ' श्रृंगारशतक ' ( गद्य-भाषांतर ) 'मधुक्षिका, ' ' गद्यरत्नावलि ' इत्यादि अनेक प्रकारचीं पुस्तकें या काळांत छापलीं गेलीं.

## ६

मालापूर्वकालीन मराठी गद्याचा आपण थोडक्यात आढावा घेतला. या काळांतील गद्यलेखकांनीच अर्वाचीन मराठी वाङ्मयाचा पाया घातला. उच्च वाङ्मयाच्या कसोटीला जरी त्यांचे ग्रंथ उतरले नाहींत, तरी त्यामुळें त्यांचे ऐतिहासिक महत्त्व मुळीच कमी होत नाहीं: आणि म्हणन मराठी साहि-

त्याच्या अभ्यासकांनं त्याची उपेक्षा करणे योग्य होणार नाही. मालापूर्वकालीन गद्यवाङ्मय प्रायः भाषांतरात्मक आहे. त्यांतील स्वतंत्र ग्रंथाची संख्या फार थोडी आहे आणि याचं कारणहि अगदी उघड आहे.

**मराठी गद्याची पुनर्घटना**

पेशवाईच्या अस्तानंतर महाराष्ट्रातील बहुसंख्य लोक केवळ शरीरानेच नव्हे, तर मनानेहि गुलाम झाले होते. मानसिक दास्याच्या त्या दूषित वातावरणात प्रतिभेच्या स्वैर संचाराला थोडादेखील वाव मिळणें शक्य नव्हते. कोणत्याहि गोष्टीचा स्वतंत्र दृष्टीने विचार करण्याची कुवतच आमच्यांत राहिली नव्हती. आमच्यांतील आत्मविश्वास समूळ नाहीसा झाला होता. यामुळे स्वाभाविकपणें प्रत्येक बाबतीत आम्हाला परकीयाच्या ओंजळीनं पाणी पिण्याची संवय जडली. वाङ्मयाच्या क्षेत्रांतहि हाच प्रकार अनुभवास आला. एकोणिसाव्या शतकाच्या पूर्वार्धात महाराष्ट्रातील नवशिक्षित तरुण इंग्रजी भाषेची वाङ्मयसंपत्ति पाहून दिपून गेले. या प्रभावशाली वाङ्मयाचें साह्य घेतल्याशिवाय मराठी भाषेचा तरणोपाय नाही अशी त्यांची खात्री पटली. आपल्या मातृभाषेचे वाङ्मयीन दारिद्र्य दूर करण्याचा त्यांनीं निश्चय केला आणि ते इंग्रजी ग्रंथांच्या आधाराने मराठी भाषेत नवीन ग्रंथरचना करण्याच्या प्रयत्नास लागले.

**जातिवंतपणाचा अभाव**

इंग्रजी वाङ्मयाच्या धर्तीवर मराठी गद्याची पुनर्घटना करतांना प्राचीन पद्यग्रंथांचा काळजीपूर्वक अभ्यास करणे आवश्यक होते, परंतु आमचे लोक परप्रत्ययनेयबुद्धि झाल्यामुळे, त्यांना या गोष्टीची जाणीव झाली नाहीं. प्राचीन गद्य विसकळीत स्वरूपांत असल्यामुळें त्याचीहि कोणाला फारशी माहिती नव्हती. अर्थात्

विचार, मांडणी आणि भाषा या तिन्ही बाबतीत मराठी गद्याला इंग्रजी वाङ्मयावरच अवलंबून रहावे लागले. शब्द मराठी, पण वाक्यरचनेची घाटणी मात्र पुष्कळ अंशी इंग्रजी, अशी सुरवातीच्या गद्यग्रंथाची स्थिति होती. प्राचीन परंपरेचा आधार न मिळाल्यामुळे अर्वाचीन मराठी गद्याची अवस्था एखाद्या अनाथ, बेवारशी मुलाप्रमाणे झाली होती. आईचे दूध त्याला मिळाले नाही. दाईच्या भाडोत्री दुधावरच त्याची वाढ झाली. यामुळे मालापूर्वकालीन गद्यांत जातिवंतपणाचा अभाव प्रामुख्याने दिसून येतो.

**सामान्य ग्रंथांचीच भाषांतरें**

एकोणिसाव्या शतकातील पहिल्या पंचवीस वर्षांत मुख्यतः शालोपयोगी पुस्तकांचेच तर्जुमे प्रसिद्ध झाले. पुढील पंचवीस वर्षांतहि भाषांतरासाठी निवडलेले इंग्रजी ग्रंथ अगदी सामान्य प्रतीचे होते. इंग्रजी भाषेतील उत्तमोत्तम ग्रंथांची भाषांतरे करण्याचे धाडस कोणीहि केले नाही. इंग्रजी वाङ्मय हे वाघिणीचे दूध असले तरी ते पचविण्याची त्या काळी आमच्या अंगी शक्ति नसल्यामुळे महाराष्ट्रीय लेखकवर्ग प्राथमिक स्वरूपाच्या वाङ्मयावरच संतुष्ट राहिला. संस्कृत भाषेतील कांही प्रसिद्ध नाटकांची व धर्मग्रंथांची भाषांतरे केली गेली, परंतु एकंदरीत पाहता या काळातील गद्यवाङ्मय निकृष्ट प्रतीचेच आहे असे म्हणावे लागते.

**भाषांतरें यथार्थ व कलापूर्ण नाहींत.**

उत्कृष्ट भाषांतर करणे ही सुद्धा एक कला आहे. मुळातील अर्थच नव्हे, तर रसहि भाषांतरात हुबेहुब उतरविणे हे महाकठीण कर्म आहे. या दृष्टीने पाहिले, तर ह्या काळातील भाषांतरात्मक ग्रंथांपैकी सदाशिव काशिनाथ छत्रे आणि कृष्णशास्त्री चिपळूणकर यांच्याशिवाय कोणाचेहि ग्रंथ सरस वठलेले नाहींत. बहुतेक ग्रंथांतून मुळातील आशय स्थूलमानाने कसा-

तरी प्रगट करण्याची प्रवृत्ति दृष्टीस पडते. शास्त्रीपंडितांची भाषा क्लिष्ट व बोजड आहे, तर इंग्रजी शिकलेल्यांचे लिखाण अव्यवस्थित व भेंडगुजरी झाले आहे. यामुळ मालापूर्वकालीन वाङ्मयात सरळ, सुगम व मनोरम गद्यशैलीचे नमुने फारच क्वचित आढळतात.

या काळातील स्वतंत्र ग्रंथाना वाङ्मयदृष्ट्या फारसे महत्त्व नाही. दादोबा पांडुरंग, लोकहितवादी, विनायक जनार्दन कीर्तने, नीळकंठ जनार्दन कीर्तने लक्ष्मण मोरेश्वर हळबे, विष्णु गोपाळ भिडे, विष्णुबावा ब्रह्मचारी इत्यादि लेखकांनी थोडीफार स्वतंत्र ग्रंथरचना केली, पण भाषांतरात्मक ग्रंथविस्ताराच्या मानाने ती फार कमी आहे. बाल्यावस्थेतील हे मराठी गद्य कितीहि सदोष असले तरी निराशाजनक नाही. सदगतीने का होईना पण त्याची वाढ होत होती. त्याची प्रगमन-शीलताच भविष्यकालाच्या उज्वलतेविषयी आशा उत्पन्न करण्याला पुरेशी होती. या वाङ्मयासंबंधी न्यायमूर्ति रानडे यांच्या खालील अभिप्रायावरून मालापूर्वकालीन मराठी गद्याच्या स्वरूपाची यथार्थ कल्पना येईल.

> "It is true the entire picture thus presented to the view is far from satisfactory if one looks at it absolutely The stage of advance which the language has at present reached is to be hailed more for the promise it holds for the future than for any accomplished success of the past" †

---

† **M. G. Ranade**—*Remarks on the Marathi Catalogue*

# २ कथात्मक वाङ्मय.

**प्राचीन कथावाङ्मय**

लोकरंजनासाठीं किंवा लोकशिक्षणासाठीं गोष्टी सांगण्याची चाल जगातील सर्व देशांमध्ये फार प्राचीन काळापासून चालत आलेली आहे. गोष्टींच्या द्वारें केलेला उपदेश सामान्य लोकांच्या मनात चांगला ठसतो, हे लक्षात घेऊन प्राचीन धर्मोपदेशकांनींहि धर्मप्रसाराचे प्रभावी साधन म्हणून कथावाङ्मयाचाच आश्रय घेतला. यामुळें पौर्वात्य किंवा पाश्चात्य कोणत्याहि भाषांचा इतिहास पाहिला, तरी त्यांत कथात्मक वाङ्मयाचा विस्तार फार मोठ्या प्रमाणांत झालेला आढळून येतो. मराठी भाषाहि या नियमाला अपवाद असण्याचा संभव नाहीं. गेल्या हजार वर्षांच्या काळात मराठी भाषेमध्ये शेकडों लोककथा प्रचलित असतील, व त्यांच्या द्वारें महाराष्ट्रातील लोक आपल्या मनाची करमणूक करून घेत असतील यांत कांहीं संशय नाहीं; पण परकीय संस्कृतीशीं समरस होण्याच्या भरात खेडयापाडयांतील अज्ञ जनतेनें पिढयानपिढया अत्यंत जिव्हाळ्याने जतन केलेल्या त्या अस्सल मराठी कथावाङ्मयाला आपण पूर्णपणे पारखे झालेलों आहोंत. अद्यापिहि वृद्ध स्त्रियांच्या तोंडून ऐकावयास मिळणाऱ्या मनोरंजक कहाण्या हा प्राचीन कथा–वाङ्मयाचा महत्त्वाचा भाग आहे. याखेरीज आज उपलब्ध असलेले

प्राचीन मराठी कथात्मक वाङ्मय प्रायः पद्यमय व धार्मिक स्वरूपाचें आहे. इंग्रजी राज्य स्थापन होण्यापूर्वी मुद्रणकलेची माहिती नसल्यामुळें गद्य-लेखनाची प्रवृत्ति बळावणें शक्य नव्हते. उद्बोधक विचार आणि अभिनव कल्पना पद्यामध्यें ग्रथित करून लोकांपुढे मांडणें प्रसाराच्या दृष्टीनें सोयीचें पडे. निवृत्तिधर्माचें फाजील स्तोम माजल्यामुळें त्यावेळच्या पंडितांनाहि लौकिक विषयावर लिहिणे म्हणजे मोलाचें आयुष्य वाया दवडण्यासारखें आहे असें वाटत असे; व म्हणूनच त्यांनी परमेश्वराची अवतार–कृत्यें व साधुसंतांचीं चरित्रे यावर ग्रंथरचना केली. भगवन्नामाचा महिमा वर्णन करणे, हाच वाङ्मयाचा मुख्य विषय झाला. ह्या एकांतिक परमार्थ–प्रवणतेमुळे आंग्लपूर्वकालीन मराठी वाङ्मय एकाच ठराविक साच्याचें झाले असलें तर त्यात कांहीं नवल नाही.

**गद्यात्मक कथालेखनाचा उपक्रम**

एकोणिसाव्या शतकाच्या आरंभीं महाराष्ट्रात हळुहळू छापील ग्रंथाचा प्रसार होऊं लागला, मराठी वाङ्मयाच्या इतिहासांतील नवीन युगाला आरंभ झाला; आणि त्याबरोबरच गद्यात्मक कथालेखनाच्या प्रवृत्तीला जोर चढला. सुरवातीचे मराठी गोष्टीरूप ग्रंथ सर्वच भाषांतरा-त्मक होते. इंग्रजी, संस्कृत व बंगाली भाषातील निवडक नीतिकथांची भाषांतरें करून मराठी भाषेच्या द्वारे नवीन कल्पना व विचार व्यक्त कर-ण्याचा प्रयत्न सुरू झाला. इ. स. १८०६ मध्यें तंजावर येथील सरफोजी राजे यानीं इसापनीतीचें मराठी भाषांतर करवून 'बालबोध-मुक्तावलि' या नांवानें प्रसिद्ध केलें. त्यानंतर डॉ. केरी यांनीं वैजनाथ पंडित यांचे-कडून 'सिंहासनबत्तीसी,' ( इ. स. १८१४ ) 'हितोपदेश' ( इ. स. १८१५ ) व 'पंचतंत्र' ( इ. स. १८१४ ) ह्या संस्कृत गोष्टीरूप

ग्रंथाची मराठी भाषांतर करवून श्रीरामपुर येथील मिशन प्रेसमध्ये छापिली. त्यांची विस्तृत माहिती ' सामान्य निरूपण ' या प्रकरणात आलेलीच आहे.

**सिंहासनबत्तीसी**
**( मुंबई इ. स. १८२४ )**

अशा रीतीनें तंजावर व श्रीरामपुर येथे मराठी गोष्टींची पुस्तकें प्रसिद्ध होऊं लागली होती. तरी त्या पुस्तकांचा महाराष्ट्रांत फारसा प्रसार झालेला नव्हता. इ. स. १८२४ त कुरियर छापखान्यात सिंहासनबत्तीसीचें महाराष्ट्र भाषांतर प्रसिद्ध झालें. ह्या पुस्तकांतील भाषा श्रीरामपुर येथे प्रसिद्ध झालेल्या सिंहासनबत्तीसीच्या भाषेपेक्षा जास्त शुद्ध व सरस आहे. मधूनमधून सामासिक शब्दांची योजना व संस्कृत भाषेच्या धर्तीवर शब्दप्रयोग आढळतात; तरी पण निव्वळ मराठी जाणणाऱ्यानाहि हें भाषांतर सहज समजण्यासारखे आहे. यातील एक गोष्ट खाली देत आहे.

" विक्रमराजा एके दिवशीं वसंत ऋतुमध्ये चंपक वनात गेला. ते वन असे पाहिले कि रम्य पुष्करिणी अनेक प्रकारच्या कमलें-करून युक्त-हंस मयुर कोकिल यांहीकरून शोभित-नानाप्रकारचे वृक्ष वेली आणि जाईजुई चमेली मालती मोगरा इत्यादिकानीं वेष्टित असे पाहुन तेथे एक रमणीय बंगला बांधवून त्यांत बहुत कारंजीं करवून स्त्रियांबरोबर जलक्रीडा करूं लागला. त्या वनात एक तपस्वी तप करीत होता त्याणे तो राजाचा विलास पाहून आपल्या मनात विचार केला कीं ह्या लोकीचे सुख सोडून स्वर्ग-लोकींच्या सुखाची इच्छा करणे यात काय विशेष. येथे अनेक प्रकारिचे कष्ट भोगून मेल्यानंतर त्यालोकचे भोग भोगावे यापेक्षा येथेच विषयसुख भोगावे हे फार बरे दिसतें. असे मनात आणून तो तपस्वी विक्रमाजवळ गेला. राजाने त्याचा सत्कार करून पुसलें कीं आपली इच्छा काय आहे. तो बोलला हें राजा मी

देवीजवळ तप करित असता देवीने दृष्टांत दिला की तूं तप पुरे कर तुझ्या तपाने मी प्रसन्न झाल्यें तर तुं विक्रमाजवळ जाऊन संसार सुखाचा अनुभव माग असा दृष्टांत झाला तो तुला सांगितला. संसार सुख भोगायाविषयीं देवीचा आज्ञा आणि माझीही इच्छा आहे. असे त्या तपस्व्याचे भाषण ऐकोन विक्रम आपल्या मनांत म्हणाला याला देवी दृष्टांत देऊ अथवा न देऊ परंतु यास माझी क्रीडा पाहुन येथे आपण क्रीडा करावी अशी इच्छा झाली आहे ती आपण पुरवावी. मग विक्रमानें तेथे मोटे नगर वसऊन त्या नगराचा राज्याभिषेक त्या तपस्व्यास केला आणि त्याचे उपजीविकेकरिता दुसरेहि बारा गाव त्यास दिले तेणेकरून तो तपस्वी संसार सुखाते अनुभविता झाला. "†

**शालोपयोगी गोष्टीरूप ग्रंथ**

इ. स. १८२२ त मुंबई येथील शिक्षा–मंडळीची स्थापना झाली व तिच्या ग्रंथप्रकाशन–पोटमंडळाकडून शालोपयोगी गोष्टीरूप ग्रंथ प्रसिद्ध होऊं लागले. ह्या मंडळीत सदाशिव काशिनाथ छत्रे हेच एक मराठी भाषेचे प्रतिनिधि होते. त्यांनीं 'बाळमित्र' भाग १ (इ. स. १८२८), 'इसपनीति-कथा' (इ. स. १८२८) व 'वेताळपंचविशी' (इ. स. १८३०), "हे सुरस व सुबोध ग्रंथ साध्या व व्यावहारिक मराठी भाषेनें लिहून प्रसिद्ध केले. हे ग्रंथ भाषांतररूप असूनही यांत मराठी भाषेचें साधें स्वरूप आढळतें हा चमत्कार होय–"* ह्यापैकी 'बाळमित्र' हा 'Berquin's Children's Friend' ह्या फ्रेंच ग्रंथाच्या इंग्रजी भाषांतराचा मराठी तर्जुमा होय. हा फारच सरस उतरला आहे. "यात

† सिंहासनबत्तीसी पृ. ३०–३१

* वि. ज्ञा. वि. पु. १० अं. ३

...४

सृष्टीचे वर्णन व मनुष्यस्थितीचे चित्र हीं फारच मनोवेधक रीतीने वठलीं आहेत. "* 'बाळमित्र व इसपनीतिकथा या दोन ग्रंथावर दादोबांनी आपल्या आत्मचरित्रांत खालील अभिप्राय लिहिलेला आहे. "हे दोन्ही ग्रंथ फार सुरस झाले होते. तीं भाषांतरे आहेत असे त्यावेळेस कोणास वाटत नसे. मराठींत सरस रीतीने फकीकेत लिहिणारे हेच पहिले. त्याच्या मागून आम्ही सर्व लिहिणारे झालो. "$

**सदाशिव काशिनाथ छत्रे**
**(इ. स. १७८८–१८३०)**

सदाशिव काशिनाथ ऊर्फ बापू छत्रे याचा जन्म मुबईस वाळकेश्वरी इ. स. १७८८ त झाला. हे जातीचे कोकणस्थ ब्राह्मण. याच्या प्राथमिक शिक्षणाबद्दल काहीच माहिती मिळत नाही. त्या काळात इंग्रजी शिक्षणाच्या सार्वजनिक शाळा नसल्यामुळे त्यानी खासगी रीतीनेच इंग्रजी भाषेचे अध्ययन केले असावे. आरंभीं हे 'इजनीयरच्या अफीसात रैटर होते.' "त्यावेळीं सदाशिव काशिनाथाप्रमाणें इंग्लिश भाषा जाणणारे या मुंबई इलाख्यात एतद्देशीय लोकांमध्ये कोणीच नव्हते...... त्याणीं या परदेशी भाषेचे इतके सूक्ष्म व शुद्ध ज्ञान केवळ आपल्या बुद्धिकौशल्याने व श्रमानेच संपादन केले यात अगदीं संशय नाहीं."† मराठी भाषेच्या मार्मिक ज्ञानाबद्दल तर त्याची सर्वत्र ख्याति होती. मराठी ग्रंथप्रकाशनाचे कामात हे जर्व्हिससाहेबाचे मुख्य मदतनीस होते. सरकारी शाळावर देखरेख करण्याच्या कामीहि याची नेमणूक झाली होती. हे पेन्शनात जाण्यापूर्वी नेटिव्ह स्कूल सोसैटीचे नेटिव्ह सेक्रेटरी होते. हे

* वि. ज्ञा.—वि. पृ. ३१ अं. ९–१०

$, † दादोबा आत्मचरित्र पृ. २०

इ. स. १८३० त निवर्तले. त्यांनीं आपल्या काळांत मराठी भाषेची बहुमोल सेवा करून पुढल्या पिढीला शुद्ध व रसाळ गद्य-लेखनाचा धडा घालून दिला. इसपनीतिकथेतील खालील गोष्टीवरून त्याच्या लेखन-शैलीची कल्पना येईल.

## लोभी मनुष्य

"कोणी एक लोभी मनुष्यानें पयसा साचवून शेतात पुरून ठेविला. तेथें नित्य एकदोन वेळ त्याणे जात असावे आणि पयसा पुरलेले ठिकाण पाहुन मनात संतोष पावत असावें. ते त्याचें कृत्य चाकराने लक्षात आणून त्यावर तर्क बाधिला की आपला धनी या जागेकडे नित्य नित्य पाहातो तस्मात् येथे काही विशेष आहे. मग त्याणे रात्रीस येऊन जागा खणून पाहिली तंव आत ठेवा सापडला तो घेऊन पळून गेला. दुसरे दिवसी लोभी मनुष्य नित्याप्रमाणे तेथे येउन पाहो लागला तंव ठेवा गेला हे समजून त्याणे डोईत धूळ घातली उर बडवुं लागला आणि हाय हाय करून रडत बसला तो घरी जाईना. शेवटी त्याचा शेजारी त्यापाशी तेथ आला त्याणे वर्तमान पुसिले त्यास लोभ्यानें सर्व सागीतले ते ऐकून शेजारी म्हणतो रे बाबा मला असे वाटते की तुझे काहीं गेले नाही तूं आपल्ये चित्तांत पयसा गेला असे न आणितां, या खांचेकडे नित्य पाहात होतास तसाच पाहात जा म्हणजे तुझे काम झाले.

## तात्पर्य

लोभी आहेत ते पयसा असून दाळिद्री. ते असते द्रव्याचा उपभोग न करून आणिक मिळवावयाचे लालचेनें, मरेपर्यंत अनेक प्रकारचीं पातकें निरंतर करित असतात. शेवटी त्यांचा पैका चोरपोर खाऊन जातातः त्याचे वाट्यास दुःख, शोक, आणि मेल्याअंती अक्षय नरक, इतके मात्र येते."*

---

* इसपनीतिकथा पृ० ४०–४१.

विद्याप्रसाराचे कार्य नवीनच सुरू झालेले असल्याने शाळातील मुलांसाठी बालबोध गद्यग्रंथाची उणीव भासूं लागली. ह्यापूर्वीच बंगाली भाषेमध्यें अशा तऱ्हेची पुस्तकें प्रसिद्ध झालीं होतीं. मुंबईच्या शिक्षामंडळीने 'बोधकथा' (इ. स. १८३१) व 'नीतिकथा' (इ. स. १८३८), हीं दोन गोष्टींचीं पुस्तके बंगालीवरून मराठीत भाषांतर करून छापिलीं. यांमध्ये लहान मुलाची विद्याभ्यासाकडे व गुणग्रहणाकडे प्रवृत्ति व्हावी म्हणून लहान लहान गोष्टी सांगून प्रत्येक गोष्टीच्या शेवटीं तिचें तात्पर्यहि दिले आहे. नीतिकथेंतील 'विद्येची अवज्ञा' ही गोष्ट खाली देत आहे.

**बोधकथा**

"एक मुलगा विद्याभ्यासाचा उद्योग काही एक न करिता आपल्ये इच्छेस येईल त्याप्रमाणे कालक्षेप करीत असे; आणि वडिलांचा चागल्या उपदेशाचा तिरस्कार करून वाईट लोकाच्या सोबतीने फिरत असे. मग तो मोठा झाला तेव्हा अन्न वस्त्र मिळेना म्हणून महिना दोन रुपय कबूल करून एके ठिकाणीं चाकरीस राहिला. तीपासून शरीरास बहूत श्रम होऊं लागले. पुढें तो एके दिवशीं आपले भावाजवळ जाऊन दीनवाणीने विचारितो. "दादा तुम्हास थोड्या श्रमाने दरमाहा दाहा किंवा अधिक रुपये मिळतात, मी तर सारा दिवस काम करीत असतो, आणि तुमचापेक्षां मला मेहनतही अधीक पडती; तथापि मला दोन तीन रुपयावर काही अधिक मिळत नाही. याचें कारण काय?" त्याणे उत्तर केले "बाबा, तूं लहानपणीं विद्येची अवज्ञा केलीस, परंतु मी बहूत कष्ट करून विद्या साध्य केली म्हणून मला आता चागला रोजगार मिळाला आहे. तूं विद्या संपादिली नाहींस, म्हणून तूं आतां संकटांत पडला आहेस. मी विद्वानाचे

तोडून ऐकिले आहे की, विद्या म्हणत्ये " जे माझी सेवा करितील त्यांस मी द्रव्य देईल."

सारांश जी मुले लहानपणी आईबापाची अवज्ञा करून मनास येईल तसे करून आपला विद्या शिकण्याचा काळ फुकट गमावितात त्यास मोठेपणी फार संकटे प्राप्त होऊन फजीत होतात यास्तव विद्येचा अपमान करूं नये. "†

**सुबोध कथासंग्रह**

इ. स. १८३३ त लेफ्टेनंट गेस्फोर्ड ह्यांनी बाळमित्राच्या दुसऱ्या भागाचें भाषांतर करून छापिले. पहिल्या भागाप्रमाणेंच हा भागहि चांगला उतरला आहे. यांतील शुद्ध व सोप्या भाषेवरून गेस्फोर्डला कुणातरी कसलेल्या महाराष्ट्रीय लेखकाचें सहाय्य मिळाले असावे असे स्पष्ट दिसून येत. इ. स. १८३६ त पंचोपाख्यानाचे भाषांतर प्रसिद्ध झालें. याच सुमारास विष्णुशास्त्री यांनी 'नीतिदर्पण' (इ. स. १८३७) व 'बालोपदेशकथा' (इ. स. १८३८), हे दोन गोष्टीरूप ग्रथ लिहिले. नीतिदर्पणामध्यें एकंदर दहा गोष्टी असून त्याचा उद्देश ग्रंथकर्त्यांनेच प्रस्तावनेंत स्पष्ट सांगितलेला आहे. "मराठी शाळांवर पढणाऱ्या मुलांस नीतिज्ञान व्हायाजोगे ग्रथ फार थोडे आहेत असा अभिप्राय मनांत आणून त्यास सांप्रतचे राज्यकारभारसंबंधीं व इतर व्यवहारसबधी नीतिज्ञान होण्याकरितां हा ग्रंथ केला आहे. तेणेकरून सर्वजातींचे लोकांस सरकारी अधिकार मिळाला असता कसा चालवावा, आणि सर्व लोकांबरोबर प्रामाणिकपणानें कसे वागावे हें समजेल." त्यावेळचीं सर्व पुस्तकें भाषांतरित असत. हे पुस्तक मात्र स्वतंत्र रीतीने लिहिलेले आहे. यामध्यें गोष्टीरूपाने राजकीय, सामाजिक व नैतिक विषयांसबंधी उपयुक्त माहिती

† नीतिकथा (आवृ० ३ री) पृ० २३-२५

दिलेली आहे; आणि लोकाना व्यसनापासून अलिप्त राहाण्याचा उपदेश केला आहे. स्वतन्त्र ग्रथ-रचनेचा प्रथम प्रयत्न या दृष्टीने या ग्रथाला विशेष महत्त्व आहे. इ. स. १८४६ त हरी केशवजी पाठारे यानी 'Chamber's Moral Class Book' ह्या इंग्रजी पुस्तकाचें मराठी भाषांतर 'शालोपयोगी नीति-ग्रंथ' या नावाने प्रसिद्ध केले. यथार्थ व बालबोध भाषातर करण्याविषयीं हरी केशवजींची फार प्रसिद्धी होती. त्यान्। हं भाषातर तर सर्वोत्कृष्ट उतरले आहे.

**पौराणिक आख्यानांच्या संक्षिप्त बखरी**

ह्याप्रमाणे परभाषेतील बोधपर गोष्टीची भाषातरे केली जात होतीं, त्याबरोबरच आतां पौराणिक आख्यानाच्या सक्षिप्त बखरीहि प्रसिद्ध होऊ लागल्या. त्या-वेळच्या वाचकवर्गाला पुराणातील अद्‌भुत गोष्टी पद्यरूपाने परिचित होत्याच. त्यामुळे सहजच ह्या वाङ्मयाचा जास्त प्रसार झाला व पुढील स्वतत्र कथावाङ्मयावरहि त्यातील अद्‌भुत—रसाची छाप पडल्यावांचून राहिली नाही. 'बकासुराची बखर' ( इ. स. १८४५), चंद्रहास्य बखर' ( इ. स. १८४६), 'भागवताची बखर' ( इ. स. १८४७ ), 'नंदराजाची गोष्ट' ( इ. स. १८५१ ), '.लराजाची बखर' ( इ. स. १८५७ ), 'लवकुशाख्यान बखर' ( इ. स. १८६१ ), 'विराट-पर्वाची बखर' ( इ. स. १८६२ ),'पांडवाची बखर' ( इ. स. १८६९ ) इत्यादि पौराणिक गोष्टी साराशरूपाने प्रसिद्ध झाल्या.

**फारशी भाषेंतलि गोष्टींचीं भाषांतरें.**

पौराणिक आख्यानाप्रमाणेंच फारशी भाषेतील कथात्मक वाङ्मयाहि अद्‌भुतरसप्रधान होतें; आणि अशा गोष्टीनाच लोकप्रियता लाभण्याचा जास्त संभव असल्याने फारशी भाषेतील अद्‌भुत कथाच्या इंग्रजी किंवा हिंदी भाषांतरावरून त्याचे मराठी तर्जुमे करण्याकडेहि त्या काळच्या लेखकांचें

लक्ष लागले. कृष्णराव माधवराव प्रभु यांनी 'हातिमताई चरित्र' ही फारसी गोष्ट डंकन फारबस यांनीं केलेल्या इंग्रजी भाषांतरावरून महाराष्ट्र भाषेत लिहिली. तिचे सात भाग असून प्रत्येक भागांत विक्रमाप्रमाणे परदुःख-भंजन करणाऱ्या हातिमाचे पराक्रम वर्णिले आहेत. या पुस्तकांतील खालील उताऱ्यावरून फारशी भाषेतील गोष्टींच्या स्वरूपाची कल्पना येईल.

"एके दिवशी हातिम अरण्यामध्ये गेला, तेथे त्याची व सिंहाची गांठ पडली, तेव्हां हातिम मनांत विचार करिता की, जर मी या सिंहाला शस्त्राने मारिला तर मजसारिखे दयाळू मनुष्यास हे कर्म अयोग्य आहे, आणि जर मी त्यांस मारणार नाहीं, तर तो मला खचित मारील. कदाचित् मी त्या सिंहाचे मनास द्रव आणीन, असा विचार करून ता सिंहाला गांभीर्याने बोलतो, रे ईश्वराचे प्राण्या, जर तूं माझे मांसाकरिता भुकेला असशील, तर मी तुझ्यापुढे सिद्ध आहे, आणि जर तुला मांसा-नेच पोट भरावयाची इच्छा असली त[illegible] माझा घोडा आहे, हा, घे, खा, आणि आपली क्षुधा शांत कर, परंतु जर तुला माझेच मास पाहिजे तर ते मी तुला देतो, घे, मला खा पण तुझे मन दुखवूं नको, हे शब्द ऐकून सिंहाने मोठी गर्जना केली, तेव्हां हातिमाने आपले कवच व घोड्याचे जीन काढून हात जोडून सिंहापुढे उभा राहिला, आणि म्हणाला अहो महाराज, आम्हा दोघांतून कोणता पाहिजे तो खावा परंतु मनात दुःखी होऊन जाऊं नका, हे ऐकून सिंह हातिमाचे पायांवर मस्तक ठेवून रडूं लागला, मग हातिम म्हणाला की, ईश्वराचे प्राण्या, तुला उप-वासी जाऊं द्यावे असें माझे हातून घडणार नाहीं, कांकी ईश्व-राने आपले प्राण्यास सुख व्हावे म्हणून घोडे निर्माण केले आहेत यास्तव याला खा, आणि जर तुला माझे मांसाची इच्छा असेल,

तर ते मी तुला धर्मार्थ देतो, परंतु उपवासी आणि मनांत दुःखी होऊन जाऊं नको. मी आपले स्वतः शरीर तुला देत असतां, जर तूं खाणार नाहींस, तर मला चांगले वाटणार नाहीं, मग सिंहानें आपलें तोंड खालीं घालून तो आपले भक्षणाचे शोधास निघून गेला, याप्रमाणें हातिम प्राण्यावर उपकार आणि दया करीत असे,'तो कधीं अतृप्त अथवा दुःखी नसे, आणि जेणे-करून ईश्वरास चांगले वाटेल ते करण्यांस आपले शरीर लावीत असे. ''*

**फारशीभाषेंतील गोष्टींच्या धर्तीवर भाषांतरात्मक व स्वतंत्र कथाग्रंथ**

इ. स. १८५४ त नारायण केशव प्रभु यांनी सर विल्यम औस्लेच्या इंग्रजी अनुवादावरून ' बख्त्यारनामा अथवा बख्त्यारनामक राजपुत्र आणि दहा वजीर यांची कथा ' हे मूळच्या फारशी गोष्टीचे मराठी भाषांतर प्रसिद्ध केलं. या खेरीज ' आरबी गोष्टी ' ( इ. स. १८६३ ), ' बाहारदानीष ' ( इ. स. १८६५ ), ' गुल आणि सनोबर ' भाग १-२ ( इ. स. १८६७-६९ ) , ' बागोबहार ' भाग १-२-३ ( इ. स. १८६९-७१-७१ ) , ' पर्शियन नैटस् अथवा किशबरसिता ' ( इ. स. १८७३ ) इत्यादि फारशी गोष्टींची मराठी भाषांतरे प्रसिद्ध झालीं. ह्यातील बहुतेक सर्व गोष्टी एकाच धर्तीच्या असून त्यांतील शृंगारिक वर्णनेंहि तामसी व उत्तान स्वरूपाचीं आहेत. अशा अश्लील कथांच्या वाचनानें वाचकाची अभिरुचि बिघडली; व साहजिकच मराठी कथात्मक वाङ्मयाला अनिष्ट वळण लागले,

* हातिमताई चरित्र, (भाग १) पृ. ५–६.

**आरबी भाषेंतील सुरस व चमत्कारिक गोष्टी**

मुसलमानी गोष्टींच्या भाषांतरापैकी रसिकमणि कृष्णशास्त्री चिपळूणकर यांनी लिहिलेल्या 'आरबी भाषेतील सुरस व चमत्कारिक गोष्टी' या लोकप्रिय ग्रंथानें मराठी भाषेच्या वाङ्मयसंपत्तीत भर घातली. इ. स. १८६१ ते १८६५ या चार वर्षांत या ग्रंथाचे पहिले पाच भाग प्रसिद्ध झाले. मनोहर व मार्मिक भाषांतराचा उत्कृष्ट नमुना या दृष्टीनें आज पाऊणशें वर्षांनतरहि या ग्रंथाची बरोबरी करणारा दुसरा ग्रंथ मिळणें मुष्कील आहे. या ग्रंथानेंच महाराष्ट्रीय जनतेला कथात्मक वाङ्मयाची गोडी लाविली. व पुढील लेखकांना सुबोध, शुद्ध, सरस व चटकदार भाषापद्धतीचा अप्रतिम आदर्श निर्माण करून ठेविला. 'ज्यांस थोडक्यात गोड, व अर्थाचा समावेश पुष्कळ, असे कसे लिहावे हें शिकणे असेल, तर ते शास्त्रीबुवापासून समजावून घ्यावें' असा शास्त्रीबुवासंबंधी फार मार्मिक अभिप्राय केरोपंत छत्रे यांनी व्यक्त केला आहे.

**कृष्णशास्त्री चिपळूणकर (इ. स. १८२४–७८)**

कृष्णशास्त्री याचा जन्म पुणे येथें इ. १८२४ ला. त्यांच्या वडिलांची फार गरिबी होती. त्याना फक्त दरमहा चार रुपये पगार मिळे. त्या काळीं विद्याभ्यासाची साधनें आजच्याप्रमाणे सुलभ नसल्यामुळें त्यांचे प्राथमिक शिक्षण एका गांवठी शाळेत झाले. पुढे पुणे येथील संस्कृत पाठशाळेत त्यांनी अल्पावधीतच अलंकार, न्याय व धर्म या तीन शास्त्रांचें सांगोपांग अध्ययन केलें. लोकविलक्षण बुद्धिमत्तेमुळे त्यांचे गुरुजी मोरशास्त्री साठे हे त्यांना बृहस्पति म्हणून संबोधीत असत. कालमानाकडे पाहून शास्त्रीबुवांनी इंग्रजीचाहि अभ्यास सुरू केला, आणि असाधारण ग्रहणशक्ति व अव्याहत परिश्रम यामुळें त्या भाषेत ते लवकरच पारगत झाले. विद्याभ्या-

सानंतर त्यांनीं शिक्षण खात्यांत सरकारी नोकरी पत्करली, आणि ते अनुक्रमे भाषांतरकार, ट्रेनिंग कॉलेजचे प्रिन्सिपाल व वर्तमानपत्रे आणि मासिके यांचे रिपोर्टर होते. त्यांनी आपले काम फार कुशलतेनें बजावून सर्वत्र वाहवा मिळविली. ‘ साक्रेतिसाचे चरित्र ’ ( इ. स. १८५२ ), ‘ अर्थशास्त्र-परिभाषा ’ ( इ. स. १८५५), ‘ संस्कृतभाषेचे लहान व्याकरण ’ ( इ. स. १८५९ ), ‘ अनेकविद्यामूलतत्त्वसंग्रह ’ ( इ. स. १८६१ ), आरबी भाषेतील सुरस व चमत्कारिक गोष्टी ’ ( इ. स. १८६१-६५ ) आणि ‘ रासेलस ’ ( इ. स. १८७३ ) हे त्यांचे मुख्य गद्यग्रंथ होत. त्याप्रमाणेच ‘ गद्यरत्नावलि’ व ‘ मेघदूताचे भाषांतर ’ ही त्यांची काव्येहि फार लोकप्रिय झाली होती. ख्रिस्ती धर्मप्रचारकांना धैर्याने तोंड देण्यासाठीं त्यांनीं इ. स. १८५२ च्या सुमारास ‘ विचारलहरी ’ पत्र सुरू केलें. पण प्रति-कूल परिस्थितीच्या तडाक्यांत ते फार दिवस टिकले नाही.‘ ज्ञानप्रकाश ’ व ‘शालापत्रक’ यांच्या द्वारे मात्र शास्त्रीबुवांनीं मराठी भाषेत अनेक विषयांचें उद्घाटन करून, आपल्या मातृभाषेची बहुमोल सेवा केली. शालापत्रकांतील मार्मिक ग्रंथ-परीक्षणे व व्याकरणशास्त्रावरील निबंध हे त्यांच्या गाढ विद्वत्तेची साक्ष देतात. अशा तऱ्हेने महाराष्ट्र–भाषेची बहुविध कामगिरी करीत असतां, हे इ. स. १८७८ त आपल्या वयाच्या चोपन्नाव्या वर्षी दिवगत झाले.

**स्वतंत्र ग्रंथलेखनाच्या प्रवृत्तीचा अभाव**

“ शास्त्रीबोवांची सरळ, सुगम, मार्मिक व शुद्ध लिहिण्याची मराणि खरोखर अनुकरणार्ह आहे. विषयानुरुप भाषा बोलता येऊन पुन्हा ती समजण्यास कठिण वाटू नये असे लिहिणे किती कठिण हे सांगणें नलगे. परंतु शास्त्रीबोवांनीं जे जे विषय हातीं घेतले त्यांना साजेल व वाचकास तर

नडणार नाहीं अशीच भाषेची सरणि ठेविली आहे, यामुळे शास्त्रीबोवाचे ग्रथ सर्वत्र प्रिय झाले आहेत. शास्त्रीबोवांचे ग्रंथ आज सात आठ प्रसिद्ध आहेत, परतु हे सर्व भाषांतररूप आहेत. त्यांनीं स्वतंत्र म्हणून एकही ग्रथ लिहिला नाहीं. आतां शास्त्रीबोवासारख्या विशालबुद्धीच्या गाढ्या विद्वानानें स्वतःच बुद्धीचे व विचारांचे फल म्हणून स्वतत्र ग्रंथ लिहिणं अवश्य होतें. परंतु त्यांनी तसल्या प्रकारचा यत्न केल्याचे ऐकिवांत नाही"* शास्त्रीबोवाची योग्यता असतांही त्याच्या हातून स्वतत्र ग्रथ-निष्पत्ति झाली नाहीं, याचे कारण म्हणजे सर्व बाजूंनी परावलंबी बनलेल्या आमच्या देशांतील विद्वानां-च्याहि ठिकाणीं असलेला आत्मविश्वासाचा अभाव हेच होय.

**स्त्रीचरित्रात्मक कथाग्रंथ**

फारशी गोष्टींच्या अनुकरणाने स्त्रियांना दुर्वर्तनापासून परावृत्त करण्यासाठीं स्त्रीचरित्रपर गोष्टी प्रसिद्ध होऊं लागल्या. यापैकीं रामजी गणोजी चौगुले यांनीं लिहिलेला 'स्त्रीचरित्र' हा ग्रथ फार प्रसिद्ध आहे. याचे एकदर चार भाग निघाले. डॉक्टर रामजी गणोजी हे जातीचे गवळी. विद्याव्यासंग बेताबाताचाच असतांहि अनुभव व बहुश्रुतपणा याच्या जोरावर त्यानी 'नारायणबोध' भाग १, 'बोधकथामृत' भाग २, 'रसायनशास्त्र अथवा हुन्नरनिधि' भाग ३ आणि 'स्त्रीचरित्र' भाग ४ हे गद्यग्रथ लिहिले. भाषेची शुद्धता यथातथाच, पण उपयुक्त माहितीच्या दृष्टीने मात्र ग्रंथ बऱ्या-पैकीं आहेत. यानंतर 'विदग्धस्त्रीचरित्र' (इ. स. १७७१) व 'मनोरजक सुशिक्षितस्त्रीचरित्र' भाग २ (इ. स. १८७२-७३) इत्यादि स्त्रीचरित्रात्मक कथाग्रथ प्रसिद्ध झाले.

---

* वि. ज्ञा. वि. पु. १० अं. ८.

फारशी व आरबी भाषेतील गोष्टीच्या धर्तीवर भाषांतरात्मक व स्वतंत्र अशा चातुर्यबोधक गोष्टीहि लिहिल्या गेल्या. 'तर्कदीपिका' (इ. स. १८६८) 'चमत्कारिक गोष्टी'—भोज, कालीदास वगैरे यांच्या (इ. स. १८६५), 'चमत्कारिक न्यायाच्या व अकलेच्या गोष्टी' (इ. स. १८६७,) 'बादशहा आणि बिरबल यांच्या गोष्टी' (इ. स. १८६९) इत्यादि सर्व कथा याच प्रकारच्या होत. याचप्रमाणे आरबी भाषेतील सुरस व चमत्कारिक गोष्टींच्या धर्तीवर केशव रघुनाथशेट चोचे यानीं 'महाराष्ट्र भाषेत मनोरंजक गोष्टी' या स्वतंत्र कथासंग्रहाचे पाच भाग प्रसिद्ध केले. यांतील खालील उताऱ्यावरून एकंदर ग्रंथाच्या लेखनशैलीची कल्पना येईल.

**चातुर्यबोधक व मनोरंजक गोष्टी**

"पूर्वी आवंती नगरीस राजा मनमथ राज्य करीत होता. तो स्वभावाने गर्विष्ट होता. त्याचे राज्य विस्तीर्ण होते. त्याच्या त्या स्वभावामुळे त्यापुढे प्रधानाचा नाइलाज होता. त्याची स्त्री मनकर्णिका नामक होती, ती रूपवान असून चतुर होती. राजाच्या स्वभावापुढें तिचेहि कांही चालत नव्हत. एके दिवशीं राजानें प्रधानास सांगितले की, एक उत्तम प्रकारचे जलमंदिर तयार करवावे. अशी राजाज्ञा होतांच प्रधानाने बहुत द्रव्य खर्च करून सुंदर जलमंदिर तयार केले, आणि तें पहाण्यास्तव राजासह तो तेथे आला. राजाने ते पाहताच नाक मुरडिले, व हे कांहीच उपयोगी नाही, असे म्हणून ते मोडून टाकविलें, अशा प्रकारचा त्याचा स्वभाव पाहून त्याच्या दरबारातील प्रधानास तो कोणत्या वेळी काय करील ह्याचे भय होते. त्यास बहुत काळ संतान होत नव्हते, म्हणून त्याने पुत्रेष्टि नामक यज्ञ करण्याचा विचार केला; आणि गावोगावांचे ब्राह्मणांस बोलावण्यास व यज्ञ-

> मंडपाची सिद्धता करण्यास प्रधानास आज्ञा केली. त्याप्रमाणे प्रधानानें गांवोगांवी पत्रें पाठविलीं, व शहराबाहेर मोठा विस्तीर्ण यज्ञमंडप घातला. सर्व सिद्धता झाल्यावर यज्ञास आरंभ झाला, त्यासमयीं लक्षावधि ब्राह्मण तेथे जमा झाले होते. काही दिवसांनीं यज्ञ समाप्त होऊन ब्राह्मण यज्ञप्रसाद राजास देते-समयीं म्हणाले, " राजा तूं पुत्रेष्टि यज्ञ केला आहेस, परंतु तुला महारूपवती एक कन्या होईल." हे त्या ब्राह्मणाचे वचन ऐकतांच तो संतप्त झाला, परंतु प्रसादाप्रीत्यर्थ त्याने हात पुढे केला होता, म्हणून तो मागे घ्यावा तर त्यात मह पाप आहे असे, कांहीसे त्यासमयीं त्याच्या मनांत आले, याकरिता कांहीं न बोलता त्यानें तो प्रसाद घेतला. त्यापासन कन्या होईल असे त्यास समजले, तेव्हां कन्या आपणास नसावी असे त्यास वाटून त्या यज्ञमंडपाबाहेर येऊन, कोणास समजूं नये अशा रीतीनें शिकारिचे निमित्त करून तो कांहीसा दूर गेला, आणि तेथे त्याने तो फेंकून दिला; तो आकस्मात् एका घारीनें भक्षण केला. असे पाहून मनमथ तथून परतला, आणि तसलाच पदार्थ घेऊन तो यज्ञप्रसाद आहे, अशा मिषाने मनकार्णिकेसह त्याने भक्षण केला."*

या काळात एवढा मोठा स्वतंत्र कथाग्रंथ दुसरा नव्हता. या कथासंग्रहाच्या धर्तीवर नारायण गोपाळ दामले व विनायक हरी सिनकर यांनीं 'मराठी भाषेतील सुरस गोष्टी' ( इ. स. १८७० ) लिहून प्रसिद्ध केल्या. याच सुमारास 'युरोपाकाकूच्या शाळेंतील मारामारी ' ही रूपकात्मक गोष्ट ( Allegory ), 'युरोपातील वनदेवतांच्या गोष्टी' ( इ. स. १८६८ ), आणि ' सुंदरी आणि आस्वल ' ( इ. स. १८७१ ) ह्या वनदेवतांच्या कथा ( Fairy Tales ) प्रसिद्ध झाल्या.

---

* महाराष्ट्र भाषेत मनोरंजक गोष्टी (भाग ५ वा) पृ० ५७–५८

नवीन शाळांमधून शिकणाऱ्या मुलांसाठी इंग्रजी भाषेंतील बालबोध नीतिकथांचीं भाषांतरें करण्यांत आलीं. त्यांची माहिती आरंभी सांगितलेली आहेच, त्याबरोबरच हळुहळू त्या भाषेंतील मनोरंजक कल्पित गोष्टींचींहि भाषांतरें प्रसिद्ध होऊं लागलीं. भाषांतरासाठी निवडलेल्या मूळ इंग्रजी गोष्टी सामान्य प्रतीच्याच होत्या. एकोणिसाव्या शतकांतील डिकन्स, थॅकरे, आस्टेन्, जॉर्ज इलियट् इत्यादि कुशल कथालेखकांच्या नामांकित कलाकृतींना कोणींहि हात लावला नाही. मध्यम प्रतीच्या गोष्टींचे तर्जुमे करण्यांतच तत्कालीन लेखकांनी संतोष मानला. याचें कारण म्हणजे उच्च वाङ्मयांतील रसग्रहण करण्यास लागणारी कलात्मक दृष्टि त्या काळीं फारच थोड्या लोकांत होती. बुद्धिमान् व सुशिक्षित लोक सरकारी नोकरीच्या मोहांत गुंतलेले होते. इंग्रजी व मराठी या दोन्ही भाषांचें पूर्ण ज्ञान असलेले लोक मराठी वाङ्मयाच्या वाट्याला येणें शक्य नसल्यामुळे तुटपुंज्या भांडवलावर लेखन-व्यवसाय चालविणाऱ्या सामान्य लोकांच्या हातींच कथावाङ्मयाचीं सूत्रें गेलीं. वाचकांची भूकहि कलाहीन पण चटकदार गोष्टींनी भागण्यासारखी होती. यामुळे इंग्रजी वाङ्मयांतील बहुमोल रत्नें बाजूला सारून साधारण गोष्टींचींच भाषांतरें करण्याचा सर्वांनी प्रयत्न केला.

**इंग्रजी भाषेंतील सामान्य कथाग्रंथांचींच भाषांतरें**

भवानी विश्वनाथ कानविंदे आणि इतर कांहीं मंडळी यांनीं इ. स. १८५४ त ‘ बर्थोल्ड ’ या इंग्रजी कथाग्रंथाचें भाषांतर केलें. कानविंदे हे गौड सारस्वत ब्राह्मण. मुंबईस जनरल असेंब्लीच्या विद्यालयांत शिक्षक होते. यांनीं मोठ्या परिश्रमानें ‘ नेटिव्ह बुकक्लब ’ नांवाचें पुस्तकालय स्थापिलें. याशिवाय त्यांनीं ‘वर्तमान-दीपिका ’ नामक पत्र काढिलें होतें, तेंहि बरेंच दिवस चाललें. यांनीं

**भवानी विश्वनाथ कानविंदे**

१ ' दारूपासून अनर्थ ' २ ' मानवी कर्तव्यकर्मे ' ३ ' मुंबईतील सुशिक्षित हिंदु लोक ' ४ ' सारस्वत ब्राह्मण किंवा शेणवी ऊर्फ कोंकणे ब्राह्मण या विषयी आक्षेपकाचें यथार्थ खंडन ' इत्यादि गद्यग्रंथ लिहिले.

**सखाराम परशुराम पंडित**

सखाराम परशुराम पंडित यानीं 'Lamb's Tales from Shakespeare' ह्या इंग्रजी कथासंग्रहामधील ' Taming of the shrew ' आणि ' Merchant of Venice ' या दोन गोष्टींची भाषांतरे ' शेरास सव्वाशेर ' ( इ. स. १८६७ ) व ' विलक्षण न्यायचातुर्य अथवा उज्जनी शहरचा व्यापारी ' ( इ. स. १८६८) ह्या नावांनी प्रसिद्ध केली. पहिल्या पुस्तकावरील अभिप्रायातील सूचना लक्षात घेऊन दुसऱ्या पुस्तकात योग्य ती सुधारणा केल्यामुळे ते जास्त सरस वठले आहे. सदर गोष्ट वाचकांना मनोरंजक वाटावी म्हणून एतद्देशीय लोकाच्या रीतीभातीस अनुसरून रचली आहे. भाषा सुबोध, गोड, व कल्पित गोष्टीस असावी तशी आहे. इंग्रजी नावाची योजना खुबीदार रीतीने केली आहे. इंग्रजी नांवातील पहिले अक्षर मराठी नावात कायम ठेविलें आहे. उदा.—शायलॉक–शालकचंद, पोर्शिआ–पार्वती इ. इत्यादि. या पुस्तकावर वि. शा. विस्तार व शालापत्रक या मासिकांत अभिप्राय आले आहेत.

**शेक्सूपीयरच्या नाटकांचीं कथात्मक रूपांतरें**

इ. स. १८७०त वरील कथासग्रहातील 'The Two Gentlemen of Verona ' ह्या गोष्टींचें भाषांतर ' अवर्णनीय स्नेहभाव अथवा आनंदपुर नगरींतील दोन तरुण गृहस्थ ' या नावाने प्रसिद्ध झाले. या खेरीज इ. स. १८७१ त ' स्त्रीन्यायचातुर्य ' ( Merchant of Venice ) व इ. स. १८७२ त भुरळ ( Comedy of Errors ). ही शेक्स्पियरच्या नाटकांचीं रूपांतरें प्रसिद्ध झालीं.

# अर्वाचीन मराठी गद्याची पूर्वपीठिका

**(जिल्ब्लास चरित्र भाग १ ला)**

विष्णु जीवाजी पागनीस यांनीं ' जिल्ब्लास चरित्र ' भाग १ ( इ. स. १८७१ ) ही मूळची फ्रेंच गोष्ट इंग्रजी भाषांतरावरून ' मूळभाषेंतील भावार्थ राखून सुज्ञा प्रकारानें ' मराठी भाषेत लिहिली. ग्रंथकर्त्यानें प्रस्तावनेत अद्‌भुतरसाची चंगळ असणाऱ्या गोष्टी वाचण्याकडे वाचकाचा जास्त कल आहे. तरीसुद्धा वस्तुस्थितीला धरून असणाऱ्या गोष्टी लिहिण्यातच समाजाचे खरें कल्याण आहे; म्हणून परभाषेंतील ' ग्राह्य ' पुस्तकाचे भाषांतर झाले तर ते हितावह आहे असे सांगितले आहे.

**रॉबिन्सन क्रूसो ह्याचें चरित्र (भाग १ ला)**

याच वर्षी रावजीशास्त्री गोडबोले यानीं डीफोच्या ' रॉबिन्सन क्रूसो ह्याचे चरित्र ' भाग १ या पुस्तकाचें मराठी भाषांतर प्रसिद्ध केलें. " हे भाषांतर करते-समयीं मुळांतील अर्थ जितका आणवेल तितका आणण्याविषयीं व सुलभ असून व्यवहारात नित्यशः येणाऱ्या शब्दाचा प्रयोग करण्याविषयीं यत्न केला आहे. " *

**' रासेलस '**

' क्लासिक टेल्स ' या इंग्रजी कथासंग्रहातील दोन गोष्टींची मराठींत भाषांतरे झालीं. त्यापकीं ' रासेलस ' या गोष्टीचे भाषांतर कृष्णशास्त्री चिपळूणकर यानीं केलें. " ' आरेबियन नैटस् ' वगैरे ग्रंथांत जसा मुख्यतः कल्पनाशक्तीचाच खेळ आहे तसे येथे नसून ती येथें केवळ गौण आहे; व संसारातील नानाविध स्थितीच्या गुणदोषाचें व प्रसंगोपात्त दुसऱ्या अनेक विषयाचें प्रतिपादन करताना मूळ ग्रंथकर्त्यानें आपली सूक्ष्म विवेचनशक्तीच विशेषेंकरून प्रगट

---

* प्रस्तावना—राबिन्सन क्रूसो ह्याचें चरित्र

केली आहे. वास्तव प्रतिपादनरूप ग्रंथाचा आपल्या भाषेंत हा पहिलाच मासला होय."† शास्त्रीबुवासारख्या रसिकक्रानें केलेलें हें भाषांतर किती उत्तम वठलें असेल हें सांगण्याची कांहीं आवश्यकता नाहीं. मुळांतील अर्थ व रस जसाचा तसा उतरवून हुबेहुब भाषांतर करणें, ही एक कला आहे, व ती कृष्णशास्त्री चिपळूणकरांना पूर्णपणें अवगत होती यांत कांहीं शंका नाहीं. "मराठी भाषेच्या सरणीस इंग्रजी ग्रंथांतील विचार कसे उतरावे, म्हणजे मूळांतील अर्थांत उणें अधिक कोठें घालावें, कोणत्या ठिकाणीं कसा फेरफार करावा, वगैरे ज्या नाना प्रकारच्या युक्त्या भाषांतरकर्त्यांस प्रसंगवशात् लढवाव्या लागतात, त्यांची समजूत पुढील ग्रंथावरून बरीच पडेल असा भरवसा आहे. तसेंच शब्दांचें व अर्थाचें सौष्ठव व स्वारस्य हींहि मराठी अभ्यास करणारांस लक्षपूर्वक वाचनांतीं कळण्यासारखीं आहेत."‡ भाषांतरात्मक ग्रंथांत रासेलसाचा दर्जा फार वरचा आहे. या ग्रंथांतील खालील उताऱ्यावरून कृष्णशास्त्र्याचें मराठी भाषेवरील प्रभुत्व लक्षांत येईल.

"प्रथमच मी अफाट दर्यांत गेलों होतों. मग जेव्हां जमीन कोणिकडेही अगदीं दिसेनाशी झाली त्यावेळेस चोहोंकडे पाहून मला मोठी मौज वाटली, परंतु त्या मौजेंत भयाचाही कांहीं अंश होता. भोंतालचा तो अमर्याद विस्तार पाहून माझें मन विस्तृत झालेंसें भासलें, व असे वाटलें कीं, समुद्राकडे टक लावून कितीही दिवस बसलें तरी कधींही कंटाळा यावयाचा नाहीं. परंतु कांहीं वेळ लोटल्यावर मला त्या नुसत्या एकसारख्या पाण्याकडे पहावयास त्रास येऊन मी तक्तपोशीवरून उठून खाली खोलींत जाऊन बसलों. माझ्या मनांत असा संशय आला कीं, समुद्राच्या

---

†, ‡ वि. कृ. चि.—प्रस्तावना—'रासेलस'

..५

मौजेविषयीं जसे झाले तसेंच ज्या पुष्कळ आशा बाळगून मी मुशाफरीस निघालों आहे,त्यांचाही असाच शेवट होणार नाहींना! परंतु पुनः आपल्या मनाशीं असा विचार केला कीं, समुद्र आणि जमीन यांच्यामध्यें फार तफावत आहे. पाण्याच्या स्थितींत वैचित्र्य म्हटले म्हणजे फारच थोडें. तें हालत असेल किंवा संथ असेल. परंतु जमीनीची गोष्ट तशी नाहीं. तीवर डोंगर, खोरी, मैदानें, रानें व नगरें असें पुष्कळ वैचित्र्य असते. तीवर निरनिराळे लोक रहातात, व त्या त्या लोकांच्या रीतिभाती, समजुती फारच निरनिराळ्या असतात. तसेंच जमीनीवरील सृष्टीच्या रचनेंत व स्वरूपांत जरी तितके वैचित्र्य दृष्टीस न पडेल तरी तीवरील मनुष्यांचा व्यवहारांतरीं पुष्कळ वैचित्र्य आढळण्याचा संभव आहे. याप्रमाणे विचार करून मी आपलें मन स्वस्थ केले.''‡

**गोविंद शंकरशास्त्री बापट (इ. स. १८४४–१९०४)**

गोविंद शंकरशास्त्री बापट यांनीं 'इलिझाबेद अथवा सिबिरिया देशांतील हद्दपार झालेले कुटुंब' (इ. स. १८७४) या क्लासिक टेल्समधील दुसऱ्या गोष्टीचे भाषांतर केले. ही गोष्ट ऐतिहासिक आहे. म्हणून स्थळें व व्यक्ती यांची नावे कायम ठेविलीं आहेत. या ग्रंथाची प्रस्तावना लहानच पण उब्दोधक अशी आहे. गोविंदशास्त्री यांचा जन्म रत्नागिरी जिल्ह्यांत इ. स. १८४४ त झाला. मराठी शिक्षण पूर्ण झाल्यानंतर त्यानीं वडिलांजवळ वेदाध्ययन केलें. पुढें पुण्यास येऊन न्याय व व्याकरण पढले, नंतर ट्रेनिंग कॉलेजची परीक्षा दिली. यांनीं खासगी रीतीनें अभ्यास करून इंग्रजी भाषेचे ज्ञान संपादिलें. हे सरकारी शिक्षणखात्यांत शेवटपर्यंत नोकरीस होते. यांनीं

‡ रासेलस पृ० ३१–३२

'इलिझाबेथ', 'पाल आणि व्हर्जिनिया,' 'हरी आणि त्रिंबक', 'गद्यरत्नमाला' इत्यादि पुस्तकें लिहिलीं. यांची भाषा सरळ व गोड आहे. हे इ. स. १९०४ मध्यें निवर्तले.

**रिचर्दाचें चारित्र ( Ivanoe )**

हरी विनायक बर्वे पनवेलकर यांनीं इ. स. १८७४ त सुप्रसिद्ध इंग्लिश कादंबरीकार सर वाल्टर स्कॉट ह्याच्या 'Ivanoe' या कादंबरीचें मराठी भाषांतर 'रिचर्दाचें चरित्र' या नांवानें प्रसिद्ध केलें. इंग्रजी भाषेंतील नाणावलेल्या ग्रंथकाराच्या कादंबरीचें भाषांतर करण्याचा हा एकच प्रयत्न त्या काळीं झाला. बर्वे याचे तरी अशा ग्रंथाकडे लक्ष गेले हे नवलच म्हणावयाचें !

**मराठी भाषेंतील पहिली स्वतंत्र कादंबरी 'यमुनापर्यटण'**

मराठी भाषेंतील स्वतंत्र कादंबऱ्याची सुरवात 'यमुना पर्यटन' ( इ. स. १८५७ ) या खिस्ती गोष्टीने झाली. 'यमुनापर्यटण' ही स्वतंत्र गोष्ट बाबा पदमनजी यानीं लिहिली. तिच्यामध्यें हिंदु विधवाच्या दुःस्थितीचें वर्णन केलें असून पुनर्विवाहाची आवश्यकता सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे. त्याबरोबरच हिंदु-धर्माची नालस्ती करून खिस्ती धर्माचे गोडवेहि गाइले आहेत, यामुळे ह्या कादंबरीला फारशी लोकप्रियता मिळाली नाहीं. बाबा पदमनजी यांनीं मराठी भाषेंत पुष्कळ ग्रंथ लिहिले आहेत. बाबांची भाषा शुद्ध व सुबोध असून तिच्यांत एक तऱ्हेचा प्रेमळपणा आहे, त्यामुळें त्यांचे सर्वच ग्रंथ वाचनीय झाले आहेत.

फुलमुनी आणि करुणा ह्यांचा वृत्तांत

याच सुमारास प्रसिद्ध झालेली दुसरी ख्रिस्ती गोष्ट " फुलमुनी आणि करुणा ह्यांचा वृत्तांत " ( इ. स. १८५९ ) ही होय. ही गोष्ट मुळांत कलकत्ता येथील एका मिशनरी बाईनें इंग्रजी भाषेंत लिहिली होती. तिचें हें मराठी भाषांतर फार चांगलें उतरलें आहे. यांत ईश्वराला भिणाऱ्या एका सुशील कुटुंबाचा वृत्तांत सांगितला आहे. मधून मधून ख्रिस्ती-शास्त्रवचनें व प्रार्थना देऊन ख्रिस्ती धर्माचें महत्त्व सूचित केलें आहे. या दोन्ही गोष्टींमध्यें तत्कालीन कथावाङ्मयांतील अद्‌भुत–रसाचा गंधहि नाहीं. यांतील सर्व वृत्तांत वस्तुस्थितीला धरून आहे. भाषा सोपी असून परिणामकारक आहे. मराठी भाषेंत त्या काळीं ह्या दोनच वस्तुस्थितिनिदर्शक ( Realistic ) कादंबऱ्या लिहिल्या गेल्या असें म्हणावयास कांहीं हरकत नाहीं. ' फुलमुनी आणि करुणा ' या कादंबरीतील खालील उताऱ्यावरून तिची सुबोध भाषासरणी समजून येईल.

" बहुत वर्षांपासून मी जेव्हां बाहेर फिरायास जाते तेव्हा ईश्वरानें सृष्टमिध्यें नानाप्रकारचे सुंदर पदार्थ केले आहेत त्यांचें मनन करून त्यांपासून त्याच्या प्रीतीविषयीं व ज्ञानाविषयीं जो बोध होतो तो ग्रहण करावा अशी माझी रीत पडली आहे. कधींकधीं एखादें रानझाडाचें फूल नजरेस पडलें, तर त्याचें सौंदर्य त्याचे गुण इत्यादिकांविषयीं विचार करीत असावें. कधींकधीं सृष्टींतील एखादा भलता पदार्थ नजरेस पडला असतां, त्यावरून आत्म-संबंधीं कांहीं बोध घेत जावा अशी माझी रीत आहे. माळ्याला बागेंतील रोपास खसी करितां पाहून मला बहुत वेळां या पुढील गोष्टीची आठवण झाली आहे. " ज्यावर प्रभु प्रीति करितो, त्याला शिक्षा करितो " मी कधींकधीं ह्या तेजःपुंज सूर्यास

अस्ताप्रत जातां पाहतें तेंव्हां विश्वासी मनुष्याच्या मरणाची मला आठवण होती. जसा सूर्य एखाद्या उघाडीच्या दिवसीं देखील कोणास न कळतां अस्तास जातो, त्याप्रमाणे कित्येक ख्रिस्ती मनुष्यें आपल्या तारकाची बहुत सेवा करूनहि कोणास न कळतां मावळतात. कित्येकांची अशी गोष्ट असतीं कीं, बहुत काळपर्यंत आपल्या तारणाविषयींचे संशय त्याच्या मनांत उत्पन्न होतात, तरी परमेश्वर त्याच्या मरणसमयीं त्याजवर आपल्या यथार्थाच्या सूर्याची तेजस्वी किरणें पडूं देतो. दुसऱ्या कित्येकाची गोष्ट अशी असते, जसा पावसाळ्यात सूर्य केंव्हाशीं उगवतो व केंव्हासीं मावळतो, हे बहुधां ठाऊक होत नाहीं, त्याप्रमाणें त्यांच्या अल्पविश्वासामुळे, तींहि केंव्हा उगवतात व मावळतात हे जगांतील लोकांस ठाऊक होत नाही. तरी ही सर्व निरनिराळ्या प्रकारची ख्रिस्ती मनुष्ये पुनरुत्थितीच्या वेळी आपल्या सूर्याप्रमाणे तेजःपुंज होतील यांत कांहीं संशय नाहीं.*

**सुरुवातीच्या स्वतंत्र कादंबऱ्याचें सामान्य स्वरूप**

मराठी भाषेतील आरंभीच्या कथालेखकाचे इंग्रजी भाषेचे ज्ञान फारच मर्यादित होतें. त्यामुळे कथारचनेचें आधुनिक तंत्र त्यांना अवगत होणें शक्य नव्हते. उत्तम गोष्ट लिहिणे ही एक कला आहे; व ती साध्य करून वेण्यासाठीं दीर्घकाल तपस्या करावी लागते याची कोणालाहि कल्पना नव्हती "आतांशीं नावलांची कीड फार झाली आहे. मुलेंबाळें देखील नावलें लिहून पैसा मिळवू लागलीं आहेत. "† हें का. व. मराठ्याचें उद्गारहि हेंच दर्शवितात. इंग्रजीपेक्षां संस्कृत भाषेशीं त्या काळच्या लेखकांचा जास्त परिचय

* फुलसुनी आणि करुणा पृ. १८–१९
† पृ. १८ नावल व नाटक ह्यांविषयीं निबंध.

होता. ' दशकुमारचरित ', ' बृहत्कथासागर ' आणि मुख्यतः कादंबरी हे संस्कृत ग्रंथ कथा–लेखनाचे आदर्श म्हणून पुढें ठेविण्यांत आले; इतकेंच नव्हे तर कल्पित–कथेला कादंबरी हाच शब्द मराठी भाषेंत रूढ झाला. यामुळें साहजिकच स्वतंत्र मराठी कथावाङ्मयांत अद्‌भुतरसाला प्राधान्य मिळालें.

**कथानक**

लक्ष्मणशास्त्री हळबे याची ' मुक्तामाला ' ही मराठी भाषेंतील पहिली स्वतंत्र कादंबरी समजली जाते. त्यानंतरच्या बहुतेक सर्व कादंबऱ्या हिच्याच धाटणीवर लिहिलेल्या आहेत. बाणाच्या कादंबरीप्रमाणें कादंबऱ्यांचीं नांवें बहुधा स्त्री-वाचक असत—' रत्नप्रभा, ' ' मंजुघोषा, ' ' चंपकमाला, ' ' सुवर्ण-मालिनी, ' ' वसंतमाला ' इ. इत्यादि. साधारण माणसाच्या आयुष्यांत अद्‌भुत गोष्टींना बिलकूल वाव नसल्यामुळें राजपुत्र, प्रधानपुत्र, राजकन्या, यांचा विलासी जीवनक्रमच कादंबरीचा विषय झाला. कथानकाची धाटणी एका ठराविक साच्याचीच असे. कामिनी, कांचन व राज्यपद यांवरच बहुधा त्यांची उभारणी झालेली असावयाची. कथावस्तूच्या विकासांत स्वाभाविकपणाचा लेशहि नसे. नायक–नायिकेची भेट हेंच सामान्यतः कथेचें उद्दिष्ट असे. ' राजामदन ' सोडून बाकीच्या सर्व कादंबऱ्यांचा शेवट आनंदात झाला आहे. कथानकांतून पतिव्रतेवरील संकट-परंपरेचीं वर्णनें जागोजाग आढळतात. त्याबरोबरच त्यांची मुक्तताहि अकल्पित व असंभाव्य रीतीनें घडवून आणली जाते. औचित्यभाव बाजूला सारून मंत्रतंत्र, जादूटोणा, धरणीकंप इत्यादि पाहिजे त्या साधनांचा हवा त्याप्रसंगीं बिनदिक्कत उपयोग करण्यांत येतो. कथानकाचा रोख साधारणपणें सद्‌गुणांचा उत्कर्ष व

दुर्गुणांचा अपकर्ष दाखविण्याकडे असतो. ‘ विलासिनी ’ ह्या कादंबरीच्या कर्त्यानें प्रस्तावनेंत नमूद केलेला खालील उद्देश साधारणपणें त्या काळच्या सर्व कादंबऱ्यांना लागू पडण्यासारखा आहे. “ माझ्या अल्पमतीप्रमाणें मी, वाईट कृत्याचा वाईट, व चांगल्या कृत्याचा चांगला परिणाम, सुशिक्षित स्त्रियांची नीति, गंभीर पुरुषाचें धैर्य, सकटकालीं बुद्धीचें स्थैर्य, स्त्रीसक्त पुरुषाचें साहस व दुष्टत्व आणि ईश्वर सत्याचा अभिमानी इतक्या गोष्टी सिद्ध करण्याचा यत्न केला आहे. ”

**स्वभाव-रेखनाची उणीव**

ग्रंथकाराच्या अघटित–घटना–पटुत्वावरच कथानकाची सारी भिस्त असल्यामुळें ह्या कादंबऱ्यांमधून स्वभावरेखनाला अजिबात फाटा मिळाला असला तर त्यांत कांहीं नवल नाहीं. “ जेवढे पुरुप तेवढे मदनाचे पुतळे, जेवढ्या स्त्रिया तेवढ्या तिलोत्तमा; ”* तसेंच नायक म्हणजे सर्व सद्गुणांचें आगर, आणि खलनायक म्हणजे यच्चयावत् दुर्गुणांची खाण असें ठरून गेल्यानंतर मानवी स्वभावांतील भिन्न भिन्न सूक्ष्म व्यक्ति–विशेषांच्या आविष्करणाचें कारणच राहिलें नाहीं, अशा तऱ्हेच्या गोष्टी लिहिण्यांतच सारे लेखक गुंतल्यामुळें कथा-रचनेंतील कलात्मक अंगांची ओझरती ओळखहि तत्कालीन महाराष्ट्राला झाली नाहीं.

**वर्णनें-वास्तवतेपेक्षां भरगच्चपणाकडे अधिक लक्ष**

कथेंतील प्रत्येक भागाच्या आरंभीं एखाद्या ऋतूचें, वेळेचें, बागेचें किंवा अरण्याचें वर्णन असे. त्यांत वास्तवतेपेक्षां भरगच्चपणाकडे अधिक लक्ष देण्यांत येई. अत्यंत महत्त्वाच्या अशा निवडक गोष्टींचेंच वर्णन करून शब्दचित्र उठावदार व परिणामकारक करण्याची कला कोणालाहि माहीत

* नावल व नाटक ह्यांविषयीं निबंध पृ. ८

नव्हती. बागेच्या वर्णनात शक्य तितक्या फळांची व फुलांची, अरण्याच्या वर्णनांत शक्य तितक्या वृक्षांची व पशुपक्ष्यांची, भोजनाच्या प्रसंगीं शक्य तितक्या पक्वान्नाची व पोषाखाच्या वेळीं शक्य तितक्या वस्त्रांची व अलकाराची यादी दिल्यावांचून वर्णन पुरेंच होत नसे. इतर वर्णनेंहि अशाच ठरीव पद्धतीची असत. " प्रत्येक शोकस्थलीं मरणासारिखा शोक, व आनंदस्थळीं स्वर्गासारिखा आनंद; दुसरी उपमाच नाहीं. नवराबायकोंचें भांडण प्रेमाचा लोट ! त्यांत अभिप्राय गूढ राखण, किंवा गांभीर्य ही बिलकुल नाहींत. " † स्थल, काल व वर्णने यांमध्येंहि पुष्कळ ठिकाणीं विसंगतपणाचा दोष आढळतो. पंधराव्या शतकातल्या विचित्रपुरी नगरीतील राजपुत्र व प्रधानपुत्र कलकत्ता युनिव्हर्सिटीचे पदवीधर दाखविले आहेत. 'विश्वासराव' कादंबरींत तर एकाच प्रसंगीं जुन्याकाळच्या दरबाराचा थाट व एकोणिसाव्या शतकांतील यांत्रिक साधने यांचें वर्णन केले आहे. 'मुक्तामाले' तील वसंतऋतूच्या खालील वर्णनावरून तत्कालीन कादंबऱ्यांच्या वर्णनशैलीची यथार्थ कल्पना येईल.

> " वसंतकालास आरंभ होऊन बरेच दिवस झाल्यामुळें, बागा, रानें व डोंगर ह्यांतील वृक्षांस नवीन पालवी फुटली. तेणेकरून त्यांची फारच रमणीय शोभा दिसूं लागली. आंबे, फणस,अंजीर, द्राक्षें इत्यादि वृक्ष चोंहीकडे फळांनी थवथवल्यामुळे त्यांचीही एक मोठी मनोरंजक रचना दिसूं लागली. बागांतून व कितीएकांच्या गृहातून गुलाब, मोतिया, शेवंती, चमेली, जाई वगैरे फुलझाडांस बार आल्यामुळें चोंहीकडे मधुर सुगंध सुटूं लागला. कोकिळा, मयूर, कीर इत्यादि पक्ष्यांच्या मंजुळ स्वरानीं आकाश भरून गेलें. मृगजल हें पाणीच आहे असें मानून आपली तृषा

---

† नावल व नाटक ह्यांविषयीं निबंध पृ. ८

शांत करण्याकरितां हरिणांचे कळप रानांतून हिकडून तिकडे फिरूं लागले. कितीएक पाथस्थ लोक उष्णतेमुळें त्रास पावून वृक्षच्छायेखालीं मंद शीतळ वारा घेत बसले. ह्याचप्रमाणें गुरांचे कितीएक कळप छायेखालीं बसले आहेत व कितीएक येत आहेत. ह्या ऋतूंत थंड वारा व थंड पाणी फारच प्रियकर वाटतें व अंवशी पाहांटे प्रवास करणे फारच सुखकर होतें. सारांश शीतोपचाराची ह्या ऋतूंत जशी उत्कट इच्छा होते, तशी इतर ऋतूंत होत नाहीं.*

**बोजड भाषाशैली**

ह्या कादंबऱ्यांच्या भाषेमध्येंहि स्वाभाविकपणा बिलकूल नसे. लांबलांब, बोजड व अर्थशून्य वाक्ये लिहिण्यांतच लेखकाना भूषण वाटे. ' मंजुघोषा ' ह्या कादंबरींतील नायिका साध्या पत्रांतहि आपल्या पाडित्याचें प्रदर्शन करिते. अनुप्रास साधण्याच्या हौसेपायीं अर्थहानी होत असतांहि त्याकडे पूर्णपणें दुर्लक्ष करण्यात येई. " वसंतासही संतत उसंत देणारी व–सं–त–मा–ध–व हीं सहा अक्षरें तिचें करगरंध्रद्वारें शिरून आंतील शुद्धिकंदास जागृत अवस्था देती झाली, " ' आवडीने कावडी घेऊन, ' ' सर्व वंदीत असतानाही बदीत ' इ. इत्यादि.

**सामाजिक परिस्थितीचा परिणाम**

भोंवतालच्या सामाजिक परिस्थितीचाहि तत्कालीन कथा–वाङ्मयावर थोडाबहुत परिणाम होणें अपरिहार्य होतें. स्त्री-शिक्षण, पुनर्विवाह, परदेशगमन इत्यादि सामाजिक प्रश्नांवर त्या काळीं कडाक्याचे वाद चालू होते. दोन्ही पक्षांकडील मंडळी आपापल्या मतांचा प्रचार करीत होती. याच

---

* मुक्तामाला ( आवृ० ७ वी ) पृ. ८–९

सुमारास लक्ष्मणशास्त्री हळबे यांनीं 'रत्नप्रभा' ( इ. स. १८६६ ) ही आपली दुसरी कादंबरी प्रसिद्ध केली. तिच्यांत त्यांनीं नायकाचा पुनर्विवाह घडवून आणला आहे.

**लक्ष्मण मोरेश्वरशास्त्री हळबे**

लक्ष्मणशास्त्री हळबे हे महाराष्ट्रांतील पहिले स्वतंत्र कादंबरीकार होत. यांनीं आपल्या 'मुक्तामाला' व 'रत्नप्रभा' या दोन कादंबऱ्या लोकप्रिय करून दाखविल्या आणि मराठी वाङ्मयात अद्भुतरम्य कादंबऱ्यांची नवीन प्रथा पाडिली. त्यांच्याविषयी कांहींच माहिती उपलब्ध नाहीं. मुंबई येथे सामाजिक सुधारणांचा प्रसार करण्यासाठीं स्थापन झालेल्या परमहंस मंडळीविषयी त्यांना विशेष आस्था वाटत असे. 'मराठी ज्ञानप्रसारक मासिका'तहि त्यांच्या कांहीं कविता प्रसिद्ध झाल्या होत्या. 'इंदुप्रकाश' वर्तमानपत्राच्या आरंभींच्या व्यवस्थापकवर्गांत यांचें नांव आढळतें. त्यांची भाषासरणी शुद्ध, साधी पण गोड असून, वर्णने मनोरम आहेत.

**राजा मदन**

इ. स. १८६५ त बाबा गोखले यांनी 'राजामदन' ही दुःखपर्यवसायी कथा प्रसिध्द केली. त्या काळच्या कथावाङ्मयांत दुःखांमध्यें शेवट झालेली अशी ही एकच अपवादात्मक कादंबरी होती. न्यायमूर्ति रानडे यांनीं ह्या कादंबरीसंबंधीं आपल्या निबंधांत " Of the original works Muktamala and Raja Madan are the best "* असा अभिप्राय व्यक्त केला आहे.

---

* **M. G. Ranade**—*Remarks on the Marathi Catalogue*

नारो सदाशिव रिसबुड यांनीं हळबेशास्त्र्यांच्या पावलावर पाऊल टाकून 'मंजुघोषा' (इ. स. १८६८) व 'विश्वासराव' (इ. स. १८७०) ह्या दोन कादंबऱ्या लिहिल्या. यापैकीं 'विश्वासराव' या कादंबरीवर वि. ज्ञा. विस्तारांत सडेतोड टीका आली होती. इ. स. १८६९ त विनायक बाळकृष्ण दामले यांनीं 'अवलिया अथवा मानी स्वभावाचा दारुण परिणाम' ही कादंबरी लिहिली. 'शालापत्रक' मासिकांत हिचें फार मार्मिक परीक्षण प्रसिद्ध झालें होते. याच सुमारास केशव लक्ष्मण जोरवेकर यांनीं 'विचित्रपुरी' (इ. स. १८७०) ही कादबरी प्रसिद्ध केली. हिच्यामध्ये भुताखेतासारख्या लोकभ्रमावर कोरडे ओढले आहेत. "विचित्रपुरी कर्त्याकडून जरी बरेच हास्यास्पद प्रकार घडले आहेत, तरी तिच्यांतील अनेक भाग चटकदार असून, ती कादंबरी एके काळीं बरीच लोकप्रिय झाली होती शिवाय समाजांतील अज्ञानमूलक चालीवर कडक टीका करून व कौटुंबिक कर्तव्यापेक्षां परोपकाराची श्रेष्ठता वर्णून कादंबरीच्या एका नवीन प्रकारास तिनें सुरवात केली, या दृष्टीने तिचे बरेंच महत्त्व आहे."† इ.स. १८७२ त डेविड हाइम या खिस्ती लेखकाने 'प्रियकाता व सुशीला' ही काल्पित गोष्ट लिहिली. ह्याखेरीज त्याने 'गुल व सनोबर' भाग २, 'छेलबताऊ व मोहनाराणी', 'रासक्रीडा' इत्यादि गद्यग्रंथ लिहिले. ह्या काळांतलि एका स्त्री-लेखिकेचा कौतुकास्पद प्रयत्न म्हणून साळूबाई भ्रतार भाऊसाहेब तांबवेकर यांच्या 'चंद्रप्रभा विरहवर्णन' (इ. स. १८७३) ह्या कथाग्रंथाचा उल्लेख करणे जरूर आहे. ह्याशिवाय 'वसंतमाला', (इ. स. १८६८) 'सुहास्यवदना', (इ. स. १८७०) 'चंपकमाला'

### इतर कादंबऱ्या

---

† वि. ज्ञा. वि. पु. ४३ अं. १—२

( इ. स. १८७१ ), ' मनोवेधक मधुसूदन आणि रूपसुंदरी ' ( इ. स. १८७२ ), ' हिरालाल ' ( इ. स. १८७३ ), ' प्रेमबंधन ' ( इ. स. स. १८७४ ) इत्यादि अद्भुतरम्य कादंबऱ्या या काळांत प्रसिद्ध झाल्या.

**घाशीराम कोतवाल**

ऐतिहासिक गोष्टींच्या रचनेंत अभ्दुतता आणि वास्तवता यांच्या मनोहर मिश्रणाला भरपूर वाव मिळतो. या दृष्टीने अद्भुत गोष्टीनंतर ऐतिहासिक गोष्टी लिहिण्याकडे लेखकाची प्रवृत्ति होणे स्वाभाविक आहे. ' मुक्तामाला ' प्रसिद्ध झाल्यानंतर बरोबर दोन वर्षांनीं मोरोबा कान्होबा विजयकर यांनीं ' घाशीराम कोतवाल ' ( इ. स. १८६३ ) हा ऐतिहासिक कथाग्रंथ लिहून प्रसिद्ध केला. सवाई माधवराव पेशव्याचे कारकीर्दींत घाशीराम या नांवाच्या कनोजा ब्राह्मणाकडे पुणे शहरची कोतवाली होती. ' ह्या कोतवालाचे कारकीर्दीचे संबंधानें ह्या ग्रंथांत लोकांचे मनोरंजनार्थ व उपदेशार्थ गोष्टी लिहिल्या आहेत; त्या प्रत्येक गोष्टीचें तात्पर्य काय याचा विचार करून ग्रंथ वाचिला असतां ह्या कोतवालाचे वेळेस किती अंदाधुंदी होती व विद्वान म्हणविणारे लोकांस देहाभिमान व जात्यभिमान मोठा असून त्यांचा नीतिमार्ग किती अशुद्ध व साधारण विषयाविषयीं केवढें अज्ञान होतें हे सहज कळून येईल. "* या ग्रंथांत एकंदर अठ्ठावीस गोष्टी आहेत. त्यांत आळंदीची यात्रा, सेंटपालचें देऊळ, पापीचा स्तंभ, दुर्भिणीचा इतिहास इत्यादि अनेक विषयांची माहिती आलेली आहे. ह्या कथासंग्रहांतील संवाद व वर्णनें चटकदार आहेत. या ग्रंथांत ऐतिहासिक दृष्टया पुष्कळ चुका असल्या तरी मनोरंजकतेच्या दृष्टीनें यांतील गोष्टी निःसंशय सरस वठल्या आहेत.

---

* ग्रंथप्रवेश—घाशीराम कोतवाल.

मोरोबा कान्होबा विजयकर हे पाठारे प्रभु ज्ञातींतील सन्मान्य सुधारक.

**मोरोबा कान्होबा विजयकर**
**( इ. स. १८१३-७१ )**

त्या काळच्या अत्यंत प्रतिकूल परिस्थितींतहि त्यांनीं सामाजिक सुधारणेच्या बाबतींत विलक्षण धडाडी दाखविली. स्वतः पुनर्विवाह करून आपल्या मताचा आजन्म प्रचार केला. विधवाविवाहावरील त्यांचें एक व्याख्यान इ. स. १८७० त प्रसिद्ध झालें होतें. यानीं सरकारी मोठमोठया हुद्द्याच्या जागांवर कामें करून चांगला नांवलौकिक संपादन केला, आणि शेवटीं हे मुंबईंतील स्मालकाज कोर्टाचे जज्ज झाले होते. त्यांच्या वरील कथासग्रहांतील एक गोष्ट नमुन्यादाखल खालीं देत आहे.

रात्रीस भोजन झाल्यावर घाशीराम आपले वाड्यात काहीं वेळपर्यंत पानाच्या पट्ट्या व जर्दा खात बसत असे, व त्यावेळीं आर्जवी मंडळी त्याचे भोंताली जमून त्याचें इनसाफाची व कर्तृत्वाची मोठी तारीफ करित असे. तशा एका वेळीं तेथे एक विजापुरचा गृहस्थ आला. त्याने आपले शहरचे न्यायाधीशाच्या प्रशंसेची गोष्ट सांगितली, की गेले आषाढीचे यात्रेंत विकण्याकरिता पंढरपुरास पाठविण्यासाठीं आमचे शहरचा रामदीन नामें एक गंधी पाचपंचवीस मण चागला सुगंधी बुक्का तयार करून, पन्नास पोतीं भरून, दुसरे दिवशी तीं बैलावर लादून रवाना करणार होता. तीं पोतीं त्याने आपले दुकानामागील चौकात ठेविलीं होतीं. तीं रात्रीस कोणी चोरट्यानीं नेली. रामदीन पहाटेस उठून चौकात जाऊन पहातो तो पोती नाहींत. परंतु इकडे तिकडे कांहीं बुक्का उधळलेला होता व भितीवरून पोतीं चढवून नेल्याच्या खुणा दिसत होत्या. त्यावरून "चोरी झाली रे, चोरी झाली" म्हणून त्यानें आरोळी

ठोकली. त्यावरून जवळपासचे लोक धांवून आले. त्यांस त्यानें मजकूर सांगितला आणि शहरचे कोतवाल समशेरखान यास खबर दिली. त्यावरून त्यांनीं जलदी करून स्वार पाठवून नाकेबंदी केली, आणि सर्व शहरांत शोध केला.परंतु ठिकाण लागेना. तेव्हां बुक्याचे सर्व दुकानदार व त्यांचे गुमास्ते यांजला जमवून चौकशी चालविली, ती दोन प्रहर होत तोंपर्यंत चालली. तथापि पत्ता लागला नाहीं. नतर सर्वांस उभे करून समशेरखान हे त्यासभोवते तीनदा फिरून येऊन समोर उभे राहिले, आणि मोठ्यानें हासून बोलले की हे काय निर्लज्य लोक आहेत! बुक्का चोरला तर चोरला; परंतु त्यापैकी बुक्का कपाळासही लावून येथें आले आहेत! इतकें शब्द ऐकताच जमलेल्या मंडळीपैकीं चौघांजणानी आपआपले कपाळावरून हात जलदीने फिरवून नाकाकडे वास घेण्यास नेले. इतक्यावरून त्या चौघांस एकीकडे काढून तपास करिता, त्यांत दोघेंजण सख्खे बंधू होते, व बाकींचे दोन असामी त्यांचे गुमास्ते होते, असें कळले. त्यावरून त्या उभयतां बंधूचे दुकानचीं व घरचीं तळघरे मशाली लावून शोधली. तेव्हां चोरीस गेलेली पन्नासही पोती अडचणीचे ठिकाणीं लपवून ठेविलेली सांपडली. त्यावरून त्या चौघांचें पारिपत्य केलें. तेव्हां पासून समशेरखान कोतवाल यांचे बुद्धीची व चातुर्याची मोठी प्रशंसा झाली आहे.

सदरहूप्रमाणें गोष्ट विजापुरचे वाण्यानें सांगितलेली ऐकून घाशीराम बोलला कीं समशेरखान व तरवारखान असे अक्कलवान असते तर विजापूरची बादशाई कां बुडाली असती? आमचे शहरांत अशी चोरी झाली असती तर दोन प्रहर व चार प्रहर ते चोर धरण्यास कशास लागते ? आम्ही सर्वांस एका कोठडींत दडपून घालून त्यांपैकीं पांचचार जणांस तापवून लाल केलेले लोखंडी

तऱ्यावर उभे केले असते, म्हणजे चोर कोणते ते एका क्षणांत सांपडले असते. हे भाषण ऐकून घाशीरामाचे घरचे आर्जवी मंडळीनें वहावा करून विजापूरचे वाण्याची मोठी फजीती करण्यास आरंभ केला. तेव्हां तो बापडा उठून गेला.''‡

रामचंद्र भिकाजी गुंजीकर यांनीं इ. स. १८७१ त ' मोचनगड ' ही मराठी भाषेंतील पहिली ऐतिहासिक कादंबरी पुस्तकरूपानें प्रसिद्ध केली. ह्या कादंबरींतील काळ छत्रपति शिवाजीमहाराजांचा घेतला असून, तिची रचना प्रख्यात इंग्रजी कादंबरीकार सर वाल्टर स्कॉट ह्याच्या ऐतिहासिक कादंबऱ्यांच्या धर्तीवर केलेली आहे. त्या काळीं उपलब्ध असलेली ऐतिहासिक साधनें लक्षात घेतां ही कादंबरी पुष्कळच चागली उतरली आहे. गुंजीकरांची भाषा शुद्ध, सरळ, सोपी व प्रसादयुक्त आहे. " यांची सर्वत्र ख्याती आहे ती ते उत्तम शिक्षक अथवा विद्वान् गृहस्थ होते म्हणून नव्हे, तर ते मराठी भाषेंतील एक मार्मिक ग्रंथकार होते म्हणून होय. " *

**मोचनगड**

रामभाऊ गुंजीकर हे गौड सारस्वत ब्राह्मण. यांचें प्राथमिक शिक्षण बेळगांवास व इंग्रजी शिक्षण मुंबईस झालें. यांनीं शाळाखात्यांत बरींच वर्षें काम केलें. इ. स. १८६७ त कांहीं मित्राच्या साह्यानें यांनीं ' विविधज्ञानविस्तार ' या नांवाचे मासिक काढिलें. ते अद्यापिहि चालू आहे. " विस्ताराची टीकाकार म्हणून जी प्रसिद्धी आहे ती त्यास

**रामचंद्र भिकाजी गुंजीकर**
**( इ. स. १८४३--१९०१ )**

---

‡ घाशीराम कोतवाल पृ. १५–१६

* वि. ज्ञा. वि. पु. ३२.

मूळ रामभाऊमुळेंच प्राप्त झाली."† त्यांचे व्याकरणावरील निबंध फार मार्मिक आहेत. यांनीं 'मोचनगड,' 'महाराष्ट्रभाषेची लेखनशुद्धी.' 'अभिज्ञान-शाकुंतल,' 'लाघवी लिपि' इत्यादि गद्यग्रंथ लिहिले. मराठी भाषेंतील एक चतुरस्र लेखक या दृष्टीनें रामभाऊंची योग्यता फार मोठी आहे. त्यांच्या 'मोचनगड' कादंबरींतील खालील उताऱ्यावरून त्यांची लिहिण्याची शैली लक्षांत येईल.

> "मागील प्रकरणांत सांगितल्याप्रमाणे, शिपाई याणे गंगूबाईला ठाणेदार याचे घरी नेऊन पोंचविले; आणि घरांत जाऊन वरर्दा दिला. त्याबरोबर त्याची बायको आतून बाहेर आली. ती मोठी सभ्य वर्तणुकीची असून, तिचे वय सुमारें ३० वर्षाचें दिसत असे. इच्या स्वरूपास व वयास पाहून ती किंचित् दुःखी जाहली, आणि हातपाय धुण्याकरितां पाणी देववून, फारसें कांहीं न बोलता तिला आंत घेऊन गेली. तिला बसावयास एक पाट दिला, आणि आपणही खालीं बसली. गंगूबाईस खालीं बसल्याबरोबर जो एकदम हुंदका आला, त्यामुळें कांहीं केल्या रडे सावरेना. जात्या आर्या स्त्री, तशात तरुण, तशात सुंदर, सुस्वभावाची, सरळ मनाची; तेव्हा अशा स्त्रीचे रुदन पाहून कोणच्या बरें पाषाणहृदयी मनुष्याचें अंतःकरण द्रवल्यावाचून राहील? तिणे खालीं मान करून डाव्या हाताच्या तळाथावर टेकलेले ते गुलाबी रंगाचे गाल, ते विस्तीर्ण कपाळ, ते सरळ उंच नाक, हें सर्व फिक्कट पडून, त्यांजवरील तजेला अगदी नाहीसा जाहला आहे, मुक्ताफळांचा हार तुटून खालीं ती सांडूं लागल्याप्रमाणे, नेत्रांतून घळघळा चाललेल्या अश्रूंच्या धारा गालांवरून खालीं पडत आहेत. अशांतच भीतीस्तव पुनःपुनः डोळे पुसत आहे, परंतु डोळे लाल

† वि. ज्ञा. वि. पु. ३२

झाले व पदर ओला होऊन गेला, तरी तिचें रडें थांबेना. उकळी-वर उकळी येऊं लागली. हे पाहून ठाणेदाराचे स्त्रीस फार वाईट वाटलें. शेजारीं मुलेबाळें जमून आश्चर्यानें व भीतीनें चकित होऊन तिकडच्या तिकडे स्तब्ध राहिलीं आणि एकमेकांच्या तोंडाकडे उदास मुद्रेनें टकमक पाहूं लागलीं." †

ह्याप्रमाणें मराठी भाषेतील कथात्मक वाङ्मयाचा पूर्व-वृत्तात थोडक्यात सांगितला. हळबे–रिसबुड–जोरवेकर–गुजीकरप्रभृति लेखकांचे–कथाग्रंथ कलात्मक दृष्टीनें कितीहि सदोष असले, तरी त्यांनीं महाराष्ट्र–वाङ्मयात स्वतंत्र कादंबऱ्याची परंपरा निर्माण केली, वाङ्मयाच्या बाल्यावस्थेत त्याचें परिश्रमपूर्वक संगोपन आणि संवर्धन केलें, म्हणून ऐतिहासिक दृष्ट्या त्यांची कामगिरी अत्यंत महत्वाची आहे, यांत बिलकुल संदेह नाही.

---

† मोचनगड ( प्रकरण १० )

...६

# परिशिष्ट

## बोधपर गोष्टी व लोककथा.

१. बालबोध—मुक्तावलि—इसापनीतीचे मराठी भाषांतर; (प्रारंभ—प्रपंच्यामाजिं जे शास्त्र लोपल्या मनुष्यसृष्टीचे श्रेष्ठपण.) सरस्वतीपंडित, तंजावर, इ. स. १८०६ (ब्रि.म्यु.)

२. सिंहासनबत्तीसी—भाषांतर, वैजनाथ शर्मा श्रीरामपुर, इ. स. १८१४ (मु.ग्रं.)

३. पंचतंत्र—भाषांतर. वैजनाथ शर्मा, श्रीरामपुर. इ. स. १८१५ (इ.ऑ.)

४. हितोपदेश—भाषांतर, श्रीरामपुर, इ. स. १८१५ (ब्रि.म्यु.)

५. सिंहासनबत्तीशी—भाषांतर, मुंबई, इ. स. १८२४

६. बाळमित्र भाग १—Berquin's Children's Friend ह्या फ्रेंच-कथासंग्रहाचे इंग्रजीवरून भाषांतर—सदाशिव काशिनाथ छत्रे, मुंबई इ. स. १८२८

७. इसपनीतिकथा—भाषांतर. सदाशिव काशिनाथ छत्रे, मुंबई इ. स. १८२८.

८. वेताळपंचविशी—भाषांतर; सदाशिव काशिनाथ छत्रे,
मुंबई इ. स. १८३०

९. बोधकथा-भाषांतर,(दुसरी आवृत्ति.)पुणे इ. स. १८३१

१०. बाळमित्र भाग २—भाषांतर. लेफ्टेनंट टी. गेस्फोर्ड.
मुंबई इ. स. १८३३

११. पंचोपाख्यान—भाषांतर, पुणे. इ. स. १८३६

१२. नीतिदर्पण—स्वतंत्र, विष्णुशास्त्री. ( आवृत्ति दुसरी )
मुंबई. इ. स. १८३७

१३. नीतिकथा—भाषांतर. ( आवृत्ति तिसरी )
मुंबई इ. स. १८३८

१४. बालोपदेशकथा. विष्णुशास्त्री. मुंबई इ. स. १८३८

१५. नीतिकथा— पुणे इ. स. १८४५ (ग्रा.कॅ.)

१६. शालोपयोगी नीतिग्रंथ (Chamber's Moral Class-book)
भाषांतर, हरी केशवजी पाठारे मुंबई इ. स. १८४६

१७. बालोपदेशकथा. इंदूर इ. स. १८४९

१८. इसापनीतिकथा—मेजर कॅंडी यानी शोधिली.
मुंबई इ. स. १८५१

१९. शुकबहात्तरी— मुंबई इ. स. १८५२ (ग्रा.कॅ.)

२०. संक्षिप्त इसापनीतिकथा—मेजर कॅंडी.
मुंबई इ. स. १८५९

२१. नारायणबोध भाग १—स्वतंत्र, रामजी बिन गणोजी चौगुले.
(आपल्या नारायण नामक पुत्रासाठी बोधपर गोष्टी )
मुंबई इ. स. १८६०

२२. सुबोधतरणी–नीतिपर गोष्टी, अप्पाजी गणेश वसईकर. मुंबई,
इ. स. १८६७ (इं. ऑ.)

२३. बोधकथा-गणेश महादेव गोडबोले. पुणें,इ.स.१८६७ (इं.ऑ.)

२४. सुबोधकथासंग्रह भाग १–रावजी श्रीधर गोंधळेकर. पुणं
इ. स. १८७४. (इं.ऑ.)

## पौराणिक आख्यानांच्या व इतर राजांच्या बखरी

२५. बकासुराची बखर, रामचंद्रशास्त्री. पुणे.इ.स.१८४५ (ग्रा. कॅ.)

२६. चंद्रहास्य बखर. इ.स.१८४६ (ई. इं.)

२७. भागवताची बखर, पुणे. इ.स.१८४७ (ग्रा.कॅ.)

२८. शालिवाहनाची बखर. इंदूर. इ.स.१८४९ (ई. इं.)

२९. नंदराजाची गोष्ट. इंदूर. इ.स.१८५१ (इं.ऑ.)

३०. नळराजाची बखर–रामचंद्रशास्त्री. पुणे इ.स.१८५७

३१. लवकुशाख्यानबखर–प्र. नारो आप्पाजी गोडबोले. पुणं,
इ. स. १८६१ (ग्रां.कॅ.)

३२. विराटपर्वाची बखर–चिंतामणशास्त्री थत्ते व गजाननशास्त्री–
डोंगरे. मुंबई. इ. स. १८६२.

३३. नीलकंठराजाची बखर. पुणें इ. स.१८६३ (ग्रां.कॅ.)

३४. द्रौपदीवस्त्रहरणाची बखर–विनायक आपाजी काणे,
पुणे. इ. स. १८६४

३५. पांडवांची बखर–रामचंद्रशास्त्री. पुणें इ.स. १८६९ (ब्रि.म्यु.)

## फारशी भाषेंतील गोष्टींचीं भाषांतरे व त्या धर्तीवर स्वतंत्र कथाग्रंथ.

३६. हातिमताईचरित्र—डंकन फारबस साहेबाच्या इंग्रजी भाषांतरावरून ( भाग ७ ), कृष्णराव माधवराव प्रभु. मुंबई इ. स.१८५४–१८५५ (ब्रि.म्यु.)

३७. बखत्यारनामा अथवा बखत्यारनामक राजपुत्र आणि दहा वझीर यांचा कथा—सर विलियम औस्लेच्या इंग्रजी भाषांतरावरून. नारायण केशव प्रभु. मुंबई इ. स. १८५५ ( ब्रि. म्यु.)

३८. आरबी भाषेतील सुरस व चमत्कारिक गोष्टी—आरेबियन नाइटसचें भाषांतर ( भाग ५ ) कृष्णशास्त्री चिपळूणकर पुणे. इ. स. १८६१ ते ६५.

३९. दुर्दैवी मुराद व दैववान सलाउदीन—इंग्रजीवरून भाषांतर. विनायक नारायण भागवत. पुणें. इ. स. १८६२.

४०. आरबी गोष्टी. ( The thousand and one days ) भास्कर सखाराम. मुबई. इ. स. १८६३ ( ब्रि. म्यु. )

४१. बाहारदानीश अथवा फारसी भाषेतील सुरस व चमत्कारिक गोष्टी (भाग १–२) नारो आप्पाजी गोडबोले पुणें, इ. स. १८६५–६७.

४२ गुल आणि सनोबर (भाग १–२); डेविड हाइम मुंबई इ. स. १८६७–६९.

४३. बागोबहार अथवा चार दर्वेशांच्या गोष्टी, (भाग ३) डंकन फारबसच्या इंग्रजी भाषांतरावरून. मोशे दानिएल तळकर, मुंबई इ. स. १८६९–७१–७१.

४४. पर्शियन नाइटस् अथवा किशबरासिता (भाग १) रावजी मनोहर ताकभाते, पुणे, इ. स. १८७३.

४५. गुलबकावली—गुजराथीवरून भाषांतर, विनायक सदानंद नवलकर मुंबई, इ. स. १८७३ (इ.ऑ.)

## स्त्रीचरित्रात्मक गोष्टी

४६. स्त्रीचरित्र (भाग ४)—रामजी बिन गणोजी चांगुल मुंबई, इ. स. १८५४. (ग्रा.कॅ.)

४७. विदग्ध—स्त्रीचरित्र—चिंतामण दीक्षित जोशी. सातारा इ.स. १८७१

४८. सुशिक्षित स्त्रीचरित्र (भाग १—२)—गोविंद विनायक कानिटकर, मुंबई, इ स. १८७२—७३.

## चातुर्यबोधक गोष्टी

४९. तर्कदीपिका—जनार्दन हरी आठल्ये रत्नागिरी, इ. स. १८५८

५०. चमत्कारिक गोष्टी (भाग ३)—भोज, कालिदास वगैरे यांच्या. नारो आप्पाजी गोडबोले, पुणे इ. स. १८६५—६६

५१ चमत्कारिक न्यायाच्या व अकलेच्या गोष्टी (भाग १)—उर्दु व मराठी. त्र्यंबकराव नारायण राजमाचीकर, पुणे. इ. स. १८६७

५२. एका प्रधानाचे चातुर्य—परशुराम भिकाजी भाटे, रत्नागिरी इ. स. १८६८.

५३. बादशाहा आणि बिरबल यांच्या गोष्टी— मुंबई इ. स. १८६९

## आरबी भाषेंतील गोष्टींच्या धर्तीवर स्वतंत्र कथासंग्रह

५४. मराठी भाषेंतील सुरस गोष्टी (भाग१)—नारायण गोपाळ दामले, विनायक हरी सिनकर मुंबई, इ. स. १८७०

५५. महाराष्ट्र भाषेत मनोरंजक गोष्टी (भाग ५)—केशव रघुनाथशेट चोंचे सईतवडेकर, मुंबई, इ. स. १८७०–७३.

## रूपात्मक गोष्ट ( Allegory )

५६. युरोपाकाकूच्या गाळेंतील मारामारी.

मुंबई इ. स. १८७१

## वनदेवतांच्या गोष्टी ( Fairy tales )

५७ युरोपांतील वनदेवताच्या गोष्टी—अन्न बेल्लियर्स

मुंबई इ. स. १८६८

५८ सुंदरी आणि आस्वल. मुंबई इ. स. १८७१

## इंग्रजी भाषेंतील कल्पित गोष्टींचीं भाषांतरें

५९ ब्रथोल्ड—भवानी विश्वनाथ कानविंदे आणि इतर.

मुंबई इ. स १८५४ (ग्रां.कॅ.)

६० शेरास सव्वाशेर. (चार्लस् व मिस् लॅम् याच्या शेक्सपीयरच्या ग्रंथांतील गोष्टीपैकी 'Taming of the shrew' या गोष्टीचे भाषांतर) सखाराम परशुराम पंडित मुंबई इ. स. १८६७.

६१ विलक्षण न्यायचातुर्य अथवा उज्जनी शहरचा व्यापारी. ( 'ल्याम्स् टेल्स्' या कथासंग्रहांतील 'Merchant of Venice' या गोष्टीचे भाषांतर) सखाराम परशुराम पंडित. मुंबई इ. स. १८६८

६२ अवर्णनीय स्नेहभाव अथवा आनंदपुरनगरांतील दोन तरुण गृहस्थ ('स्यांब्स् टेल्स्' या कथासंग्रहांतील The two gentlemen of Verena या गोष्टीचे भाषांतर) मुंबई इ. स. १८७०

६३ बर्थोल्डचरित्र— एक हिंदु. रत्नागिरी इ. स. १८७०

६४ राबिन्सन क्रूसो ह्याचे चरित्र (भाग १)—दानियल दीफोच्या इंग्रजी ग्रंथाचे भाषांतर. रावजीशास्त्री गोडबोले
मुंबई इ. स. १८७१

६५ स्त्रीन्यायचातुर्य. शेक्स्पियरच्या 'Merchant of Venice' ह्या नाटकाचे कथात्मक रूपांतर— आत्माराम विनायक पाटकर मुंबई
इ. स. १८७१

६६ लावण्यकलिका अथवा कळासुत्री घोडा व बंगाल देशाच्या एका सुंदर राजकन्येची मनोरंजक गोष्ट— भगवंतराव वासुदेवजी घुमरे.
मुंबई इ स. १८७१

६७ जिल्ब्लास—चरित्र पुस्तक १ लें—Adventures of Gil Blas Book I (मूळ फ्रेंच गोष्टीच्या तोबियन स्मालेत यानी केलेल्या इंग्रजी भाषांतराचा अनुवाद.) विष्णु जिवाजी पागनीस
मुंबई इ. स. १८७१

६८ भुरळ–(शेक्स्पीयरच्या 'Comedy of errors' या नाटकाचें कथात्मक रुपांतर) वासुदेव रामचंद्र मोहनी पैठणकर पुणे
इ. स. १८७२

६९ रासेलस— डॉक्टर जॉनसन्च्या कथाग्रंथाचे भाषांतर. कृष्णशास्त्री चिपळूणकर. पुणे इ. स. १८७३

७० इलिझाबेथ अथवा सिबिरिया देशातील हद्दपार झालेले कुटुंब—
'क्लासिकटेल्स' या इंग्रजी कथासंग्रहांतील एका गोष्टीचे भाषांतर.
गोविंद शंकरशास्त्री बापट मुंबई, इ. स. १८७४.

७१ रिचर्दाचे चरित्र—ऐवेनो किंवा एका स्वदेशाभिमानी पुरुषाची
गोष्ट. (सर वाल्टरस्काटच्या ' Ivanoe ' या कथाग्रंथाचे भाषांतर.)
हरी विनायक पनवेलकर. ठाणे इ. स. १८७४.

## संस्कृत भाषेंतील गोष्टींच्या आधारें लिहिलेले कथाग्रंथ

७२ भाषा मंजरी—शब्दशः भाषांतर, काशिनाथ वासुदेव खांडेकर,
मुंबई इ. स. १८७० (इं.ऑ.)

७३ कादंबरीसार—बाणभट्टाच्या कादंबरीच्या प्राकृत भाषांतराचा
सारांश—परशुरामपंत गोडबोले मुंबई इ. स. १८७२.

## ख्रिस्ती कादंबऱ्या

७४ यमुनापर्यटण अथवा हिंदुस्थानातील विधवांच्या स्थितीचे निरूपण.
बाबा पदमनजी मुंबई इ. स. १८५७.

७५ फुलमुनी आणि करुणा ह्यांचा वृत्तांत—मिसेस म्युलेन्सच्या कथा-
ग्रंथाचे भाषांतर. मुंबई इ. स. १८५९.

## स्वतंत्र कादंबऱ्या

७६ मुक्तामाला—लक्ष्मण मोरेश्वरशास्त्री हळबे.
मुंबई इ. स. १८६१.

७७ राजामदन–दुःखपर्यवसायी कथा–बाबाजी कृष्ण गोखले,
मुबई इ. स. १८६५.

७८ सुलोचना आणि माधव–रामचंद्र भिकाजी गोखले,
मुबई इ. स. १८६५ (ब्रि.म्यु)

७९ चंद्रकांत–बाळकृष्ण रामचद्र दोंदे,
रत्नागिरी इ. स. १८६६.

८० रत्नप्रभा–लक्ष्मण मोरेश्वरशास्त्री हळबे,
मुंबई इ. स. १८६६

८१ प्रभवमालिनी आणि कलावती–एक स्वदेश कल्याणेच्छु,
मुंबई इ. स. १८६८

८२ मंजुघोषा—नारो सदाशिव रिसबुड, पुणे
इ. स. १८६८(इं.ऑ.)

८३ वसंतमाला–केशव रघुनाथ. पुणे, इ. स. १८६८(इं.ऑ.)

८४ अवलिया अथवा मानी स्वभावाचा दारुण परिणाम–विनायक
बाळकृष्ण दामले, पुणे इ. स. १८६९.

८५ विश्वासराव–नारो सदाशिव रिसबुड, संगमनेरकर
पुणे इ. स. १८७०.

८६ सुहास्यवदना–वामन कृष्ण देशमुख,
मुंबई इ. स. १८७०.

८७ विचित्रपुरी–केशव लक्ष्मण जोरवेकर,
मुंबई इ. स. १८७०.(इं.ऑ.)

८८ बोधसुधा अथवा एका तरुणाचा इतिहास—केशव बळवंत केळकर,
मुंबई इ. स. १८७१.

८९ चंपकमाला—आण्णा मार्तंड जोशी, विनायक परशुराम बात्रे.
मुंबई इ. स. १८७१. (इं.ऑ.)

९० मनोरंजक कल्पित गोष्ट—पुरुषोत्तम गोपाळ केळकर.
रत्नागिरी इ. स. १८७१ (इं.ऑ.)

९१ विलासिनी—रामचंद्र आबाजी राजे,मुंबई इ. स. १८७१

९२ मनोवेधक मधुसूदन व रूपसुंदरी—गणेश विनायक कानिटकर,
मुंबई इ. स. १८७२.

९३ प्रियकांता व सुशीला—डेविड हाइम. मुंबई इ. स. १८७२.

९४ चंद्रप्रभाविरहवर्णन—साळूबाई भ्रतार भाऊसाहेब तांबवेकर,
पुणें इ. स. १८७३.

९५ हिरालाल—गणेश विनायक कानिटकर,
मुंबई इ. स. १८७३. (इं.ऑ.)

९६ मनमोहिनी—आब्राहाम दानियल कुरूलकर,
मुंबई इ. स.१८७३. (इं.ऑ.)

९७ वैरागी—कृष्णनाथ रघुनाथजी, मुंबई इ. स. १८७३ (इं.ऑ.)

९८ प्रेमबंधन ( भाग १ )—नारायण दामोदर योगी,
पुणें इ. स.१८७४

९९ सुवर्णमालिनी—जगन्नाथ सखारामशास्त्री व दामोदर बापूजी नाईक,
मुंबई इ. स. १८७४.

## ऐतिहासिक कथा-ग्रंथ

१०० घाशीराम कोतवाल-मोरोबा कान्होबा,
पुणे इ. स. १८६३.

१०१ मोचनगड-रामचंद्र भिकाजी गुंजीकर,
मुंबई इ. स. १८७१.

## संकीर्ण कथाग्रंथ

१०२ बाटसराची गोष्ट-राघो नारायण देवळे,
पुणे इ. स. १८५३.

१०३ हत्तीच्या गोष्टी-कोंडो अमृत, पुणे इ. स. १८५३. (ग्रा.कॅ.)

१०४ मिनोराबाई-मुलीसाठी. मुंबई इ. स. १८७०.(इं.ऑ.)

१०५ नकली-वासुदेव बापूजी मंत्री, मुंबई इ. स. १८७२ (इं.ऑ.)

१०६ पुष्पमाला-कथासंग्रह. नारायण रावजी खैरे, केशवचंद शिवचंद.
अहमदनगर इ. स. १८७२ (इं.ऑ.)

१०७ स्नेह्याची भेट—जनार्दन मोरोबा पाटील, गोरेगावकर,
मुंबई इ. स. १८७२. (इं.ऑ.)

१०८ शृंगार-मंजरी-विठ्ठल बाळकृष्ण सरनाईक,
पुणें. इ. स. १८७४. (इं.ऑ.)

## ३ नाटकें

महाराष्ट्रात नाट्यकलेचा उदय होण्यापूर्वी लळीतवाले, तमासगीर, शाहीर, गोंधळी आणि बहुरूपी हे आपल्या समयसूचकतेनें व अभिनय-कौशल्याने सामान्य जनांची करमणूक करीतअसत. बदलत्या परिस्थितीप्रमाणें मनोरंजनाच्या या साधनांतहि फरक होणें स्वाभाविक होते.

**मराठी रंगभूमीचे जनक विष्णु अमृत ऊर्फ विष्णुदास भावे ( इ. स १८१९-१९०१)**

" सुमारें सव्वाशें वर्षापूर्वी भगळूरकडील एका विद्वान गृहस्थाने पुष्कळ दशावतारांची नाटकें लिहून कर्नाटकी नाट्य-संस्थेला व्यवस्थित स्वरूप देण्याचा प्रयत्न केला. ही नाटके करणाऱ्या मंडळ्या कर्नाटकात, महाराष्ट्रांत व गुजराथेंतही फिरत असत. " * यापैकीं 'भागवत' नावाची एक नाटक-मंडळी इ. स. १८४२ साली सांगलीस आली. तिचे दोन तीन खेळ पाहून तेथील अधिपति चिंतामणराव अप्पासाहेब यांना मराठींतहि अशी नाटकें बसवावी असें वाटलें. श्रीमंतांच्या प्रोत्साहनाने त्यांच्या आश्रयाखालील विष्णु अमृत ऊर्फ विष्णुदास भावे या कल्पक तरुणाने वरील मंडळीच्या पौराणिक खेळांच्या धर्तीवर इ. स. १८४३ त 'सीता-स्वयंवर' या नाटकाचा प्रयोग करून दाखविला व मराठी रंगभूमीचा पाया घालण्याचे श्रेय संपादन

---

* **वा. ग. मुर्डेश्वर** –' जानपद नाट्याचे पुनरुज्जीवन '.
रत्नाकर. एप्रिल १९३२

केले. श्रीमताच्या इच्छेस्तव त्यांनीं मराठी भाषेंत आणखी कांही नाटकें बसविण्याचा निश्चय केला, व अनेक आपत्तींना धैर्यानें तोंड देऊन तो तडीसहि नेला. प्राचीन मराठी कविता प्रायः श्लोकबद्ध असल्यामुळे नाटकाच्या उपयोगास येईना; तेव्हा त्यांनी पौराणिक कथा–भागावर रसानुकूल पद्यरचना करून सुमारे पन्नास नाट्यप्रयोग बसविले. या नाटकाचें महत्त्व प्रयोगापुरतेंच मर्यादित होतें. वाङ्मयाच्या दृष्टीने त्याची रचना केलेली नव्हती. तरी पण विष्णुदास भावे यानी मोठ्या कल्पकतेने व योजना चातुर्याने ह्या नाटकांच्या द्वारे महाराष्ट्रात रंगभूमीची स्थापना करून मराठी नाट्यवाङ्मयाच्या रचनेला अनुकूल परिस्थिति निर्माण केली असे म्हणावयास हरकत नाही.

## नाट्यवाङ्मयाचा प्रारंभ–भाषांतरात्मक नाटकें.

**मराठी भाषेंत छापलेलें पहिलें नाटक–'प्रबोधचंद्रोदय'**

सतराव्या शतकाच्या अखेरीस तंजावरच्या राजानें 'लक्ष्मीनारायण-कल्याण' नाटक करविलें होतें. इतरहि आणखी बरीच नाटकें तेथील ग्रंथालयाच्या यादींत आढळतात. परंतु एकोणिसाव्या शतकांत या नाटकाची कोणालाहि माहिती असण्याचा संभव नव्हता. नाट्यवाङ्मयाचा तो प्रवाह अल्पावधीतच लुप्त झाला असावा असें दिसतें. अर्वाचीन मराठी नाट्यवाङ्मयाचा प्रारंभ एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धात झाला. मराठी भाषेतील इतर ग्रंथाप्रमाणें आरंभींची मराठी नाटकेंहि भाषांतरात्मकच होतीं. त्याकाळीं महाराष्ट्र भाषेविषयी आस्था बाळगणारे लोक मुख्यतः संस्कृत भाषेचे पंडित होते. संस्कृत भाषाहि नाट्यवाङ्मयाच्या बाबतीत संपन्न होती, यामुळे साहजिकच संस्कृत नाटकांच्या भाषांतराने मराठी नाट्यवाङ्मयाचा प्रारंभ झाला. सदाशिव बजाबाशास्त्री अमरापुरकर व रावजी बापूजीशास्त्री बापट यानी इ. स. १८५१ त श्रीकृष्णमिश्र पंडिताच्या 'प्रबोधचंद्रोदय' नाटकाचें मराठींत

भाषांतर केलें. हे मराठी भाषेत छापिलेलें पहिलें नाटक होय. नाटककाराचा उद्देश वेदांतशास्त्राचे गहन सिद्धांत लौकिक व्यापारामध्येच निमग्न असणाऱ्या प्राकृत जनांना कळावे म्हणून त्याचें संवादरूपानें प्रतिपादन करण्याचा आहे. या नाटकांत काम, रती, विवेक आणि त्याची स्त्री मति, दंभ, अहंकार, महामोह, क्रोध, लोभ इत्यादि पात्राकरवीं मानवी मनातील दुर्दमनीय विकारांचे हिडिस स्वरूप उघड करून दाखविलें आहे; आणि सामान्य जनांची परमार्थाकडे प्रवृत्ति व्हावी व त्यांनीं ईश्वराच्या वास्तविक स्वरूपाचें ज्ञान प्राप्त करून घ्यावें म्हणून उपदेश केला आहे. "हें भाषांतर बहुधा संस्कृतावरून पदशः केलें आहे, व कोठें कोठें मराठींत बरोबर संबंध येण्याकरितां सारांश घेऊन लिहिलें आहे," [1] मराठी भाषेतील या पहिल्या नाटकाची रचना कशा स्वरूपाची होती, ते लक्षांत यावें म्हणून त्यांतील एक लहानसा उतारा खाली देत आहे.

"(महामोह, क्रोध, लोभ, हिंसा आणि तृष्णा.क्रोध व लोभ हे सर्व आपल्या स्त्रियांसहवर्तमान वाटेनें येत असतां परस्पर संभाषण करितात.)

**क्रोध**—मी ऐकिलें कीं, शांति, श्रद्धा व विष्णुभक्ति ह्या महाराजांशीं प्रतिकूल वागतात; अहो! मी जिवंत असतां आपल्या जिवाची आशा सोडून त्याच्यानें यथेच्छ वागवेल काय? पहा! माझें सामर्थ्य, मी ज्याच्या हृदयांत प्रवेश करितों तो मनुष्य डोळस असूनहि अगदीं अंधळा होतो, जेणेकरून त्यास कर्तव्याकर्तव्य कांहीं एक दिसत नाहीं; कोणी हिताचीहि गोष्ट सांगितली तथापि तो ती ऐकत नाहीं; फार काय सांगू, मोठा बुद्धिवान् व

[1] प्रस्तावनाः—प्रबोधचंद्रोदय नाटक.

धर्मशास्त्रज्ञहि असला तरी माझ्या योगाने दोषादोषविचार न पाहता दुसऱ्याचा घात वगैरे करण्यास प्रवृत्त होतो.

**लोभः**—अरे, जे लोक मजवर विशेष प्रीति करितात, व ज्यावर माझी कृपा झाली, त्यांच्या मनोरथ-परंपराच पूर्ण होत नाहींत; कितीहि द्रव्य मिळाले तरी ते नेहमी अधिकाधिक द्रव्याचीच इच्छा करीत असतात तें असे की, " हे इतके माझे मदोन्मत्त हत्ती आहेत, इतके वायूच्या वेगासारखे त्वरित चालणारे घोडे आहेत; व याहूनहि अधीक मिळवीन;" याप्रमाणे सर्वकाळ ज्याची अंतःकरण द्रव्य-चिंतनेने जर्जर झाली आहेत, अशा पुरुषास शांत व ईश्वरभक्ती इत्यादिकांचा संबंध कोठून असणार ?

**क्रोधः**—सख्या, माझा प्रभाव तुला ठाऊक आहे ? अरे; मजकरिता इंद्राने पूर्वी त्वष्ट्याचा पुत्र वृत्रासुर त्यास ठार मारले, व चंद्रशेखर भगवान् शिवहि माझ्याच स्वाधीन होऊन ब्रम्हदेवाचे मस्तक तोडिता झाला; तसेच विश्वामित्र ऋषीनेहि माझ्याच योगानें वसिष्ठाचे शंभरपुत्र मारले; व मोठे विद्वान, सदाचार-संपन्न, दानशील, .कीर्तिमान् आणि शूर अशाहि लोकास आपल्या स्वाधीन करून त्यांचा समूळ नाश करण्यास मला एक क्षणहि नको.

**लोभः**—( आपल्या स्त्रीस हाक मारतो.) तृष्णे इकडे ये.

**तृष्णाः**—( जवळ येऊन नम्रतेने ) महाराज काय आज्ञा ?

**लोभः**—प्रिये तुझ्या योगाने हे लोक एक शेत मिळाले असता खेड्याची इच्छा करितात, खेडे मिळालें म्हणजे मोठ्या शहराची इच्छा करितात, तेंहि मिळाले असता द्विपाची इच्छा

करितात, तोहि मिळाल्यावर त्यास सर्व पृथ्वीची आशा उत्पन्न होती; याप्रमाणे कितीहि संपत्ति मिळाली तरी त्याची तृप्ति होतच नाही; यास्तव तूंच: कृपा करून आपल्या आंगे पुष्ट करशील ( म्ह. वृद्धिगत होसील. ) तर त्यास लक्षावधि ब्रम्हांडेहि मिळाली तरी शांती होणार नाही.

**तृष्णा**:—महाराज याविषयी मी स्वतः नेहमी उद्योग करितच आहे; त्यात आज स्वामीची आज्ञा झाली तर आता कोट्यावधी ब्रम्हांडानीहि माझी तृप्ती होणार नाही असे मी करीन.

**क्रोध**:—( आपल्या स्त्रीस बोलावतो. ) हिंसे इकडे ये.

**हिंसा**:—(हात जोडून बोलती) महाराज ही मी जवळ आहे काय आज्ञा असेल ती करावी.

**क्रोधः**—प्रिये धर्मपत्नी जी तूं या तुझ्या सहाय्याने मला मातृ–पितृ–वधहि सुलभ वाटतो; अगे पहा! मी क्रोधाविष्ट झालों असता पिशाचरूप या आईबापासहि मोजीत नाहीं मग हे क्षुल्लक भ्राते व दुसरे जे मामा काका इत्यादिक बांधव यांची काय कथा? हे तर मला शुद्ध किड्याप्रमाणे वाटतात मग जारिणी-प्रमाणे अक्षय स्वहितच पाहणारे कपटी जे सोयरेधायरे वगैरे ज्ञाती याजविषयी मला दया कोठून येईल? ( हात चोळून व दात ओंठ खाऊन) पहा या विवेकादिक बांधवांचा समूळ नाश केल्या-वाचून प्रज्वलित झालेला असा हा माझा क्रोधाग्नि कधींहि शांत होणार नाहीं. ( पुढें पाहून ) अहो ही महाराज महामोहाची स्वारी बसली आहे तर चला आपण सर्व तेथे जाऊं.'' †

---

† प्रबोधचंद्रोदय नाटक ( अं. २ प्र. ३ ) पृ. ४८–५१.

...७

## अर्वाचीन मराठी गद्याची पूर्वपीठिका

**भास्कर दामोदर पाळंदे**
**(इ. स. १८३२–७४)**

मराठी ज्ञानप्रसारक मासिकाच्या चौथ्या व पाचव्या पुस्तकामधून विक्रमोर्वशीय नाटकाचे गद्यपद्यात्मक भाषांतर प्रसिद्ध झाले होतें. हे भाषांतर बहुतेक शब्दशः केले असून त्यातील पद्यभाग दोनचार अपवाद सोडून मूळ वृत्तातच रचलेला आहे. भाषांतराच्या शेवटी खालील माहिती दिलेली आहे. " हे नाटक कालिदास नामक विख्यात कवींनी संस्कृत भाषेंत केलेले आहे. त्याचे मूळ स्वरूप तर प्राकृत भाषेत यथार्थ दाखविणे अशक्य. परंतु यथाशक्ति भाषांतराच्या द्वाराने त्याच्या स्वादाचा एक लेश जा गृहस्थास संस्कृत भाषेचें ज्ञान नाही त्यास प्राप्त करून देण्याविषयी हा यत्न भास्कर दामोदर पाळंदे याणी केला आहे. भाषांतरांत विद्वज्जनांस दोष आढळतील यांत नवल नाहीं, परंतु जा उद्देशाने ते केले आहे तो जर सिद्धीस गेला, अथवा तसेहि न होता त्याच्या योगाने जर दुसऱ्या कोणास निर्दोष भाषांतर करून प्रसिद्ध करण्याची इच्छा उत्पन्न झाली तर कर्त्याचे मनोरथ पूर्ण झाल्यासारखे होतील."† संस्कृत भाषेतील प्रख्यात नाटककाराच्या कलाकृतीचे मराठींत भाषांतर करण्याचा हा पहिलाच प्रयत्न होय. भास्कर दामोदर पाळंदे याचा जन्म वाई क्षेत्राजवळील मेणवली गांवी इ. स. १८३२ त झाला. याचे शिक्षण प्रथमतः ठाण्यास व नंतर मुंबईस झालें. अत्यंत गरिबीच्या स्थितीतूनहि केवळ आपल्या आगच्या गुणाने ते पुढे आले, व शेवटी स्मॉलकॉज कोर्टातील न्यायाधीशाच्या पदापर्यंत पोहोचले. आपले सरकारी काम सांभाळून त्यांनी मराठी वाङ्मयाच्या वाढीला यथाशक्ति हातभार लाविला. मराठी ज्ञानप्रसारक मासिकांत ह्यांचे अनेक शास्त्रीय व व्यावहारिक विषयांवर लेख आले होते. ' विद्युत् अथवा विद्युल्लता, ' व 'सृष्टीच्या सौंदर्याविषयी निबंध ' हे त्यांचे लेख सुबोध व माहितीपूर्ण आहेत. प्राकृत पद्यरचनेवरील त्यांचा निबंध स्वतंत्र पुस्तकरूपानेंहि प्रसिद्ध झाला आहे.

† मराठी ज्ञानप्रसारक ( पु. ५ अं. ७ ) पृ. २२३

याशिवाय ' गीतासुधा ' आणि ' रत्नमाला ' हे त्याचे पद्यग्रथ त्याच्या रसिकतेची आणि भक्तियुक्त अंतःकरणाची उत्कृष्ट साक्ष पटवितात. इ. स. १८७४ त त्याचा अकाली अत झाला. ईश्वरकृपेने त्यांना अधिक आयुष्य लाभते तर त्याच्या हातून मराठी भाषेची फार चागली सेवा झाली असती यात काही संशय नाही.

**परशुराम बल्लाळ गोडबोले (इ. स. १७९९-१८७४)**

ह्यानंतर परशुरामपंत गोडबोले यानी ' वेणीसहार ' इ. स. (१८५७) ' उत्तररामचरित्र ' ( १८५९ ) ' शाकुंतल ' इ. स. ( १८६१ ), ' मृच्छकटिक ' इ. स. ( १८६२ ), आणि 'पार्वती-परिणय-' (इ. स. १८७२) ह्या संस्कृत नाटकांची मराठीत भाषातरे केली, व महाराष्ट्रांतील रसिकजनाना जगन्मान्य सस्कृत कवीच्या नाट्य-वाङ्मयाची ओळख करून दिली. एकाच कवीच्या नाटकाची भाषातरे न करता कालिदास-भवभूति-बाणभट्टादि सर्व कवीच्या एक एक नाटकाचे भाषातर करून त्यानी नाट्यसृष्टीमध्ये विविधता आणली; व आपल्या समकालीन शास्त्रीपडितांना भाषातराचा कित्ता घालून दिला.

॥ सौवर्णपात्री सुरसासि गोडी । जी तीहुनी पर्णपुटी न थोडी ।
। परंतु ते दुर्लभ पात्र ज्याला । ती यांत सारीच मिळेल त्याला ॥

मूळ नाटकांतील गोडी जशीच्या तशीच भाषांतरामधूनहि चाखावयास मिळेल असा आत्मविश्वास ह्या श्लोकांत परशुरामतात्यांनी प्रगट केला आहे. तात्या आपल्या वेणीसंहाराच्या उपोद्घातांत म्हणतात ' आता भाषांतर म्हटले म्हणजे शब्दास शब्द बरोबर असावे; परंतु तसें केवळ येथे नाही. प्राय: बरोबरी आहे, पण क्वचित् स्थळी फेरफार केला आहे. कारण की, सस्कृत भाषेची रीति निराळी आणि महाराष्ट्र भाषेची रीति निराळी पडते, आणि सस्कृताप्रमाणे

शब्दास शब्द लावून भाषांतर केले असता तें महाराष्ट्र भाषेच्या रीतीनें सर्वांशीं चांगलें दिसत नाही. कोठें कोठें रसभंग होतो. म्हणून क्वचित् स्थळीं संस्कृतांतील अर्थ घेऊन महाराष्ट्र भाषेच्या रीतीने लिहावें लागतें" तात्या मोठे रसिक व मर्मज्ञ होते. प्राचीन मराठी कवितेचा त्यांचा दीर्घ व्यासंग होता. मोरोपंताच्या आर्या लावण्यात तर त्यांचा हातखंडा असे. त्यामुळे त्यांची सर्वच भाषांतरे सरस वठलीं आहेत. "मुळावरून जो रसाविर्भाव होतो तो भाषांतरावरून झाला पाहिजे हे भाषांतराचें मुख्य तत्त्व तात्यांच्या ग्रंथांत चांगले व्यक्त होते."‡ हा बालबोधकाराचा अभिप्राय यथायोग्य आहे. तात्यांचा जन्म वाई येथे इ. स. १७९९ त झाला. नारायणशास्त्री देव यांच्यापाशीं ते संस्कृत पढले. तात्यांचे वडील बंधु दाजीबा यांच्या सहवासानें त्यांना मराठी कवितेची गोडी लागली. 'पुढे प्रपंचाच्या निर्वाहार्थ तात्या पुण्यास येऊन आपले मातुल जोग यांच्या पेढीवर कारकून राहिले.' ह्यावेळींच मराठीच्या मार्मिक ज्ञानाविषयीं त्यांचा चांगला लौकिक होता, म्हणून मराठी कोश तयार करण्यासाठी सरकारनें जें शास्त्रीमंडळ नेमले त्यात तात्यांचीहि योजना झाली. त्याच सुमारास पुणे कॉलजचे प्रिन्सिपाल मेजर क्यांडी यांच्याशीं त्यांचा परिचय झाला. पुढें मराठी क्रमिक पुस्तके रचण्याकरितां जेव्हां क्यांडी साहेबांची भाषांतरकार म्हणून नेमणूक झाली, तेव्हां त्यांनीं तात्यांना मराठी पंडित या नात्याने आपल्या हाताखाली ठेविले. इ. स. १८५४ त तात्यांनीं मराठी काव्यांतील निवडक वेच्यांचा संग्रह करून 'नवनीत' या नांवानें प्रसिद्ध केला. प्राचीन मराठी काव्याचा महाराष्ट्रात प्रसार होण्यास त्यावेळीं हा ग्रंथच प्रामुख्याने कारणीभूत झाला. दादोबांची 'यशोदापांडुरंगी' सामान्य लोकांना समजण्यास कठीण म्हणून तात्यांनीं 'केकादर्श' लिहिला. ह्याशिवाय वृत-

‡ बालबोध—फेब्रुवारी १९०५

दर्पण ' ' संक्षिप्त भूगोल–वर्णन ' ' कादंबरीसार ' ' पांडुरंगस्तोत्रावरील टीका' इत्यादि गद्य–ग्रंथ त्यांनीं प्रसिद्ध केले. अशा रीतीनें महाराष्ट्रभाषेची आजन्म सेवा करून परशुराम तात्या इ. स. १८७४ त दिवगत झाले. त्यांच्या ' वेणीसंहार ' नाटकातील खालील उताऱ्यावरून त्यांच्या सुगम भाषासरणीची कल्पना येईल.

" ( इतक्यात पडद्या पलिकडे शब्द होतो. )

अरे दुष्टा, अरे द्रौपदीकेशांबराकर्षणरूप महापातक करणाऱ्या, अरे धार्तराष्ट्र–पुत्राधमा, फार दिवसांनी माझ्यापुढे आला आहेस. हे क्षुद्र–पशो, आता कोठे जातोस ? आणखी अरे राधेय-दुर्योधन–शकुनि–प्रभृति–पांडव–द्वेष्ट्यांनो, अरे धनुर्धरहो, अरे मानधनहो, ऐका सर्व तुम्ही माझें भाषण.

**श्लोक ४८**

जेणे राजसभेत तै द्रुपदजा केशांसि आकर्षिले ॥
जेणे त्या गुरुच्या समक्ष सतिच्या वस्त्रासही ओढिले ॥
ज्याचे फोडुनि वक्षरक्त पिउं म्यां केली प्रतिज्ञा अहो ॥
तो हा मद्भुजपंजरीं गवसला राखा तुम्ही यास हो ॥ ६८ ॥

( सर्व लोक कान देऊन ऐकतात. )

**अश्वः**—अहो अंगराज, कौरवसेनापते, अहो जामदग्न्य-शिष्य, अहो द्रोणाचार्य-निंदक, आपल्या भुजबलानें सकल लोकांचे संरक्षण करणारे आणि " माझ्या करीं जोवरी धन्व बाण अन्यायुधें निष्फळ सर्व जाण " असे म्हणणारे ते तुम्हीच ना ? प्रसंग जवळच आला आहे. आता पुढे व्हा आणि कांहीं सामर्थ्य असेल तर भीमसेनापासून त्या गरीबा दुःशासनाला सोडवा.

**कर्णः**—ओः जारे काय शक्ति आहे त्या भीमाची, की मी जिवंत असता आमच्या युवराजाच्या छायेलाही स्पर्श करूं शकेल? युवराजा, दुःशासना, भिऊं नको, भिऊं नको, हा मी आलो पहा.

( असे बोलून निघून जातो. )

**अश्वः**—राजा कौरवेश्वरा, हे कौरव सैन्य भीष्मद्रोणादिरहित झाले असे पाहून भीमार्जुनांनी फार अनर्थ माडला आहे. तर तुमच्या राधेयाच्या हातून त्या दोघा वीराचे निवारण व्हावयाचे नाही. यास्तव आपणच स्वता भावाला सोडविण्याकरिता जावे हे बरे.

**दुर्यो**:—ओः काय शक्ति आहे त्या दुष्टा भीमाची किंवा दुसऱ्याची ? अरे मी शस्त्रपाणी जिवंत असता माझ्या वत्सा दुःशासनाच्या छायेस तरी कोणी हात लावूं शकेल काय ? वत्सा, भिऊं नको, भिऊं नको, कोण आहे रे ? माझा रथ लौकर आण. ( असे म्हणून निघून जातो. )

**अश्वः**—( पुढे पाहून ) मातुला, अरे हे पहा काय अरिष्ट आले ते, अरे हा अर्जुन, आपल्या भावाची प्रतिज्ञा सिद्धीस जावी या बुद्धीने राधेय आणि दुर्योधन यास अडविण्याकरिता त्या दोघावर एकसारखी मोठी शरवृष्टि करीत त्याच्या मागे लागला आहे. पहा, हाय हाय आता कसे होईल ? मला वाटते खचात भीमाने दुःशासनाच्या उरस्थळाचे रक्त प्राशिले. आता दुर्योधनाच्या भावाची विपत्ति माझ्याने पहावत नाही मातुला, असत्य वचनाचा दोष मला पतकरला. आण आण माझे शस्त्र कोठे आहे ते.

आर्या ४९

सत्याहुनि अनृत भले स्वर्ग जळो दुर्गतीस जाईन ॥
भीमापासुनि दुःशासन राखायास खड्ग घेईन ॥ ४९ ॥

( असे म्हणून खड्ग उचलावयास पहातो. )
( इतक्यात बाहेर मोठ्याने शद्ब होतो. )

हे महात्म्या भारद्वाजपुत्रा, अश्वथाम्या, त्वा आजपर्यंत कधीही सत्यवचनाचे उल्लंघन केले नाही. यास्तव तू आज सत्यवचन उल्लंघायास योग्य नव्हेस.

**कृपाचार्यः**–वत्सा, आकाशवाणी तुला अनृतापासून राखीत आहे.
**अश्वः**––काय ही देववाणी ? मला संग्रामास जाण्याविषयी अनुमोदन देत नाही काय ? काय करावे आता. ही मोठीच अडचण झाली. काय सांगावें, देवही पांडवाचे पक्षपाती झाले? आता खचित भीमाने दुःशासनरुधिराचे पान केले असावे यात काही संशय नाही. कायहो संकट हे ? अहो.

आर्या ५१

दुःशासनरुधिराचे अरि करिता पान मी उदासीन ॥
समरी सुयोधनाचे दुसरे मग कोणते हित करीन ॥ ५१ ॥

मातुला, त्या मूर्खा राधेयावर क्रोध करून म्या शस्त्र टाकिले हे फार वाईट केले. असो, आता उपाय नाही. आता तूं तरी राजाच्या पाठीवर साह्य करावयास जा.

**कृपाः**––हा मी निघालो. राजाचे साह्य करावयास. तूंही शिबिरास जाऊन तेथेच ये.

( असें बोलून दोघे निघून जातात. )–"*

* वेणीसंहार नाटक ( अ. ३ ) पृ. ११५–१९.

**कृष्णशास्त्री राजवाडे**
**( इ. स. १८२०–१९०० )**

कृष्णशास्त्री राजवाडे यांनीहि ' मालतीमाधव ' ( इ. स. १८६१ ) ' मुद्राराक्षस ' ( इ. स. १८६७ ) ' शाकुंतल ' ( इ. स. १८६९ ) व ' विक्रमोर्वशीय ' ( इ. स. १८७४ ) या चार नाटकांची संस्कृतावरून मराठीत भाषांतरें केली. " भाषांतरांत मूळ ग्रंथाचा शब्दशः तरजुमा केला आहे असे नाहीं. तथापि मराठी भाषेची रीत राखून, व पद्यरचनेचे नियम न सुटतां जितका मूळचा अर्थ आला तितका आणला आहे, व मुळांतला मार्मिक व मुख्य अर्थ प्रायः सोडला नाहीं. " † विक्रमोर्वशीय नाटकाच्या प्रस्तावनेत राजवाडे ह्यांनी 'वीरचरित' नाटकाचें भाषांतर केल्याचा उल्लेख आढळतो, पण त्याबद्दल जास्त कांहीं माहिती मिळत नाहीं. कृष्णशास्त्री राजवाडे यांचा जन्म इ. स. १८२० त झाला. यांनी पुणें येथील पाठशाळेत न्याय, अलंकार, वेदांत व धर्म या शास्त्रांचा अभ्यास केला. पुढे याच पाठशाळेत त्यांना अलंकारशास्त्राच्या उपगुरूची जागा मिळाली. इ. स. १८५३ त त्यांनी ' अलंकारविवेक ' हा ग्रंथ लिहिला. ह्याशिवाय ' उत्सवप्रकाश ' व ' ऋतुवर्णन ' ही त्यांची काव्येंहि स्वतंत्र असून सरस उतरली आहेत. हे इ. स. १९०० त निवर्तले.

**गणेशशास्त्री लेले**
**( इ. स. १८२५–९८ )**

गणेश सदाशिवशास्त्री लेले यांनीं ' जानकी–परिणय ' ( इ.स. १८६५), ' मालविकाग्निमित्र ' ( इ. स. १८६७ ) व ' विद्धशालभंजिका ' ( इ. स. १८६९ ) या तीन संस्कृत नाटकांचीं मराठींत भाषांतरें केलीं. याशिवाय इ. स. १८७७ त ' कर्पूरमंजरी ' ही नाटिकाहि बालभाषेतून मराठींत करून छापिली. हीं भाषांतरें " मूळार्थास धरून असून पुनः अत्यंत

---

† प्रस्तावना—मालती माधव.

सरस व शुद्ध असल्याबद्दल त्या त्या वेळच्या चिटणिसांनी त्याची रिपोर्टांत विशेष तारीफ केलेली आढळते." † गणेशशास्त्री हे मोठे व्युत्पन्न व रसिक असल्यामुळेच त्यांचीं भाषातरे दोषरहित व सरस झालीं आहेत. गणेश शास्त्र्यांचा जन्म श्रीक्षेत्र त्र्यंबकेश्वर येथे इ. स. १८२५ त झाला. त्यांचे इग्रजी शिक्षण मुंबईस एलफिन्स्तन विद्यालयांत झाले. यांनीं 'कप्तान-कुकचा वृत्तांत,' 'तेलेमेकसचा वृत्तात,' 'साहित्यशास्त्र,' 'तीर्थयात्रा-प्रबंध' इत्यादि गद्यग्रंथ व 'शिवाजीचरित्र,' 'रघुवंशाचे मराठी भाषातर', 'सीमंतनीचे आख्यान,' 'गंगाचरित्र,' 'शिवस्तुति' इत्यादि पद्यग्रथ लिहिले. गद्यरचनेपेक्षा पद्यरचनेवरच ह्याचा विशेष कटाक्ष होता. "याची कविता प्रौढ, जागोजागी अलकृत व रमणीय आहे,' *

ह्याखेरीज या काळात 'प्रसन्नराघव' (इ. स. १८५९) 'रत्नावलि' (इ. स. १८६४) 'अभिज्ञानशाकुंतल' (इ. स. १८७०) व 'विक्रमोर्वशीय' (इ. स. १८७२) ह्या नाटकाची भाषातरे झाली. मासिक पुस्तकांतूनहि संस्कृत भाषेतील प्रसिद्ध नाटकाचीं भाषातरे छापिली जात होती. 'शाकुतल' व 'विक्रमोर्वशीय' या नाटकाचीं तर अनेकदां भाषांतरें केली गेली.

वर वर्णिल्याप्रमाणे सस्कृत भाषेतील उत्तमोत्तम नाटकाचीं मराठीत

**महादेवशास्त्री कोल्हटकर**

भाषांतरे होत होती. इंग्रजी नाटकाना बेमालूम मराठी पेहराव चढविणे हे त्यापेक्षा जास्त श्रमाचे व कौशल्याचे काम होते. महादेवशास्त्री कोल्हटकर यांनी

† **विष्णुशास्त्री चिपळूणकर**—निबंध—माला, 'भाषान्तर'

* **गणेश रंगनाथ दंडवते**—'संक्षिप्त अर्वाचीन मराठी वाङ्मय' (चरित्रखंड)—पृ. १०

शेक्स्पीअरच्या ‘ अथेल्लो ’ नाटकाचे मराठीत भाषांतर करून ह्या कठीण कामाला प्रथम हात घातला. परंतु “ त्यांची रसभरित लेखणी शेवटी एकवेळ सर्व ग्रंथावरून ” फिरण्यापूर्वीच त्यांना इहलोकीची यात्रा संपवावी लागली. ह्यामुळे त्याचे भाचे जनार्दन सखाराम गाडगीळ यांनी हें भाषांतर शुद्ध करून त्यात कमी असलेल्या दोन प्रवेशाचे भाषांतर घालून इ. स. १८६७ त प्रसिद्ध केलं. मुळातील नावें जशीच्या तशीं ठेवूनच हे भाषांतर केले आहे. त्या काळाच्या मानानें हा ग्रंथ फारच चांगला झाला आहे. कित्येक ठिकाणीं इंग्रजी भाषेच्या धर्तीवर शब्दप्रयोग व वाक्यरचना आढळते. पण त्यावेळची मराठी भाषेची स्थिति लक्षात घेता ह्या दोषाकडे दुर्लक्ष करणेच उचित आहे. निबंधमालाकारांना ह्या ग्रंथाबद्दल फार चांगले उद्‌गार काढले आहेत. “ शेक्सपीअरकृत ‘ अथेल्लो ’ या अत्यंत प्रसिद्ध नाटकाचे भाषांतर कैलासवासी महादेवशास्त्री कोल्हटकर यानी सुमारे दहाबारा वर्षांपूर्वी केले, तें एकंदरीत फार उत्कृष्ट साधले आहे, व ते इतकें मराठीत उतरेलसे आम्हांला वाटलेंही नव्हते ! पण याचें कारण अर्थात्‌च भाषांतर–कर्त्यांचा रंगेल स्वभाव हे एक; आणि दुसरे त्या नाटकाची निवड. ” * महादेवशास्त्र्याचे शिक्षण पुणे येथील पाठशाळेत झाले. त्यानंतर त्यांनी कँडी-साहेबाच्या हाताखालीं कांही वर्षे काम केलें. पुढे त्याना पुणे कॉलेजात मराठीचे प्राध्यापक नेमण्यात आले होते. मुंबई येथे इ. स. १८४८ त स्थापन झालेल्या ‘ उपयुक्त ज्ञानप्रसारक ’ सभेचे ते उपाध्यक्ष व चिटणीस होते. ह्या सभेच्या विद्यमाने त्यानी पदार्थविज्ञानशास्त्रांवर दिलेली सहा व्याख्याने ‘ ज्ञानप्रसारक ’ मासिकामध्ये क्रमशः प्रसिद्ध झालीं होतीं. ह्यांनी ‘ कॉलंबसाचा वृत्तांत ’ ( इ. स. १८४९ ), ‘पदार्थविज्ञानशास्त्र’ ( इ.स. १८६१)

* विष्णुशास्त्री चिपळूणकर– निबंधमाला–‘ भाषांतर ’

इत्यादि गद्यग्रंथ लिहिले. त्या काळच्या विद्वान लोकात त्याची प्रामुख्याने गणना होत होती. " त्याचे वक्तृत्व फारच सुरस असे. जसा नाग गारोड्याच्या पुंगीस भुलून त्याकडे सर्व तनमन लावून तल्लीन होतो याप्रमाणे याचे श्रोते भुलत असत. "† त्याच्या अथेल्लो नाटकांतील खालील उताऱ्यावरून त्याची सफाईदार भाषा लिहिण्याची शैली लक्षात येईल.

"**यागो**:—नशीब? बोडक्याचे नशीब. अहो असे असणे अथवा नसे असणे हे आपल्या हातचे आहे, आपण करू तसे होईल. आपली शरीरे या बागा आणि त्याचे बागवान आपण म्हणून या बागात आपण जे पेरू ते निजपेल. जर आपण कुइले लाविले किंवा कडु वृंदावने लाविली अथवा निवडुंग लावून मोगरे उपटून टाकिले अथवा एका जातीची फळफळावळ सर्वभर लावून बाग सजविला अथवा हे लाव ते लाव करून बागेची नासाडी करून टाकिली किंवा आळसाने बाग नापीक केला किंवा उद्योगाने बागेत चांगले खत पाणी घालून ती सुपीक होईल असे केले तर तसतसे फळ प्राप्त होईल. हे सर्व करण्याची शक्ती आपल्या इच्छेच्या स्वाधीन आहे. या जीविताच्या तराजूला एक विचाराचे आणि दुसरे विषयवासनेचे अशी दोन पारडी आहेत. जर विचाराचे पारडे नसते तर आपल्या विषयवासना आणि हलकट स्वभाव याच्या योगे आपण भलभलतीच कर्मे केली असती, परंतु आपणास विचारशक्ति आहे. तिच्या योगाने अंतःकरण क्षुब्ध होऊन जे उसाळ्या मारू लागते ते आपणास स्थिर करता येते. तशीच अनिवार जी विषयवासना उत्पन्न होत्ये ती कमी करिता येत्ये. आणि कामरूप सर्पाच्या दंशाने ज्या व्यथा

† नारायण विष्णु जोशी-पुणे शहरचें वर्णन पृ. ८०

होतात त्याचे निवारण करिता येते. तूं ज्या गोष्टीला प्रेमपाश म्हणून म्हणतोस ती गोष्ट देखील या वरील गोष्टीतीलच एक कलम आहे." †

काशिनाथ गोविंद नातू यानी इ. स. १८७२ त 'विजयसिंग' या नांवाने शेक्स्पीयरच्या 'ज्युलियस सीजर' नाटकाचे भाषांतर प्रसिद्ध केले. "आता हे पुस्तक इंग्रजी पुस्तकाचे शब्दशः भाषांतर आहे असे कोणी समजूं नये. आपल्या देशास लागूं नाहीत अशा कित्येक गोष्टीची स्वरूपे व नांवे बदलली आहेत. भाषा उघड करण्यासाठी कोठें कोठे आम्ही आपल्या पदरचे शब्द घातले आहेत." * असे भाषांतराचे स्वरूप प्रस्तावनेत प्रथम सांगून पुढे महाराष्ट्र व संस्कृत भाषेचे जे मर्मज्ञ आहेत त्याना आपली भाषापद्धति मान्य होईल असा विश्वास प्रगट केला आहे. ह्याखेरीज प्रस्तावनेत त्या काळातील नाटकाच्या घेडगुजरी भाषेवरहि कडक टीका केली आहे.

**काशिनाथ गोविंद नातू (इ. स. १८४०–९७)**

याच सुमारास वि. ज्ञा. विस्तारात 'रोम केतु विजया' या नावाने शेक्स्पीयरच्या 'रोमिओ आणि ज्युलिएट' ह्या नाटकाचे भाषांतर प्रसिद्ध होत होते.

मोरो विठ्ठल वाळवेकर यांनी 'नीलदर्पण' या नावाने एका बंगाली नाटकाच्या इंग्रजी तर्जुम्याचे मराठी भाषांतर केले. बंगालमधील असहाय व गरीब शेतकऱ्याना नीळ पिकविणाऱ्या युरोपियन लोकांच्या जुलमापासून मुक्त करण्यासाठी हें

**मोरो विठ्ठल वाळवेकर**

† अथेल्लो नाटक ( अं. १ प्र. ३ ) पृ. ४३–४४.

* प्रस्तावना–'विजयसिंग'

नाटक लिहिले गेले. "या नाटकात लोकस्थिति, जुलमाचा प्रकार, काहीं काहीं युरोपियन अधिकाऱ्यांचे एतद्देशीय प्रजेच्या हिताविषयीं दुर्लक्ष आणि नीळ पिकविण्याच्या जुलमाच्या प्रकारानें एका सुखी शेतकरी गृहस्थाच्या कुटुंबाचा नाश व दुःखकारक परिणाम इत्यादि गोष्टी उत्तम रीतीनें व मनावर ठसा उठण्यासारख्या प्रकारानें दाखविल्या आहेत."† अशा तऱ्हेचे उपयुक्त ग्रंथ लिहिण्याची महाराष्ट्रातील लेखकानाहि इच्छा व्हावी म्हणून वाळवेकर ह्यानी हें भाषांतर केलं. ते आपल्या प्रस्तावनेंत म्हणतात. "या ग्रंथाचें भाषांतर सादर करण्यात माझा मुख्य उद्देश लोकामध्ये हल्लीं जी नाटकें, कादंबऱ्या वगैरे ग्रंथ करण्याची इच्छा उत्पन्न झाली आहे, तिचा कल उपयुक्त व आपल्या लोकास दुःखमुक्त करण्याकडे वळावा आणि हल्लीं जीं अनेक प्रकारचीं दुःखे, लोकाचार, व्यापार व राज्यरीति या संबधानें होतात तीं निवारण करण्यास साह्यभूत होतील अशा प्रकारचे नाटक वगैरे ग्रंथ आपल्या महाराष्ट्र-भाषेत व्हावे असा आहे" या नाटकावर 'ज्ञानसंग्रह'* मासिकात प्रतिकूल टीका आलेली होती. ह्या नाटकाचें संविधानक मूळात चित्ताकर्षक नसूनहि त्याची रचना चांगली झाली आहे.

ह्याप्रमाणें संस्कृत, इंग्रजी व बंगाली भाषेतील नाटकाचीं मराठींत भाषांतरें झालीं. संस्कृत नाटकाचें मराठींत भाषांतर करणें सोपें, संस्कृतज्ञ पंडिताचीहि संख्या जास्त, यामुळे भाषांतरात्मक नाट्य-ग्रंथांत संस्कृत भाषेतील नाटकांचाच भरणा अधिक होता. ह्या भाषांतरकारानी पद्यसृष्टींत अमृताशींहि पैजा जिंकणाऱ्या मराठी भाषेतील रसप्रधान गद्यवाङ्मयाची उणीव अंशतः भरून काढली, आणि मराठी भाषेत मनुष्याच्या अंतःकरणातील अनेकविध भाव व्यक्त करण्यास समर्थ अशी अभिनव गद्यशैली निर्माण केली.

---

† प्रस्तावना—'नीलदर्पण.'

* ज्ञानसंग्रह, पु. १ अं. ८.

## स्वतंत्र नाटकें

### ऐतिहासिक व चरित्रात्मक

**विनायक जनार्दन कीर्तने**
**( इ. स १८४०-९१ )**

भाषांतरात्मक नाटके लिहिण्याला प्रारंभ झाल्यानंतर लवकरच मराठी भाषेतील पहिले स्वतंत्र नाटक लिहिण्याचा मान विनायक जनार्दन कीर्तने यांनी केवळ आपल्या वयाच्या विसाव्या वर्षीच मिळविला. एल्फिन्स्टन कॉलेजात शिकत असतानाच त्यांनी ' थोरले माधवराव पेशवे यांच्या कारकीर्दीचे वर्णन ' नाटकरूपाने लिहून मराठी ज्ञानप्रसारक सभेपुढे वाचिले, व आपल्या लेखन-चातुर्याने तत्कालीन विद्वानांची मने आकर्षण करून घेतली. " या लहानशा नाटकात नाटककाराने हास्य व करुणारस चांगले उतरून पुस्तक मनोरंजक केले आहे. " मराठी भाषेतील हे पहिले स्वतंत्र व ऐतिहासिक नाटक इ. स. १८६१ त प्रसिद्ध झाले. ह्यात मराठी नाट्यवाङ्मयाच्या भावी प्रगतीची पूर्वचिन्हे स्पष्टपणे दृष्टीस पडतात. अवघ्या साठ पृष्ठांच्या मर्यादित जागेत माधवरावांच्या कारकीर्दीतील अनेक प्रसंगांची माहिती कोंबल्यामुळे रसोत्पादन व स्वभाव-दिग्दर्शन यांना योग्य अवसर मिळणे शक्य नव्हते. तरीपण अगदी अल्प प्रमाणात का होईना या कलात्मक अंगाचा या नाटकात समावेश झालेला आहे. मराठी दरबाराचे वास्तविक स्वरूप दाखविण्याच्या उद्देशाने मराठे सरदारांच्या तोंडी कीर्तने यांनी अडाणी व कुणबाऊ भाषा घातली आहे. संवादात स्वाभाविकपणा असावा म्हणून प्रसंग व पात्रें यांना अनुसरून भाषेची योजना करण्याचा प्रयत्न केला आहे. माधवराव व रमाबाई यांच्या प्रवेशात दिसून येणारे प्रेमळ जोडप्याचें चित्र मनोरम आहे. रामशास्त्री व माधवराव यांच्या भेटीचे प्रसंग स्वतंत्रपणे कितीहि चांगले वठले असले तरी ते मूळ कथानकाला धरून नसल्यामुळे

अनावश्यक आहेत असा कृष्णशास्त्री चिपळूणकरांनी ‘ शालापत्रक ’ मासिकांत आपला अभिप्राय* दिलेला आहे. लौकिक विषयांवर व तेही दुःखपरिणामी नाटक लिहिण्याचा उपक्रमहि त्या काळी अपूर्वच होता. विनायकराव याचा जन्म इ. स. १८४० त झाला. त्याचे प्राथमिक शिक्षण कोल्हापूर येथे झाले. हे सन १८५६ त मुबईस शिकावयास आले व इ. स. १८५९ त प्रवेश परीक्षेत यशस्वी झाले. त्यानी ज्ञानप्रसारक सभेपुढे वाचलेले ‘ वाचन ’ व ‘ हिंदुस्थानातील प्राचीन विद्या ’ हे निबंध ‘ ज्ञानप्रसारक ’ मासिकात प्रसिद्ध झाले होते. त्यानी इ. स. १८६१ त थोरले माधवराव व इ. स. १८६५ त ‘ जयपाळ ’ ही दोन नाटके लिहिली, आणि इ. स. १८७१ त मालकमच्या ‘ Central India ’ चे भाषातर ( मध्य हिंदुस्थानचा इतिहास ) प्रसिद्ध केले. हे सामान्य शिक्षकाच्या जागेपासून बडोदा व इंदूर यासारख्या मोठ्या सस्थानांतील दिवाणाच्या हुद्यापर्यंत पोहोचले. इ. स. १८९१ त याचा अंत झाला. विनायकरावासारख्या रसिक व विद्वान माणसाच्या हातून महाराष्ट्र भाषेची अधिक सेवा व्हावयास पाहिजे होती. त्यांच्या ‘ थोरले माधवराव पेशवे ’ या नाटकांतील खालील उताऱ्यावरून मराठी भाषेतील पहिल्या स्वतंत्र नाटकाचे स्वरूप लक्षांत येईल.

शनवारवाडा माधवराव व रामशास्त्री

**माधवराव**:—या शास्त्रीबावा ठीक आगमन झाले; आपली स्वारी प्रातःकाळी आली होती परंतु जप करीत बसलो होतो त्यामुळे गांठ पडली नाही. ब्राह्मण–कुलात जन्म घेतला आहे त्याअर्थी त्याप्रमाणे काहीं केले पाहिजे. जन्मास आल्याचे काही तरी सार्थक नको ?

---

* शालापत्रक पु. ५ अं. १.

**शास्त्रीबावा**ः—तसेच आम्हासही सार्थक केलें पाहिजे. योगसाधनाचे मार्ग फार उत्तम आहेत. सर्व त्रिभुवनव्यापक आनंदरूपी, असाही असता अहंकारमोहादि शत्रूकरून बद्ध झाला जो परमात्मा त्याच्या मुक्तीची इच्छा आपल्या ठायीं झाली आहे. येणेंकरून जीवात्म्याचे कल्याण होईल. मीही त्याच क्रमाचे अवलंबन करणार; परंतु तसें करण्यास हीं ऐहिक सुखें उपयोगी नाहींत. सर्व संगाचा परित्याग करून सुक्षेत्रीं सावधान चित्तानें अधिष्ठित झालें पाहिजे. अतएव काशी क्षेत्रीं जावयाची योजना करून आपली आज्ञा घ्यावयास आलों आहे. आपलीही तशीच इच्छा आहे म्हणून दुसरी विनंती करितों कीं आपणही प्रस्थान ठेऊन मजबरोबर येण्याचें करावें. काशी म्हणजे केवळ प्रतिकैलास आहे. तेथें जान्हवीच्या पवित्र उदकाचें त्रिकाल स्नान करून जपजाप्य, योगमार्ग व भगवंताच्या मंगल नामाचें स्तवन हेंच करण्यांत कालक्षेप करूं.

**माधव**ः—आपला भाव माझ्या लक्षांत पुरा आला नाहीं. परंतु साधारण असें वाटतें कीं जपजाप्य करीत बसलों होतों त्यावर आपला रोख आहे.

**शास्त्री**ः—माझ्या बोलण्यातील भाव इतकाच कीं, आत्मस्वरूप ओळखण्याची आपणास इच्छा झाली आहे. ही फार चांगली. याजकरितां आपण मजबरोबर काशीस चलावें. मी आपणाकडून योगमार्गाचें अध्ययन करवीन.

**माधवराव**ः—आतां तर उमजलोंच. मी पूर्वी बोललों तेंच. शास्त्रीबावा आपण योग्य पुरुष आहां. आपली निस्पृहता पाहून माझें पूर्ण समाधान झालें. आतां आपलें वास्तविक म्हणणें कळवा.

**रामशास्त्रीः**—श्रीमंताचा—

**माधवरावः**—मघांची थट्टा नको. खरें तें सांगा, मी उपदेशास पात्र आहे.

**रामशास्त्रीः**—(हंसून) श्रीमंताची थट्टा करण्याची योग्यता माझी नाहीं. आपण जप करीत मध्यान्हकाल होइतोंपर्यंत जर बसलां तर प्रजेचे संरक्षण कसें होईल? मुख्यानी कारभार पाहणे सोडिले म्हणजे हाताखालील कामगार अर्थातच आळशी होतात. असें झाले म्हणजे गरीबगुरीबांची दाद कशाने लागते? आपण जप करीत दोन प्रहरपावेतो बसणार असें जेव्हां ऐकिले तेव्हां तो जप सर्व अनिष्टाचें मूळसा मला भासला. आता आपला मुख्य धर्म प्रजा-प्रतिपालन हाच होय. तें जर सशास्त्र झालें तर त्यांतच आपणांस मुक्ति आहे. आपण त्याचें संकटापासून रक्षण करावे आणि त्यानीं आपणासाठीं परमेश्वरापाशीं वर मागावे असा परस्पर-संबंध ज्या राज्यांत राहतो, त्या राज्यास वैकुंठाचीच उपमा योग्य. यास अनेक शास्त्राधार आहेत. केवळ माझेच म्हणणें असा अर्थ नाहीं.

**माधव०ः**—मला शास्त्राधार आपणापुढें नकोत. आपणच जागृत शास्त्रावतार आहां. शास्त्रीबावा आज मला आपण मोठ्या संकटातून बाहेर काढिले. नाहीं तर लोकाना थोड्याच दिवसांत माझा कंटाळा आला असता. कारभारी निस्पृही पाहिजेत ते येवढ्याकरिता.

**रामशास्त्रीः**—माझ्या बोलण्याचा श्रीमंतास क्रोध आला नाहीं यावरूनच लोक आपल्या स्वभावाची तारीफ करितील. आतां मला आज्ञा असावी.

८

**माधवः**—उत्तम. मला आणखी कांही गोष्टी विचारावयाच्या आहेत. परंतु आता अवकाश दिसत नाही. दुसरी एकादी संधी लवकरच येवो.

**रामशास्त्रीः**—मी आपला सेवक आहे. दर्शनास दररोज येतच असतो......"‡

**झांशीचे राणीचें नाटक**

इ. स. १८७० त 'नुतनेतिहासांतर्गत मनोल्हादक झांशयख्य पुराधीश्वरी लक्ष्मीबाई इचे नाटक' विश्वनाथ मोरेश्वरशास्त्री नाशिककर, नारायण गोपाळ दामले व विनायक हरी शिनकर या तिघांनीं मिळून रचिलें. हे नाटक चेबर्सकृत 'इंडियन रिव्होल्टस्' नामें इतिहासाच्या आधाराने लिहिले आहे. ह्यांत संस्कृत, हिंदुस्थानी, गुजराथी इत्यादि सर्व भाषांचा उपयोग केला आहे. नाटकाची भाषा शुद्ध व सुबोध आहे. त्यांतील एक उतारा खाली उध्दृत करीत आहे.

"( **स्थळ**– ग्वालेरचा आसमंतात भाग )

पात्रे

| | |
|---|---|
| झांशीची राणी<br>तात्या टोपी<br>रावसाहेब<br>रामराव–गोविंद शिंद्याकडील माजी नौकर<br>भेडाचा नबाब<br>लक्षुमण नाना<br>वकील—...... शिंद्याकडील | } बंडवाले. |

‡ थोरले माधवराव पेशवे यांजवर नाटक ( अं. ३ प्र. ५) पृ. २६–२८

**राव०**:—कां तात्या, आपला मनुष्य आला परंतु सर्व व्यर्थ आहे. अनुकूलता दिसत नाहीं. काय काल विपरीत पाहा.

**तात्या०**:—कांहीं चिंता नाहीं. ईश्वराला सर्वांची काळजी आहे. आपल्या जवळ आठदहा हजार फौज आहे, दहा बारा तोफा आहेत, तशा त्याचेजवळ असतील; आणखी काय. बनल्यास लढाई करावयाची. पुन्हा मदत द्या असे आतां वचन निघून कीर्ती होईल ती न होता मेलो तरी बेहेत्तर.

**राणी०**:—होय तर काय, आपल्याला शरण-मुद्रेने जाणेंच नाहीं; पर जाती अन्यधार्मीक लोकाच्या हातून मरण्यापेक्षा स्वजाती हिंदुधर्मपालक लोकाच्या हातून मरणे काय वाईट आहे ?

**रामरा०**:—सरकार कोणी शिंद्याकडील वर्तमान घेऊन आल्याचे चोपदार घडोघडीं सुचवीत आहे.

**राव०**:—येऊं द्या इकडे, आंत पाठवून द्या.

**तात्या०**:—( उभा राहून ) या बसा; कशी काय तजवीज झाली !

**वकील०**:—तजवीज काय; पाहिजे तेव्हा होईल असे देखील म्हणावयास नको. आपल्या आश्रयानें कमती काय आहे ? म्हणाल त्यावेळेस तयारी आहे. परंतु सरकारचे मनात आपला हेतू काय आहे तो समजून घेण्याविषयी फार उत्कंठा आहे. म्हणजे तशीच तजवीज ठेविता येईल.

**तात्या०**:—त्यांना सर्व गोष्टीची माहिती आहे. आता नवीन समजून घेण्याची व नंतर तजवीज करण्याची वेळ नाही. प्रसंग जाणून व पूर्व स्मरून लिहिल्याप्रमाणें होत असल्यास ठीक आहे, नाहीं तर ईश्वर समर्थ आहे.

**राणी०**— नाहीं तर काय ? न कर्त्याचा वार शनवार. आह्माला देखील मतलब समजतो

**वकील०**— ( चोहींकडे नजर फिरवल्यावर ) पाहिजे तसें म्हणा. ते आहेत, तुम्ही आहांत; आम्हाला नोकरी करणें जरूर आहे. आपला हुकूम होईल त्याप्रमाणें कळवितो.

**तात्या०**— सांगितले हेंच, जा आता लवकर.

**वकील०**— नमस्कार ( बाहेर निघून जातो. )

**राव०**—कांहीं अर्थ नाहीं. आपली तजवीज बराबर ठेवा.

**तात्या०**—अहो, त्याना आपलेकडून आमचा दम पहावयाचा यत्न केला; परंतु मी हीं वस्तातगिरी केली आहे. आपला मतलब आहे तो खरा. प्रसंगावर काय मौज होईल ती पाहा.

**राणी०**—रावसाहेब, तात्यानीं बहुतेक जमीन पोखरून ठेविली आहे. पत्र पाठविले हें काय निमित्य टाळिलें; नाहीतर स्वजातीचा दोष येता. मी तर तयारी केली आहे.

**तात्या०**—अहो तयारी कराच, उठा; मला कांहीं चिन्ह बरें दिसत नाहीं. आपण विश्वासावर राहिलो आणि त्यांची अकस्मात् तयारी झाली म्हणजे घात होईल. "†

**अफझलखानाच्या मृत्यूचें नाटक**

इ. स. १८७१ त कोंडो सखाराम वाटे यानीं 'अफझलखानाच्या मृत्यूचे नाटक' लिहिलें. "देश भरभटीस येण्यास व देशबांधवांस सुखानुभव मिळण्यास कारण जो स्वदेशाभिमान त्याचा फैलाव होणे एकीकडे राहून त्याच्या उलट तो सर्वत्रांच्या अंतःकरणांतून नष्ट झाला असें

† झांशीचे राणीचें नाटक ( प्र. १२ ) पृ. ६५–६७.

म्हटले तरी चालेल. याविषयीं पुष्कळ उदाहरणें प्रसंगवशात् पाहाण्यांत येतात. आपले पूर्वज देशाच्या कल्याणाकरितां कसे झटत होते व तो त्यांचा हेतु सिद्धीस जाण्यास अश्रांत श्रम करून त्यांनीं काय काय त्रास सोसले, आणि आपल्या आयुष्याचा कसा सद्व्यय केला या गोष्टीचा विचार प्रत्येकाच्या अंतःकरणात सार्वकाल असणे जरूर आहे. " असे ग्रंथकर्त्यांनी प्रस्तावनेत म्हटले आहे. नाटकांत यवनांच्या तोंडी उर्दू भाषा घातली आहे. हे नाटक मुख्यतः ग्रांटडफच्या इतिहासावरून रचले आहे. वि. ज्ञा. विस्तारात † ह्या नाटकावर अभिप्राय आलेला होता. त्यात लेखकानीं परकीय इतिहासकारावर विश्वसून न राहता शिवाजी महाराजाचे खरे स्वरूप प्रगट करण्याकडे लक्ष्य द्यावे अशी सूचना केली होती.

याखेरीज त्या काळांत 'नारायणराव पेशवे यांचे नाटक' ( इ. स. १८७० ) व 'सवाई माधवरावांचे नाटक' ( इ. स. १८७१ ) हे ऐतिहासिक नाट्यग्रंथहि प्रसिद्ध झाले.

**बळवंत पांडुरंग किर्लोस्कर (१८४३–८५)**

ह्याच काळात एक चरित्रात्मक नाटकहि प्रसिद्ध झाले, बौद्धधर्माची प्रचंड लाट परतवून हिंदुधर्माचे संरक्षण करणाऱ्या दिग्विजयी वीराच्या वास्तविक चरित्राची सामान्य जनांना ओळख व्हावी म्हणून बळवंत पांडुरंग किर्लोस्कर यांनीं श्रीसदानंदस्वामीकृत 'शंकरविजय' नामक संस्कृत ग्रंथावरून इ. स. १८७४ त 'शांकरदिग्जय' नाटक लिहिले. वि. ज्ञा. विस्तारांत ‡ या नाटकांवर विस्तृत अभिप्राय आलेला असून त्यांत

† वि. ज्ञा. वि. पु. ४

‡ वि. ज्ञा. वि. पु. ६–७.

शंकराचार्यांचें चरित्र हे शांतरसानें युक्त असल्यामुळें नाटकाचा विषय होण्यास योग्य नाहीं असे मत प्रदर्शित केलें आहे. किर्लोस्करांचीं शाकुंतल—सौभद्रादि संगीत नाटकें सर्वांच्या परिचयाचीं आहेतच. त्याबाबत जास्त विवेचन करण्याचे कांहीं प्रयोजन नाहीं.

## पौराणिक व तत्वज्ञानविषयक नाटकें.

ह्या काळांतील नाट्यवाङ्मयांत पौराणिक नाटकांची संख्या अधिक आहे. पुराण-ग्रथांतून विविधरसपूर्ण अद्‌भुतरम्य कथानकें आयतींच तयार मिळत असल्यामुळें पौराणिक आख्यानांवर नाटयरचना करण्याकडे सामान्य लेखकाची प्रवृत्ति होणें स्वाभाविक आहे. शिवाय धर्मप्रधान हिंदुसमाजात अशा नाटकांनाच भरपूर लोकाश्रय मिळण्याचा हमखास संभव असल्यामुळें रंगभूमीवरहि पौराणिक नाटकांचच स्तोम माजलें असलें तर त्यांत कांहीं नवल नाहीं. ह्यातालि बहुतेक नाटकें अगदीं सामान्य प्रतीचीं आहेत. कल्पकता, रचनाकौशल्य व भाषासौन्दर्य या गुणाचा त्यात लवलेशहि नाहीं. कथानकाची रचना दशावताराच्या खेळांच्या ठराविक पद्धतीवर केलेली असे. संस्कृत शब्दांची प्रमाणाबाहेर योजना केल्यामुळें भाषेत कमालीचा कृत्रिमपणा येई. विदूषकाच्या भाषणांत तर अनुप्रास, श्लेष व शाब्दिक कोटया यांची रेलचेल असे. "विरस करून चुरस लावण्याचे काम माझे नाहीं. मजकडून सुरस साधण्यास यथाशक्ति साह्य मिळेल अशी मात्र नाटकाचार्यांनीं आशा करावी" † अशा तऱ्हेची वाक्यें ह्या नाटकांतून मुबलक आढळतात.

---

† गोपीचंद नाटक-पृ. ४

आरंभी ' महाराष्ट्रजन-प्रबोध-कविताप्रसारक मंडळी'ने गणेशप्रतापाचे

**विनायक महादेवशास्त्री नातु**

कर्ते विनायक महादेवशास्त्री नातु यांजकडून ' नलराजाचें नाटक ' लिहवून इ.स. १८६२ त प्रसिद्ध केलें. हें नाटक एल्फिन्स्तन विद्यालयांतील संस्कृतभाषेचे शिक्षक वेदशास्त्रसंपन्न यज्ञेश्वर चिमगाजी शास्त्री यांनी शुद्ध केलं आहे. नाटकाचा उद्देश प्रकाशकांनी प्रस्तावनेंतच नमूद केला आहे. प्राचीन काळीं आपल्या समाजांत रूढ असलेली प्रौढ–विवाहाची व स्वयंवराची चाल किती इष्ट व हितकारक होती; द्यूताच्या नादाने कसकसे अनर्थ ओढवतात व संसारांत सुखदुःखाच्या दोन्हीहि प्रसंगीं पतीची केवळ होऊन छाया राहणाऱ्या पतिव्रतेची थोरवी किती अवर्णनीय आहे ह्या गोष्टी लोकांना समजाव्या म्हणून नाटका-साठी नलराजाचे चारित्र निवडलें आहे. यानतर विनायकशास्त्री यांनीं शिवलीलामृताच्या चवदाव्या अध्यायांतील कथेच्या आधारानें 'श्रीभिल्लिणी' नाटक लिहिले. या नाटकात शिवतपोवनप्रवेश, शिवतपोवनत्याग व शिव-गृहप्रवेश असे तीन अंक असून त्यांत पतिव्रतेचा प्रभाव दाखविला आहे. हें नाटक ' महाराष्ट्रकाव्य–प्रसारणेच्छु मंडळी ' ने इ. स. १८६५ त प्रसिद्ध केले.

इ. स. १८६५ त विनायक जनार्दन कीर्तने यांचें ' जयपाळ ' नाटक

**जयपाळ**

प्रसिद्ध झाले. जुन्या करारांमधील ' Genesis ' या पर्वाच्या ३७, ३९, ४०, ४३ या अध्या-यांतील ' जोसेफ' च्या गोष्टीवरून या नाटकाचें कथानक घेतलें आहे. कीर्त-न्यांच्या पहिल्या नाटकाप्रमाणेंच हें नाटकहि चांगलं आहे. ' शालापत्रक ' मासिकांत या नाटकाचें संक्षिप्त परीक्षण प्रसिद्ध झाले होतें. त्यांत आपल्या पुराणांतून सुरस व चमत्कारिक गोष्टींची बिलकूल कमतरता नसतांना लेख-

कांनी परधर्मीयांच्या पुराण-ग्रंथाकडे धाव घेतली याबद्दल आश्चर्य प्रगट केलें आहे. तरीपण नाटककाराच्या लेखनचातुर्याबद्दल तारीफच केली आहे. " याप्रकारें विचार करून जयपाळ नाटक प्राचीन कवींच्या नाटकाशीं लावून पाहतां, संविधानकाच्या संबधाने किंवा रसपरिपाकाच्यासंबंधाने त्या नाटकाशीं बरोबरी यास कोणत्याही प्रकारें नाहीं खरी; तथापि स्वतंत्रपणे त्याचा विचार केला असतां विनायकराव याचा हा ग्रंथ उत्तम ग्रंथांत गणला पाहिजे. हल्ली जीं नाटकें व कादबऱ्या उत्पन्न होतात व छापल्या जातात त्यांशीं ' जयपाळ ' लावून पाहिला असतां या नाटकांत व त्या ग्रंथात सूर्य व काजवा याच्या मधल्याप्रमाणे तफावत आहे. एकंदरीत पाहता कीर्तने याची खुबीदार व रसिक भाषा लिहिण्याची शैली व त्या त्या पात्राच्या भिन्न स्वभावाचे हुबेहुब वर्णन करण्याचे सामर्थ्य, व त्या त्या प्रसगास योग्य मनोविकार दर्शविण्याची खुबी वगैरे नाटककर्त्याच्या अंगी जे गुण अवश्य असावे लागतात ते कीर्तने यांच्या अगीं नांवाजण्यासारखे आहेत असे सर्वांस कबूल केले पाहिजे. " † तत्कालीन नाटयवाङ्मयांतील कीर्तन्याची कामगिरी फार महत्वाची आहे. त्याचीं दोन्हींहि नाटके स्वतंत्र व सरस असून नावीन्यपूर्ण आहेत.

रघुनाथशास्त्री अभ्यंकर यानी ' विराटपर्व ' ( इ. स. १८६७ ) व ' हरिश्चंद्रसत्वदर्शन ' ( इ. स. १८६९ ) हीं दोन नाटकें लिहिलीं.

**रावजी बाळकृष्ण लेले**

रावजी बाळकृष्ण लेले यांनीं ' श्रियाळचांगुणा-सत्त्वदर्शन '( इ. स. १८६९ ), ' गोपीचंद ' नाटक ( इ. स. १८७० ), ' सुलोचना सती' नाटक ( इ. स. १८७० ), ' रावणवध ' ( इ. स. १८७१ ) इत्यादि नाटके प्रसिद्ध

† शालापत्रक पु. ४ अं. १२

केली. हे विद्याखात्यांत नोकरीस होते. त्यांची शिकविण्याची शैली अप्रतिम होती.

**बजाबा बाळाजी नेने**

इ. स. १८७२ त बजाबा बाळाजी नेने यांनीं ' सैरंध्री ' या नांवाचे एक स्वकपोलकल्पित द्वादशांकी नाटक ' रचिले. या नाटकांतील बारा अंकांत गर्भित असलेली बारा सारतत्त्वे प्रस्तावनेत सांगितलीं आहेत. गद्य-रचनेत अनुप्रासांची योजना करण्याचा हव्यासहि या नाटकांत दिसून येतो. खालील उताऱ्यावरून या नाटकाची भाषाशैली किती बोजड आहे ते समजून येईल.

" सूत्रः- ( सभेस ) सज्जन विद्वज्जनहो द्वापर युगाच्या ठायीं मत्स्यपुरांत वर्तलेला वृत्तांत श्रीव्यासाने हव्यासानें काव्यरसानेक -गुणांहीं भारतात आपल्या अस्खलित रसभरित संस्कृत-वार्णाने वाणला आहे; तो कोणता म्हणाल तर भरतकुलालंकारिष्णु विष्णु-भक्त्यासक्त पंडुनंदन नंदनवनसदृश द्वैतवन त्याहून क्षिति-युवतींत पतिव्रताशिरोमणी अशी जी आपली पट्टराणी याज्ञसेनी तिशीं सहवर्तमान अज्ञातवास अनायासे करून जावा म्हणून विराट नगरांत वर्तला तो. ते नयनिपुण पंडुतनय दुस्तर परसेवाधर्माचे नचि कर्म करून महाविवेकेकरून स्वविपत्समयाचा व्यय करीत असता संतास तापद असंतांस तोषजनक अशी जी कथा वर्तली ती तुम्हांस यथाशक्ति नाटककृतीने प्रत्यक्ष दाखवावी हा उद्देश धरून स्ववेष पालटून आज मी अकस्मात् नाटकांतर्भागीं कसा प्रवेश करितो ते लक्षात आणा आणि तुम्हीही आपलीं संकल्पे करून अंतःकरणे फिरवून आपण विराटनगरात बसलो आहों असें कल्पा आणि अखिल-खल-मंडल-मंडनभूत अति कुमति मात्स्य-सेनापती द्रौपदी-सतीचा अभिलाष धरून भीमकर-मक-

राच्या वक्त्रांत पडून आपल्या जीवितास मुकणार ते चित्र-चरित्र प्रत्यक्ष नेत्रांनी पहा." †

ह्याखेरीज 'गौरीहरविनोद नाटक' (इ. स. १८७१), 'मदनप्रताप नाटक, (इ. स. १८७४), 'रासक्रीडा नाटक' (इ.स. १८७४) इत्यादि पौराणिक नाटकें त्या काळांत प्रसिद्ध झाली.

**रामकृष्ण हरि भागवत**

रामकृष्ण हरि भागवत यांनीं इ. स. १८६८ त 'सायुज्यसदन' या नावांचे तत्त्वज्ञान विषयक नाटक लिहिले. या नाटकाचा उद्देश वेदांत–मत वाचकांच्या मनावर सुलभ रीतीने ठसावे असा आहे. "या ग्रंथाची रचना गद्यपद्यात्मक असून स्थावरजंगम जगदाभास हाच जो सर्वेश्वराचा खेळ, तो या ग्रंथांत समजण्याजोगता, कानास मधूर, आणि मनास वेधक असा वर्णन केला आहे. यात करूणरस आणि शृंगाररस प्रधान असून वीररस हा अंगभूत आहे." * भाषा बेडौल व क्लिष्ट आहे. कामाजीनाईक व त्याची बहीण मायाऊ यांच्या खालील वर्णनावरून नाटकांतील भाषासरणीची कल्पना येईल—

"जो सकलभुवनैकसुंदर, जो बोधादि अमित्रांला आजिंक्य, जो केली-वनात नृपाळास, जसा, कंजपुष्पांत भ्रमर गुंततो, तसा गुंतवून ठेवणारा; जो दमादिकांच्या चिथावणीवरून प्रभूने निजनयनोद्भव अनलाने दहन केला असून अदह्य, असा हा कामाजीनाईक संपूर्ण जगताला कारणभूता आणि राजाची अत्यंत प्रियपरिचारा अशी जी आपली भगिनी मायाऊ तिजसहवर्तमान

† सैरंध्री पृ. ८–९.

* शालापत्रक पु. ८ अं. ३

येत आहे; तर सर्व भवारण्यवासी जन हो, त्यांच्या सन्मानार्थ मंगलोत्सव करा. " †

## सामाजिक नाटकें

**व्यवहारोपयोगी नाटक**

मराठी भाषेंतील पहिलें सामाजिक नाटक म्हणून गोविंद नारायण माडगांवकर यांनीं लिहिलेल्या 'व्यवहारोपयोगी नाटक' या छोटेखानी पुस्तकाचा उल्लेख करणे जरूर आहे. हें प्रथमतः मराठी 'ज्ञानप्रसारक मासिकात छापलं गेलं व पुढें इ. स. १८५९ त प्रसिद्ध झालं. ह्या एकांकी नाटकांत सहा प्रवेश असून त्यात ग्रंथकारानी लहानपणी लग्न करण्यास व लग्नांत बडेजावीनें वावगे खर्च करण्यास आपले लोक किती उत्सुक असतात व तें साधून घेतांना कसे तापत्रयात पडतात हें दाखविलें आहे.

**तत्कालीन सामाजिक चळवळी**

एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धात महाराष्ट्रात स्त्रीशिक्षण, विधवाविवाह, परदेशगमन इत्यादि सामाजिक प्रश्नांच्या बाबतींत रण माजलें होतें. विष्णु शास्त्री पंडितासारख्या कट्टर समाजसुधारकाने लेख, व्याख्यानें व वादविवाद याच्या द्वारें पुनर्विवाहाच्या प्रश्नाला चालना देऊन समाजांतील अनिष्ट रूढींचें उच्चाटन करण्याचा चंग बांधला होता, सनातनी व सुधारक या दोन्ही पक्षाकडून खंडनमंडनादि प्रकार जोरांत चालू होते. शास्त्रार्थांचा कीस काढून प्रत्येक पक्ष आपआपल्या मताचें समर्थन करीत होता. ह्या सामाजिक चळवळीचे प्रतिध्वनि तत्कालीन वाङ्मयातून उठणं अपरिहार्यच होतं. मनोरमा व स्वैरसकेशा या दोन्हीहि नाटकांत त्या काळच्या परिस्थितीचें चित्र हुबेहुब रेखाटण्याचा प्रयत्न केला आहे.

---

† सायुज्यसदन (अं. ४) पृ. १६२

मनोरमा

'मनोरमा' हे नाटक डेक्कन कॉलेजातील एक विद्यार्थी महादेव बाळकृष्ण चितळे यांनीं इ. स. १८७१ त प्रसिद्ध केलें. "सुनाना सासवांचा जाच, लग्न कार्यातले विहिणींचे रुसवाफुगवीचे प्रकार; वृद्धाशीं तरुण मुलींचीं लग्ने, गतभर्तृकेचें वाईट मार्गांत पाऊल पडलें असतां घडलेले दुष्परिणाम, विद्यार्जनाकरिता परदेशगमन, इत्यादि सामाजिक चर्चेतले विषय या नाटकांत कर्त्यांने गोवले आहेत." *

या नाटकांतील भाषा पुष्कळ ठिकाणी अश्लील आहे म्हणून त्यावर वि. ज्ञा. विस्तारात खरमरीत टीका † आली होती. सदर नाटकांतील बीभत्सरसाच्या निंद्य प्रकाराबद्दल तीव्र नापसंती व्यक्त करूनहि निबंधमालाकारांनीं 'काही संविधानकाचें चातुर्य व विशेषतः भाषणाचा चटकदारपणा' ह्या गुणांमुळें या नाटकास मराठी भाषेतील उत्कृष्ट नाटकाच्या पंक्तीस बसविले आहे. 'नावल व नाटक' या निबधांत का. बा. मराठे यानीं ह्या नाटकावर खालील अभिप्राय दिला आहे. "आलीकडे झालेल्या मनोरमा नाटकांत कुशी, गंगू, ठकू, गोदी अशा चार मुली व आणखीही कांही मुली आहेत. त्यांत कुशीचे मनोरमा नाव ठेवून तिला मुख्य नायिका केली आहे. परतु दुसऱ्या तीन मुलींचेंही वृत्त अव्वलपासून अखेरपावेतो ओढीत नेले आहे, व जागोजाग त्यांचे इतके वर्णन केले आहे कीं, नाटकात मुख्य नायिका कोण, व उद्देश काय, हे शेवटचे दोन प्रवेश वाचीतोंपर्यंत लक्ष्यांत येत नाही. पुनर्विवाह अवश्य आहे असे दाखविणें होते तर, मुख्य पात्रावरचा

---

* शंकर बापूजी मुजूमदार—महाराष्ट्रीय नाटककार पृ० १४१.

† वि. ज्ञा. वि- पु- ३ अं १०

तो प्रसंग फार चमत्कारिक रीतीने टाळला आहे. मुख्य पात्रावर तो प्रसंग आणून पुनर्विवाह करविला असतां तर उद्देश विशेष सफळ झाला असता. व्यभिचारी स्त्रियांना पुनर्विवाह पाहिजे असें दाखविण्यांत फारसे पुनर्विवाह-शास्त्राचें महत्त्व राहत नाहीं." † या नाटकांतील अश्लीलतेवर अनेक वर्तमानपत्रांतून टीका आली होती. त्याबाबत नाटककारांनीं पुढील प्रमाणें आपले मत प्रगट केले आहे "सभ्य लोकांच्या स्त्रिया लग्नकार्यात पाचशे बायकांत जी भाषा बोलतात ती जर प्रौढ नव्हे तर प्रौढ भाषाच नाहीं असें म्हटलें पाहिजे. असो. अश्लीलपणाचा दोष वगळला तर स्वतंत्र सामाजिक नाटक या दृष्टीने ह्या पुस्तकाची त्या काळांतील उत्तम प्रथात गणना करणें भाग आहे. या नाटकातील एक उतारा खालीं देत आहे.

स्थळः—**मनोरमेचा रंगमहाल.**

( खिन्नवदन झालेली अशी मनोरमा येते.)

**मनोः**—( आपल्याशीं ) हा ! हा ! काय तरि महालाची शोभा दिसती आहे ! जिकडे पहावं तिकडे उदास दिसतं ! एकावाचून सर्व शोभा व्यर्थ आहे ! उत्तम शृंगारलेला वारू असून जसा त्यावर स्वार नसला म्हणजे त्या घोड्याची सर्व कांति फिक्की पडते त्याप्रमाणं ह्या महालाची दशा झाली आहे ! हाच महाल, हीच मी, हाच राघू व हीच मैना; पण त्यांच्या बोलण्या पासून बरोबर बसलं असता, जो विलक्षण आनंद होई तो आता होत नाहीं, तर उलटा त्यांचा शब्द ऐकून हृदयात बाण मारल्याप्रमाणं वेदना होतात ! ह्याच खिडकांतून खाली बागेंत पाहिलं म्हणजे इंद्रपुरांत असल्यासारखं वाटे; परंतु आतां तीच खिडकी यमपुरीच्या दरवाज्याची दिंडी आहे अशी वाटते ! ह्याच महा-

† नावल व नाटक ह्याविषयीं निबंध पृ. ३३

लात शुभ्र चादणं पडलं म्हणजे एकमेकांच्या मुखाची शोभा पहात बसलों असता स्वर्गलोकींचं सुख होई. आतां कांही जरी येथे पाहिलं तरी उलट दुःखद होतं! काय चमत्कार आहे पहा! मनाला तर कशानंच आल्हाद होत नाही. आकाशांत अभ्रं येऊन विजा कडकडतात आणि त्यावेळेस जसं सर्व उदास दिसतं तसं या महालात आल्ये म्हणजे दिसूं लागतं. अन्न खाल्लेलं अंगी लागत नाही. गोड तर काहीच वाटत नाही. काळजीने जीव एकसारखा हुरहुर करतो. सर्व चित्त तिकडे लागलं आहे. ध्यानीं तेच मनीं तेच. शरीर मात्र येथे राहिलं आहे. मन तर एकसारखं तिकडे आहे. डोळ्यापुढं सदोदित मूर्ती दिसते. कधीं तरी गाठ पडणार कोण जाणे! देवा ह्या दुःखासारखं दुःख कोणचंच नाही. सर्व दुःख पतकरतं पण हे एक विरहदुःख नको! †

**प्रबोधविद्युत् अथवा स्वैरसकेशा नाटक**

ह्याच वर्षी रघुनाथ शंकरशास्त्री अभ्यंकरयानी 'प्रबोध–विद्युत् अथवा स्वैरसकेशा' (इ. स. १८७१) ही नाटिका लिहून प्रसिद्ध केली. बालावृद्धविवाहाचे परिणाम किती घोर होतात व लहानपणीच वैधव्य प्राप्त झाल्यामुळे आपले शील शाबूत ठेवताना गतभर्तृकांची किती करुणास्पद स्थिति होते तें निर्भीडपणे दाखविण्याचा या नाटकांत प्रयत्न केला आहे. परंतु त्याबरोबरच या नाटकांत "हलकटपणाचा व दुष्टवर्तनाचा कडेलोट केला आहे. नीच, कपटी, व्यभिचारी लोकाची एक मालिकाच लाविली आहे."‡ त्यामुळेच की काय एक वर्षाच्या अवधीत या नाटकाच्या दोन आवृत्त्या निघाल्या.

† मनोरमा नाटक (अं. ४ प्र. ४) पृ. १५५–५६

‡ नावल व नाटक ह्यांविषयीं निबंध पृ. ३५

## कल्पनारम्य नाटकें

इ. स. १८६८ त वासुदेव रामचंद्र मोहनी पैठणकर ( अकोला ) यांनी 'वन्हिरथ राजाचे नाटक' लिहिलें. हे लहानसें नाटक रेल्वेवर रचिले आहे. ह्यांतील पात्रांची नांवेंहि मोठी मनोरंजक आहेत. वन्हिरथ राजा ( एंजिन ), सिग्नलिका ( सिग्नल ), कोलांतिक ( कोलमन ), पातल ( पोर्टर ) इत्यादि. यानंतर धोंडो भिकाजी मराठे यांनीं इ. स. १८६१ त 'विलासतरंगिनी' या नावाचें कल्पनारम्य नाटक प्रसिद्ध केलें. यामध्यें सूर्यकुलोत्पन्न चंद्रशेखर राजा व त्याचा प्रधान सुविचार परस्परांच्या विचारानें राज्य चालवीत असतां दायादांनीं ते कसें हरण केलें हा कथाभाग वर्णिला आहे. 'मराठी शालापत्रका'त* ह्या नाटकाचे परीक्षण प्रसिद्ध झाले होते. या नाटकात सविधानकाचा मागमूस देखील नाहीं. याशिवाय फाजील चऱ्हाट, पूर्वापरसंबधाचा अभाव, अशुद्ध शद्बप्रयोग अनावश्यक शब्दाची योजना, इत्यादि दोष आहेत ते निराळेच. इ. स. १८७२ त रावजी मनोहर ताकभाते यानी 'हंसपालिका' या नांवाचे नाटक लिहिले. यांतील मुख्य नायिकेचे हंसपक्षांनीं पालन केल्यामुळे सदर नाटकाला हें नांव दिले आहे. यांत अनेक विषयांचे विवेचन आले आहे. याच वर्षी जनार्दन मोरोबा पाटील गोरेगावकर यांनी 'आई नर्मदा अथवा भ्रांति-निरसिनी' हें काल्पनिक नाटक लिहून प्रसिद्ध केलें. ग्रंथकारानें आपल्या मातोश्रीच्या स्मरणार्थ नाटकास असे चमत्कारिक नाव दिलें आहे. इ. स. १८७४ त कृष्णाजी परशुराम गाडगीळ यांनीं 'फटफजितीचा कळस' हे एकांकी नाटक लिहिले. यामध्ये अत्यंत निर्दय, निर्लज्ज व जबर महत्त्वाकांक्षी अशा खल-पुरुषांचें स्वभावचित्र रेखाटण्याचा प्रयत्न केला आहे. ह्याशिवाय 'सूर्यकांत व नागकन्या,' 'चंपावती,' 'छेलबताऊ व मोहना राणी' इत्यादि कल्पनारम्य नाटकें त्या काळी प्रसिद्ध झाली.

---

* शालापत्रक, पु. १३ अं. ७–९

# परिशिष्ट

## १

## भाषांतरात्मक

**संस्कृत**

१ प्रबोधचंद्रोदय–सदाशिव बजाबाशास्त्री अमरापुरकर व रावजी बापुजीशास्त्री बापट, मुंबई इ. स. १८५१.
२ वेणीसंहार–परशुरामपंत गोडबोले, पुणे इ. स. १८५७.
३ उत्तररामचरित-परशुरामपंत गोडबोले,मुंबई इ. स. १८५९.
४ प्रसन्नराघव–शिवरामशास्त्री पाळदे, मुंबई इ. स. १८५९.
५ मालतीमाधव–कृष्णशास्त्री राजवाडे, मुंबई इ. स. १८६१.
६ शाकुंतल–परशुरामपंत गोडबोले, पुणे इ. स. १८६१.
७ मृच्छकटिक–परशुरामपंत गोडबोले, इ. स. १८६२.
८ रत्नावलि–शिवरामशास्त्री खरे, मुंबई इ. स. १८६४.
९ जानकीपरिणय–गणेशशास्त्री लेले, मुंबई इ. स. १८६५.
१० नागानंद–परशुरामपंत गोडबोले, मुंबई इ. स. १८६५.
११ मालविकाग्निमित्र–गणेशशास्त्री लेले, मुंबई इ. स. १८६७.(इं.ऑ)
१२ मुद्राराक्षस–कृष्णशास्त्री राजवाडे, मुंबई इ. स. १८६७.

१३ अभिज्ञानशाकुंतल—कृष्णशास्त्री राजवाडे, मुंबई
इ. स. १८६९.

१४ विद्धशालभंजिका—गणेशशास्त्री लेले, मुंबई इ. स. १८६९.(इं.ऑ.)

१५ अभिज्ञानशाकुंतल—रामचंद्र भिकाजी गुंजीकर,
मुबई इ. स. १८७०.

१६ पार्वतीपरिणय—परशुरामपंत गोडबोले, मुंबई
इ. स. १८७२.

१७ विक्रमोर्वशीय—भास्कर अनंतशास्त्री ताम्हनकर
व गणेश अनंतशास्त्री अभ्यंकर मुंबई इ. स. १८७२.

१८ विक्रमोर्वशीय—कृष्णशास्त्री राजवाडे, पुणे इ. स. १८७४.

इंग्रजी—

१९ अथेल्लो—महादेव गोविंदशास्त्री कोल्हटकर, मुंबई
इ. स. १८६७.

२० विजयासिंग—काशिनाथ गोविंद नातू
( ज्युलियस सीजर नाटकाचें भाषांतर ) पुणें
इ. स. १८७२.

बंगाली—

२१ नीलदर्पण—( इंग्रजीवरून भाषांतर )
मोरो विठ्ठल वाळवेकर मुबई इ. स. १८७२.

. .९

## २

## स्वतंत्र

ऐतिहासिक—

२२ थोरले माधवराव पेशवे–विनायक जनार्दन कीर्तने,
मुंबई इ. स. १८६१.

२३ झांशीचे राणीचे नाटक–विश्वनाथ मोरेश्वरशास्त्री
नाशिककर, नारायण गोपाळ दामले, विनायक
हरी शिनकर, मुंबई इ. स. १८७०.

२४ नारायणराव पेशवे–वीरेश्वर सदाशिव छत्रे, मुंबई
इ. स. १८७०(इं.ऑ.)

२५ अफझलखानाच्या मृत्युचे नाटक–कोंडो सखाराम घाटे,
ठाणे इ. स. १८७१.

२६ सवाई माधवरावांचे नाटक–व्यंकट रंगो कट्टी,
मुधोळकर, बेळगांव इ. स. १८७१.

चरित्रात्मक—

२७ शाकरदिग्जय–बळवंत पाडुरंग किर्लोस्कर, बेळगांव
इ. स. १८७४.(इं.ऑ.)

पौराणिक—

२८ श्रीकृष्णलीला–दामोदर कविकृत ( वीरेश्वर सदाशिव
छत्रे यांनीं शुद्ध केलें ) मुंबई इ. स. १८६०.

२९ नलनाटक–विनायकशास्त्री नातु, मुंबई इ. स. १८६२.

३० वालिवध–कृष्णाजी रामचंद्र, पुणें इ. स. १८६३.(ग्रां.कॅ.)

३१ मेधावतीपरिणय–लक्ष्मण गोपाळ दीक्षित,
पुणें इ, स. १८६३.(ग्रां.कॅ.)

३२ जयपाळ–विनायक जनार्दन कीर्तने मुंबई इ. स. १८६५.

३३ श्रीभिल्लिणी नाटक–विनायकशास्त्री नातु, मुंबई
इ. स. १८६५.

३४ रुक्मिणीहरण–लक्ष्मण गोपाळ दीक्षित, पुणे
इ. स. १८६५.

३५ चित्रसेन गंधर्व–दत्तात्रय वासुदेव जोगळेकर,
मुंबई इ. स. १८६७.(ब्रि.म्यु.)

३६ विराटपर्व–( पूर्वभाग ) रघुनाथ शंकरशास्त्री
अभ्यकर, पुणे इ. स. १८६७.

३७ गोपीचंद राजाचे नाटक–नारायण दिनकर
गोडबोले, मुंबई इ. स. १८६८.(इं.ऑ.)

३८ हरिश्चंद्रसत्वदर्शन–रघुनाथ शंकरशास्त्री अभ्यंकर,
( आवृत्ति २ री ) पुणे इ. स. १८६९.(इं.ऑ.)

३९ श्रियाळचांगुणासत्वदर्शन–रावजी बाळकृष्ण लेले,
पुणे इ. स. १८६९.(इं.ऑ,)

४० वत्सलाहरण–दामोदर हरी चितळे, ( आवृत्ति २ री )
पुणे इ. स. १८६९.(इं.ऑ.)

४१ पुनर्दर्शननाटक–रामकृष्ण काशिनाथ ओक, माहाडकर,
पुणें इ. स. १८६९.(इं.ऑ.)

४२ पार्थप्रतिज्ञा–विश्वनाथ नारायण ताटके, पुणें,
इ. स. १८७०.(इं.ऑ.)

४३ सीतास्वयंवर–लक्ष्मण शंकर अभ्यंकर, मुंबई
इ. स. १८७०.

४४ सुलोचना नाटक–रावजी बाळकृष्ण लेले, पुणे
इ. स. १८७०.(इं.ऑ.)

४५ गोपीचद नाटक–रावजी बाळकृष्ण लेले, पुणे
इ. स. १८७०.(इं.ऑ.)

४६ गौरीहरविनोद–अनंत दीक्षित जोशी, सातारा
इ. स. १८७१.

४७ रावणवध–रावजी बाळकृष्ण लेले, पुणे इ. स. १८७१.(इं.ऑ.)

४८ सैरंध्री–बजाबा बाळाजी नेने, पुणें इ. स. १८७२.

४९ मदनप्रताप–रणछोड रामभाई गुजर, अलिबाग
इ. स. १८७४.(इं.ऑ.)

५० रासक्रीडा–डेविड हाइम्, मुंबई इ. स. १८७४.(इं.ऑ.)

तत्त्वज्ञानात्मक—

५१ सायुज्यसदन–रामकृष्ण हरी भागवत,मुंबई इ. स. १८६८.

सामाजिक—

५२ व्यवहारोपयोगी नाटक–गोविंद नारायण, मुंबई
इ. स. १८५९.(ब्रि.म्यु.)

५३ मनोरमा–महादेव बाळकृष्ण चितळे, मुंबई इ. स. १८७१.

५४ प्रबोधविद्युत् अथवा स्वैरसकेशा नाटक—
रघुनाथ शंकरशास्त्री अभ्यंकर मुंबई इ. स. १८७१.(इं.ऑ.)

काल्पनिक—

५५ वन्हिरथ राजांच नाटक—वासुदेव रामचंद्र मोहोनी,
पैठणकर. अकोला इ. स. १८६८

५६ सूर्यकांत व नागकन्या—गणपत पांडुरंग कमळाकर व
भास्कर विनायक कानिटकर, मुंबई, इ. स. १८६९

५७ विलासतरंगिनी—धोंडो भिकाजी मराठे, पुणे इ. स. १८७१

५८ चपावती—गणेश विनायक कानिटकर, मुबई,इ. स. १८७१

५९ हंसपालिका—रावजी मनोहर ताकभाते पुणें, इ. स. १८७२

६० आई नर्मदा—अथवा भ्रातिनिरसिनी—
जनार्दन मोरोबा पाटील, मुंबई, इ. स. १८७२

६१ छेलबताऊ व मोहनाराणी—डेविड हाइम् मुंबई,
इ. स. १८७२ ( इं. ऑ. )

६२ फटफजितीचा कळस—कृष्णाजी परशुराम गाडगीळ
पुणे, इ. स. १८७४

---

## ४ निबंध–भाषणें–संवाद

**निबंध-वाङ्मयाचा प्रारंभ**

अव्वल इंग्रजींत शिकून तयार झालेल्या सुशिक्षित लोकाची पहिली पिढी इंग्रजांचे अगाध ज्ञानभांडार पाहून दिपून गेली; त्याबरोबरच आपल्या लोकाचे अज्ञान व दुरवस्था पाहून, त्याच्या मनाला हळहळ लागली. आपण मिळविलेल्या ज्ञानाचा आपल्या देशबांधवांना फायदा करून द्यावा व त्यांची स्थिति सुधारण्याविषयीं त्यांच्या अंतःकरणांत तळमळ उत्पन्न करावी, म्हणून तत्कालीन विद्वानांनीं इंग्रजी विद्येचा ग्राह्यांश सुबोध मराठी भाषेंत उतरविण्याचा प्रयत्न केला. मराठी गद्य–वाङ्मय बाल्यावस्थेंत असल्यामुळें, प्रत्येक विषयावर विस्तृत ग्रंथरचना करण्याचा काळ अद्याप आलेला नव्हता. सामान्य वाचकांना विविध विषयांची ‘धूळभेट’ करून देण्यासाठीं स्फुट स्वरूपाची गद्यरचना करण्यावांचून गत्यंतर नव्हतें. यामुळें निबंध–लेखनाच्या प्रवृत्तीला साहजिकच उत्तेजन मिळालें. विद्येची महती, सद्‌गुणांचें श्रेष्ठत्व, नीति–नियमांची आवश्यकता, व्यसनाधीनतेचे दुष्परिणाम इत्यादि विषयांवर लहानमोठे निबंध प्रसिद्ध होऊं लागले. समाजांतील विचारी लोक आपली अवनति व सर्वत्र पसरलेलें दारिद्र्य यांचा शोध करण्यांत गढून गेले. आपल्या अधःपतनाचें मूळ परकीय राजसत्तेंत आहे, याची त्यावेळीं कोणालाहि कल्पना आली नाहीं. परमेश्वरानें आपल्या कल्याणासाठींच इंग्रजांना या देशांत धाडून दिलें

आहे व त्यांच्या अनुकरणानेच आपण आपली सुधारणा करून घेतली गाहिजे अशी त्यावेळच्या विद्वानांची दृढ समजूत होती. ज्या गुणांनीं इंग्र-जाचा उत्कर्ष झाला ते गुण आपण आपल्या आंगीं आणण्याचा प्रयत्न केला पाहिजे, हें लक्षांत घेऊन त्यांनीं इंग्रजी भाषेतलि बोधपर ( Didactic ) निबंधांच्या धर्तीवर निबंध लिहिण्याला सुरवात केली. विद्यादेवीची आराधना करा, आळस सोडून देऊन उद्योगाची कांस धरा, आपआसांतील दुही नाहींशी करा, देशपर्यटनाचें महत्व लक्षात आणा, दुर्व्यसनाच्या आहारीं न जातां सत्य व सदाचार यांच्या मार्गानें चाला अशा तऱ्हेचा उपदेश त्याका-ळच्या निबंधांतून प्रामुख्यानें केलेला आढळतो.

**कुटुम्बविषयक निबंध**

मराठी भाषेतील सुरवातीचे निबंध मिशनरी लोकांनीं लिहिले. या प्रांतांतील लोकांना विद्येची गोडी लागावी म्हणून त्यांनीं निरनिराळ्या उपयुक्त विषयांची सामान्य माहिती देणारी लहान लहान पुस्तके तयार केलीं. मिसेस फारार या ख्रिस्ती लेखिकेनें इ. स. १८३५ त नाशिक येथें ' कुटुंबप्रवर्तननीति ' या नांवाचा निबंध प्रसिद्ध केला. हा निबंध भाषांतररूप असून त्यांत कुटुंबातील व्यक्तींनीं एक-मेकांशीं कशा रीतीने वागावें व आईबापांनीं मुलाविषयींची आपलीं कर्तव्यें पार पाडतांना कोणत्या प्रकारची सावधगिरी घेणें जरूर आहे, याचें थोड-क्यात विवेचन केलें आहे. या पुस्तकामधील 'स्वभाव' प्रकरणांतील खालील उताऱ्यावरून हा विषय किती सोप्या भाषेंत मांडला आहे, तें लक्षांत येईल.

" कुटुंबांत समागमसुख पावायासाठीं सर्वांनी नम्रतेने शांत-तेनें सोशीकपणानें वागावें म्हणून लहानपणापासून हे सद्गुण मुलांचा ठायीं दृढ करायासाठीं आईबापांनीं उपाय करीत असावा. मुलांची वासना बहुतकरून त्यांच्या वाडिलांच्या रीतीभाती-

प्रमाणें ठसती; ह्याकरितां आईबापें जर दाष्ट रागीट अभिमानी असली, परस्परांत देखील निंद्य भाषण बोलत असलीं तर त्यांचे वारे मुलांला कसे बाधणार नाहीं, बाधेलच.

कित्येक लोक जरी आपल्या लेकरावर अति प्रीति करितात तरी क्रोध आला असतां त्याला नानाप्रकारें दटावितात म्हणतात कि मी तुला उभा चिरीन, तुला उळकंबीन, तुला उलटा टांगीन असें म्हणतात तर अशा उग्र भाषणानें मुलाला कांहीं तरी शिक्षा लागेल काय? त्यानें मूल कद्धी तरी ठिकाणी येईल काय? आईबापांला ओफरें आलें म्हणून लेकराचे ओफरे जाईल काय? तर मुलाला जो धारेवर आणणार त्यानें आपल्याला अगोधर धारेवर आणले पाहिजे म्हणजे मूल धारेवर येईल.

आपल्या स्वभावाला जो जिंकील तो दुर्ग जिंकणारापेक्षां श्रेष्ठ होय.''†

या खेरीज त्याकाळी या विषयावर 'मातृबोध' (इ. स. १८६२), 'कुटुंबसुधारणा' (इ. स. १८५५) व 'मुलांस वागविण्याची रीति' (इ. स. १८७२) इत्यादि पुस्तके प्रसिद्ध झाली.

**प्रज्ञानप्रधान वाङ्मयाचा पुरस्कार**

मिशनरी लोकांच्या या विद्यादानाच्या मुळाशी धर्मप्रसाराची भावना होती. पण महाराष्ट्रांतील कांहीं विद्वान लोक, आपल्या समाजांत भौतिक ज्ञानाचा प्रसार होऊन त्याची सर्वांगीण सुधारणा व्हावी, या आपुलकीच्या भावनेनें या कार्याला प्रवृत्त झाले होते. त्यांपैकीं बाळशास्त्री

---

† कुटुंबप्रवर्तननीति पृ. १६–१७

जांभेकर व भाऊ महाजन हे दोघे प्रमुख होत. बाळशास्त्री यांनीं आपल्या ' दर्पण ' व ' दिग्दर्शन ' ह्या नियतकालिकांच्या द्वारें अनेक उद्बोधक व मनोरंजक विषयांची माहिती देण्याचा उपक्रम केला. त्याबरोबरच त्यांचे वृत्तपत्र–व्यवसायांतील सहकारी गोविंद विठ्ठल, ऊर्फ भाऊ महाजन यांनीं आपल्या ' प्रभाकर ' पत्रातून समाजाच्या प्रगतीला पोषक अशा गोष्टींची निबधरूपाने अत्यंत निस्पृहपणे चर्चा करण्यास प्रारंभ केला. बाळशास्त्री व भाऊ महाजन यांच्यासारखे विद्वान व दूरदर्शी लोक त्या काळीं महाराष्ट्रांतच काय पण मुंबई इलाख्यांतहि फार थोडे होते. या दोघां पंडितांनी प्रज्ञाप्रधान वाङ्मयाचा पुरस्कार करून मराठी गद्य-रचनेला नवीन वळण लाविलें. त्यांच्या अनुकरणाने त्यावेळेच्या इतर सुशिक्षित तरुणानीहि मराठी भाषेंत निरनिराळ्या विषयांवर निबंध लिहून प्रसिद्ध केले.

**दारू व इतर मादक पदार्थांविषयीं निबंध**

दारिद्र्याला दुर्व्यसनांची जोड मिळाली तर त्याचे परिणाम फार भयंकर होतात, हे लक्षांत घेऊन त्यावेळच्या विचारवंतांनी आपल्या गरीब देशबांधवांना मादक पदार्थांच्या सेवनापासून परावृत्त करण्यासाठीं लहान लहान निबंध लिहिले. इ. स. १८३४ त स्थापन झालेल्या मुंबई टेंपरान्स् सोसैटीच्या विद्यमानें ' दारू पिणाऱ्यांस सुबोध ' ( इ. स. १८४६ ) या नांवाचे पुस्तक प्रसिद्ध झालें. त्यानंतर इ. स. १८५५ चे सुमारास या विषयावर आणखी चारपांच निबंध लिहिले गेले. ' अम्मल करणें वाईट ', ' दारूपासून अनर्थ, ' ' दुर्व्यसन–निषेधक–बोध ', ' दारू व इतर कैफी पदार्थ–निषेधक–बोध ' इत्यादि पुस्तकांतून व्यसनाधीनतेचे दुष्परिणाम वर्णन करून त्यापासून अलिप्त राहण्याचा उपदेश केला आहे. काशिनाथ थत्ते

यांच्या ' अम्मल करण्यापासून नाश ' या निबंधांतील खालील उताऱ्यावरून ह्या विषयावरील निबंधांचें स्वरूप समजून येईल.

" अहो, दारूबाजहो! ह्या दारूपासून तुम्हास कांहींच फायदा नाही. तुमचें सर्व द्रव्य ह्या दारूमुळें गेलें, आणि तिच्याच योगानें हल्लीं तुम्हास पोटभर अन्न मिळत नाहींसें झालें आहे. तर, हे माझे स्वदेशीय बांधव हो! अशा अनेक नाशांचे मूळ जे दारू वगैरे कैफी पदार्थ ते सोडून द्या. तुमचे वाडवडील दारू पीत नव्हते, तरी ते तुम्हांपेक्षां मातब्बर होते, व शरिरानें धष्ट पुष्टहि होते, ह्याचा विचार करा. हल्लीं जे लोक अम्मल करीत नाहींत, ते तुम्हांपेक्षां अधिक सुखी आहेत, व त्याच्याने तुमच्यापेक्षां अधिक व चांगले काम करवतें. दारू प्यावी असें कोणत्याहि शास्त्रात सांगितले नाही. दारू पिण्यानें तुम्ही मोठ्या वेदनेंत असतां, ह्यामुळे तुमच्यानें ईश्वराची भक्ति करवत नाही म्हणून तो तुम्हावर रागावतो. ह्या कारणांनीं तुम्ही ह्या लोकच्या सुखास मुकता इतकेच केवळ नाहीं, तर परलोकच्या सुखांसहि मुकतां. हीं दारू तुम्हांस नरकवासास पाठविती, ह्याचा पूर्णपणीं विचार करा. आपल्या देशाकडे पाहा, आपल्या वाडवडिलांकडे पाहा; त्यांनी कोणत्या रीतीने अब्रू मिळविली, व कोणत्या रीतीनें पैसा मिळविला, ह्याचा विचार करा; अज्ञानसागरात लोळूं नका, शुद्धीवर या, असा नाशकारक वेडेपणा करूं नका. अहो, बांधवहो! ह्या वरच्या सर्व गोष्टीचा सावधपणीं विचार करा, आणि याप्रमाणे वागण्यास झटा, म्हणजे ईश्वराच्या आशीर्वादेंकरून तुम्हास सुखाची प्राप्ति होईल.

" दारूबाजी मतकर यारो अक्कल गुंग होती ॥
अपने पदरका दाम खरचकर हातमे मट्टी आती ॥
बंदे हुशार रहना बे, साहेब० ॥ १ ॥" †

---

† अम्मल करण्यापासून नाश—पृ. २८--३०

आमच्या लोकांच्या दारिद्र्यांत भर टाकणारे दुसरे महत्त्वाचें दोष म्हणजे आळस आणि कर्जबाजारीपणा हे होत. त्यांचें निवारण होऊन लोकांची स्थिति सुधारावी, या उद्देशाने एकदोन निबंध लिहिले गेले. इ. स. १८४७ त 'आळशी आणि दिवाळखोर यांस उपदेश' या नांवाचें पुस्तक प्रसिद्ध झालें. तसेंच इ. स. १८५० त 'डेक्कन व्हर्न्यांक्युलर सोसायटी'नें गोविंद नारायण यांनीं लिहिलेला 'ऋणनिषेधक बोध' हा निबंध प्रसिद्ध केला. त्यांत कर्ज होण्याची कारणे व तीं नाहींशीं करण्याचे उपाय या विषयांचें विस्तृत विवेचन केले आहे. याशिवाय लोकांनीं सत्यपालन करण्याचा प्रयत्न करावा, व्यभिचारादि अनैतिक कृत्यांपासून दूर रहावें व परोपकारात आपल्या आयुष्याचा व्यय करावा, अशा तऱ्हेचा उपदेश करणारीं अनेक लहानमोठीं पुस्तकें प्रसिद्ध झालीं. 'सत्यनिरूपण' (इ. स. १८५२), 'व्यभिचार-निषेधक बोध (इ. स. १८५४), 'सत्यासत्यविवेचन', (इ. स. १८६०) 'परोपकार' (इ. स. १८७२) इत्यादि निबंधाचा हेतु त्याच्या नांवावरून स्पष्ट कळण्यासारखा आहे.

**बोधपर निबंध.**

हिंदुस्थानांतील तत्कालीन स्थितीचा ऐतिहासिक दृष्ट्या अत्यंत बारकाईने अभ्यास करून लिहिलेले काहीं निबंध या काळांत प्रसिद्ध झाले. त्यापैकीं रामकृष्ण विश्वनाथ यांनीं लिहिलेला 'हिंदुस्थानची प्राचीन व सांप्रतची स्थिति व पुढे काय त्याचा परिणाम होणार याविषयीं विचार.' (इ. स. १८४३) हा निबंध फार महत्वाचा आहे. यांतील भाषा पुष्कळ ठिकाणीं अशुद्ध आहे, पण विचारसरणी मात्र स्पष्ट व सडेतोडपणाची आहे. स्वदेशा-भिमानाच्या भावनेने ओतप्रोत भरलेला व पूर्णपणे स्वतंत्र दृष्टीनें लिहि-

**तत्कालीन स्थितिविषयीं चर्चात्मक निबंध.**

लेला, मराठी भाषेंतील हा पहिलाच निबंध होय. यांत आरभीं इतिहास–संशोधनाच्या मार्गातील अडचणी दाखवून देऊन पुढे परकीय इतिहासकारानें लिहिलेले वृत्तांत कसे अपूर्ण, एकपक्षी व विपर्यस्त आहेत, ते स्पष्ट केले आहे. तत्कालीन स्थितीविषयीं लिहितांना, देश दिवसानुदिवस बुडत चालला आहे, दारिद्रय आणि दुःख हीं सारखी वाढत आहेत, आमच्या श्रमाचे जिन्नस आम्हीं उपभोगूं शकत नाहीं, एतद्देशीय लोक सर्व कामे करण्यास समर्थ असतांहि त्यांना तशी संधि मिळत नाहीं अशा तऱ्हेचे विचार अत्यंत निर्भयपणे प्रगट केले आहेत, आणि शेवटीं आपल्या लोकांत देशाभिमान व संघटना यांची वाण आहे, तेव्हा ते गुण आंगीं आणण्याचा आपण प्रयत्न केला पाहिजे व आपले बुडत चाललेले उद्योगधंदे भरभराटीस आणण्यासाठीं समाईक भांडवल जमा करून यांत्रिक साह्यानें मोठ्या प्रमाणावर व्यापार करण्यास तयार झाले पाहिजे अशा सूचना केल्या आहेत. या निबंधांतील खालील उताऱ्यावरून लेखकाच्या स्वतंत्र विचारसरणीची कल्पना येईल.

“ हिंदुस्थान देश जा रीतीनें सध्या आहे, त्याकडे आपण अवलोकन करून पाहूं लागलो असता, व त्यांचा साप्रतचे स्थितीचा नीटपणें विचार करूं गेलो असता असे आपणास खास दिसोन येईल, की जा सर्व लोकांची या विस्तीर्ण देशांत वस्ती आहे, त्याचे कल्याण होण्यास व ब्रिटिशाचे राज्याची व्यवस्था व स्थिरता असण्यास एक राज्यकारभार करण्याचे रीतीत मोठा फेरफार झाला पाहिजे, नाहीं तर या लोकांचे उद्योगात व वर्तणुकेंत कांहीं नवीन रचना झाली पाहिजे. इंडियाचे कोणतेही भागांत गेलों असतां सांप्रतचे जमाबंदी, शिबंदी अथवा न्यायखातें, यांचा कारभारांत जे लोकांवर मोठमोठाले कर, अंदाधुंदी

आणि जुलूम आहे' याविषयीं आणि हिंदुस्थानातील उत्पन्न केलेले सामान यावर आनिवार मोठी जकात बसवलेली आहे, की जेणे-करून त्या जिनसास विलायतचे बाजारात जाण्यास मार्ग न मिळावा याविषयीं व या काम करणारे लोकांनीं यामुळें आप-आपले धंदे सोडून दिले व भिकेस लागले याविषयीं चहूंकडून लोक गाऱ्हाणीं करितात, असे आपले आढळण्यांत येईल. हीं असलीं गाऱ्हाणी ऐकून आम्हास फार दुःख वाटतें, लोकांचे उद्योगास प्रतिबंध करणारे असे जे मोठमोठाले कर आहेत, तेही पाहून आम्हास खेद वाटतो. चागली प्रमाणे समोर असताना आमचानें कधींही नाही म्हणवत नाहीं, की जेव्हा दिवाणींत अथवा फौजदारींत युरोपियन लोकांवर कज्जा आणलेला असतो, अथवा कंपनीचे कोडतात त्यांवर फिर्याद असती, तेव्हां जो बिचारा नेटिव कज्जा घालणारा असतो, तो गरादींत गुन्हेगाराप्रमाणें उभा असतो, आणि हा शुभ्र तोंडाचा गुन्हेगार न्यायाधीशाचे शेजारीं खुर्ची घेऊन बसतो, अथवा कधीकधीं जो अधिक पैका देऊं सकेल, त्याचे तर्फेचा न्याय होतो- आणखी आमचानें नाहीं म्हणवत नाही की गरीबास बहुतकरून शासन होतें, कारण की तो दरिद्री पडला व मातब्बर पेंचातून सुटतो, कारण कीं तो श्रीमंत पडला, व दैवयोगेंकरून असेंही घडते की तो न्याय कर-णारा या गृहस्थाचा बऱ्याच पैक्याचा ऋणकरी असतो. या सर्व-गोष्टी एथील लोकांचा इतक्या माहितींतल्या आहेत, कीं जेथ-जेथे त्या नाहींत तेथतेथें त्या लोकांस आश्चर्य वाटतें, व त्या-विषयीं गवगवा उत्पन्न होतो, व जेथें त्या आहेत, तेथें आश्चर्य वाटण्याचे काय प्रयोजन! वाः काय ही न्याय करण्याची उत्कृष्ट चाल! मग बर्क साहेबानें जो दोष ठेविला आहे, त्याचें आपण कां

> बरे आश्चर्य मानावें! कीं "हिंदुस्थानांत राज्य नव्हे, लष्करी अंमल, व दिवाणी जुलूम आहे."†

याच विषयावर कृष्णनाथ रघुनाथजी यांनींहि एक लहानसा निबंध लिहिला होता. त्याशिवाय 'कामगार लोकांशीं संभाषण,' (इ.स.१८५३) 'मुंबईतील सुशिक्षित तरुण हिंदु लोक' (इ. स. १८५८) 'लोक-सुधारणोपदेश,' (इ. स. १८६६) 'आमचें कर्तव्यकर्म कोणतें,' (इ. स. १८७४) इत्यादि उद्‌बोधक निबंध त्याकाळी प्रसिद्ध झाले, यांपैकीं भवानी विश्वनाथ कानविंदे यानीं लिहिलेला 'मुंबईतील सुशिक्षित तरुण हिंदु लोक' हा निबंध फार उत्तम वठला आहे. त्यात प्रथम विद्येची महती वर्णन केल्यानंतर मातृभाषेकडे होत असलेल्या दुर्लक्षाबद्दल खेद व्यक्त केला आहे. अखेरीस ऐक्यसाधन करा, वाईट चाली मोडून टाकण्यासाठी झटा, पण उतावळे होऊं नका; विरोधकाचे विनयपूर्वक मतपरिवर्तन करा. अशा तऱ्हेचा उपदेश केला आहे. 'लोकसुधारणोपदेश' या पुस्तकात लोकांनीं प्राप्त परिस्थितीला तोंड देऊन कशा रीतीनें आपली सुधारणा करून घ्यावी याविषयीं चर्चा केली आहे, 'आमचे कर्तव्यकर्म कोणते' या निबंधांत स्वदेशीच्या तत्वाचा अत्यंत कळकळीनें पुरस्कार केला आहे. त्यातील खालीं दिलेल्या उताऱ्यावरून त्यावेळच्या लोकांचा विचारप्रवाह कोणत्या दिशेनें वहात होता तें समजून येईल.

> "या देशात जरी व्यापार जास्त वाढला आहे, तरी येथील लोकांस लागणाऱ्या पदार्थांपैकीं पुष्कळ पदार्थ बाह्य देशाहून येथें येतात, व येथे जे तयार होतात, त्यांची संख्या फारच अल्प

† हिंदुस्थानची प्राचीन व सांप्रतची स्थिति व पुढें काय त्याचा परिणाम होणार याविषयीं विचार—पृ. ७९–८०

आहे. पूर्वी या हिंदुस्थानांत लागणारे पदार्थ बहुधा येथेच तयार होत होते, परंतु आतां बाहेरून येणारे पदार्थ येथील पदार्थांपेक्षा जास्त चांगले व स्वस्त दराने मिळतात असे झाल्याकारणाने अर्थात ते लोक घेऊं लागले, व याना कोणी विचारीनासे झालें. त्या योगानें दिवसेंदिवस ते देशी पदार्थ खप नसल्याकारणानें नष्ट होत चालले. तसेच ते बनविणारे किंवा त्याच्या कृतीची माहिती असणारे लोकांची संख्याही कमी होत चालली, आतां याचा हा दोष दुसऱ्याकडे नाही, परंतु खचीत त्याच्याकडेसच आहे. कारण दुसऱ्याचे चागले पदार्थांना न भुलतां जर तसे किंबहुना त्याहून जास्त चांगले व सुलभ पडणारे पदार्थ ( तयार होणाऱ्या युक्तीने ) येथेंच बनविण्याचा यत्न त्यानीं केला असता तर गोष्ट या थरास आलीच नसती. तेंव्हां आयते तयार व चागले पदार्थ थोड्या किमतीत मिळूं लागले म्हणून श्रम कोण करितो! असे म्हणून आळसानें स्वस्थ बसले, आणि आतां जेंव्हां या थरास गोष्ट आली, तेंव्हा "कसे करूं काय करूं" या अष्टाक्षरी मंत्राचा जप करीत बसले; अशाने दुःख निवारण होईल काय ? जर असे उत्तम पदार्थ बनविण्याचे आधींच श्रम केले असते तर त्याचे ( म्ह. आमचे ) किती हित झाले असतें, व देशाला तरी किती भूषणास्पद झाले असते बरे ! आतां तरी एकमतानें झटून श्रम करणें योग्य होय; कीं ज्या योगें कालेंकरून खचित पूर्व दिवस प्राप्त होईल. वाईट जरी लवकर होतें आणि चांगल्यास जरी अवधी लागतो, तरी " प्रयत्नी परमेश्वर " या म्हणीप्रमाणे खचित होईल." *

---

* आमचें कर्तव्यकर्म कोणते पृ. १६–१९

राजकीय विषयावरील निबंधांत 'सरकारकचे चाकर आणि सुखवस्तू हिंदुस्थानांतील साहेब लोकांशीं संभाषण' (इ. स. १८५०)' 'हिंदुस्थानांतील ब्रिटिश लोकांचें राज्य व पूर्वींचीं राज्ये याची तुलना आणि हल्लीं उभ्दवलेल्या बंडापासून होणारे तोटे' (इ. स. १८५७), इंग्रेजी राज्यसत्ता इजविषयी संभाषण (इ. स. १८६८.), 'राजकीय विचार' (इ. स. १८६८), 'हिंदुस्थानात युरोपियन लोक एतद्देशीय लोकांबरोबर कसें वागतात' (इ. स. १८७४) ह्या पुस्तकांचा उल्लेख करणे अवश्य आहे.' या पुस्तकापैकीं 'हिंदुस्थानांतील इंग्रजी राज्यसत्ता इजाविषयी संभाषण' या पुस्तकांत प्रो. दादाभाई नौरोजी यानीं लंडनमधील ईस्ट इडिया असोसिएशनपुढे केलेल्या इंग्रजी भाषणाचे भाषांतर केले आहे, देशाच्या राज्यकारभारांत हात घालण्याची हिंस्थानांतील लोकांस मोकळीक नाही; तसेंच पार्लमेंटमध्ये हिंदुस्थानचे प्रतिनिधी नाहींत यामुळें एतद्देशीय लोकांच्या बाबतींत पुष्कळ वेळा अन्याय होतो, व त्याची योग्य दाद लावून घेणें प्रायः अशक्य होते. अशा आशयाचे विधान करून शेवटी "अतरीं दुखावलेली वीस कोटी प्रजा व एकलक्ष परकी लोकांची फौज या परस्परांच्या तंटयाचा परिणाम कसा काय होईल हें सांगण्यास कांहीं ज्योतिषी नकोत," असा इषारा दिला आहे. 'राजकीय विचार,' या पुस्तकांत आरंभीं सरकार व विलायतेंतील लोक याना हिंदुस्थानाविषयीं माहिती देऊन, होईल तेवढें या देशाचें हित करण्याच्या उद्देशाने स्थापन झालेल्या 'ईस्ट इंडिया असोसिएशन' या सभेची माहिती दिली आहे. त्यानंतर कलकत्ता येथील बाबू उमेशचंद्र बानर्जी यांनीं हिंदुस्थानांत प्रतिनिधींचें मार्फत राज्यकारभार चालविण्याविषयीं या सभेपुढे जो निबंध वाचला त्याचा मराठींत सारांश लिहिला आहे. शेवटीं हिंदुस्थानच्या सनदी सिव्हील नौकरीमध्यें हिंदुस्थानांतील लोकांचा प्रवेश

**राजकीय विषयांवरील निबंध**

होण्यास्तव अवश्य अशा सोयी व्हाव्या म्हणून हिंदुस्थानचे स्टेट सेक्रेटरी याकडे अर्ज करण्याचा विचार करण्याकरितां 'ईस्ट इंडिया असोसिएशन' या मंडळीची सभा भरली होती तिची हकीकत दिली आहे.

**वाङ्मयविषयक निबंध**

काशिनाथ बाळकृष्ण मराठे यानी इ. स. १८७२ त 'नावल व नाटक ह्याविषयीं निबंध' लिहिला. त्यात त्यानी कादंबरी व नाटक यांची रचना करताना लेखकाने सामान्यतः कोणत्या गोष्टी ध्यानांत ठेविल्या पाहिजेत याबद्दल थोडक्यांत विवरण केले आहे. त्याबरोबरच तत्कालीन कादंबऱ्या व नाटके यामधील ठळक ठळक दोषहि दाखविले आहेत. वाङ्मयविषयक चर्चेने युक्त असा हा एकच निबंध त्या काळी प्रसिद्ध झाला.

**निरनिराळ्या मासिकांतील निबंध**

निरनिराळ्या मासिकांतील लेखांनींहि तत्कालीन निबंध–वाङ्मयात बरीच भर टाकली. 'दिग्दर्शन' व 'प्रभाकर' या नियतकालिकांचा आरंभीं निर्देश केलेला आहेच. त्यानंतर ज्ञानप्रसारक मासिकाने या बाबतीत फार महत्वाची कामगिरी बजाविली. 'शिक्षालाभ,' 'सृष्टीच्या सौंदर्याविषयीं निबंध,' 'क्रियेवांचून ज्ञान पंगु,' 'उद्योग,' 'पुरुषार्थ,' 'आत्मशिक्षण,' 'लिहिण्याची शैली' इत्यादि विविध विषयांवरील लहान-मोठे निबंध या पुस्तकांत प्रसिद्ध झाले. भास्कर दामोदर पाळंदे, बाळ-भास्कर शिंत्रे, लक्ष्मण नृसिंह जोशी, जनार्दन सखाराम गाडगीळ, विष्णु घनःशाम, नारायणभाई, जनार्दन रामचंद्र अशा त्या काळच्या उदयोन्मुख लेखकांनीं याच मासिकाच्या आश्रयानें निबंध–लेखनाचे पाठ गिरविले. पुणें-पाठशाला–पत्रकांतून अनेक विषयांवर चांगले चांगले निबंध

...१०

प्रसिद्ध झाले. ' व्यसनाविपर्या निंबंध ', ' कवितेविषयी निबध ', ' मराठी भाषेविषयी निबंध, ' ' नेटिवांची मंदगतीने सुधारणारी स्थिति ' अशा तऱ्हेचे या मासिकातील पुष्कळ निबंध वाचनीय आहेत. विविधज्ञान-विस्तार मासिकांतहि ' मराठी भाषा, ' ' मोरोपंत, ' ' कानडी भाषा, ' ' आमच्या भाषाचा सांप्रतकाळ, ' ' स्मृतिशास्त्र, ' ' सस्कृत कवि ' इत्यादि विषयांवर भारदस्त व माहितीपूर्ण निबंध प्रसिद्ध झाले. याशिवाय ' चंद्रिका, ' ' दंभहारक, ' ' ज्ञानसंग्रह ' इत्यादि मासिकानींहि आपापल्यापरी मराठी भाषेतील निबंध—वाङ्मयाच्या विकासाला हातभार लाविला.

**लोकहितवादी**
**( इ. स. १८२३–९२ )**

इ. स. १८७४ पूर्वीच्या मराठी भाषेतील निबंध—वाङ्मयाचा आपण थोडक्यात आढावा घेतला. त्याबरोबरच या काळात उदयास आलेल्या निबंध—लेखकांची ओझरती का होईना पण ओळख करून घेणे अवश्य आहे. अर्वाचीन महाराष्ट्रातील पहिले निबंधकार म्हणून बाळशास्त्री जांभेकर व भाऊ महाजन यांचा उल्लेख आरंभी आलेला आहेच. त्यानंतर ज्यानी आपल्या प्रभावी लेखणीने महाराष्ट्रात ज्ञानप्रसाराचे पवित्र कार्य आमरण चालविले ते थोर पुरुष म्हणजे गोपाळराव देशमुख ऊर्फ लोकहितवादी हे होत. यांचे ठायीं जिज्ञासा, उद्योग, समाजसेवेची तळमळ, सूक्ष्म अवलोकन, सत्यप्रीति व सहनशीलता हे गुण उत्कटत्वाने वसत होते. संधि सापडताच प्रत्येक विषयाची माहिती करून घेण्याबद्दल ते अत्यंत दक्षता बाळगीत. विविध-विषयावरील त्यांचा व्यासंग फार दांडगा होता. " आमच्या देशाच्या माहितीच्या संबंधाने हे रावबहादुर केवळ समुद्र आहेत." * हा ' बालबोध'कारांचा

* बालबोध, नोव्हेंबर १८८६

अभिप्राय अगदी यथार्थ आहे. त्याचप्रमाणे कठोर वाक्प्रहार करण्याच्या भरातहि मालाकाराना त्याचे वरील गुण मान्य करावे लागले, यावरुन त्यांची थोरवी लक्षात येईल. लोकहितवादी यांनी इ. स. १८४८–५० या काळात ' प्रभाकर ' पत्रांत निरनिराळ्या उपयुक्त विषयावर शंभराहून अधिक पत्रे लिहिलीं. यातील प्रत्येक पत्र म्हणजे एकेका विषयावरील उत्कृष्ट निबंधच आहे. त्यांच्या लेखनकार्याचा व्याप इतका मोठा आहे की, त्यांच्या लेखणीच्या कचाटयातून एकहि विषय सुटला आहे असे नाही. ' शिमग्याचा दुराचार, ' ' शाक्तमार्ग, ' ' हिंदुस्थानांतील इंग्रजी राज्याचा विचार, ' ' आर्जवीपणा व डौलीपणा, ' 'हिंदुस्थानच्या पराधीनतेची कारणे, ' ' डोले करण्याची चाल, ' ' मानास व दानास पात्र, ' ' मन हेच ईश्वरी शास्त्र ' ' नशिबावर हवाला, ' ' वेळेचा व्यर्थ खर्च, ' ' नादविद्या, ' ' हिंदु लोकाचा व्यापार ' इत्यादि मथळे पाहूनच त्यांच्या बहुविध लेखनाचे महत्त्व समजून येईल.

गोपाळराव यांचा जन्म पुण्यामध्यें इ. स. १८२३ त झाला. त्यांचे वडील इ. स. १८३७ त निवर्तले. तेव्हा त्यांस पेशवाईपासून जी दहा हजारांची जहागीर होती, ती जप्त झाली. कालमानाप्रमाणे इंग्रजी शिकल्या-वांचून चालणार नाही हे लक्षांत घेऊन ते इ. स. १८४० त पुण्याच्या इंग्रजी शाळेत जाऊं लागले. इ. स. १८४४ त त्यास पुण्यास न्यायखात्यात दरमहा ७७ रु. पगारावर कारकुनाची जागा मिळाली. पुढे त्यांनीं मोठमोठ्या सरकारी हुद्यांच्या जागांवर कामें केली व इ. स. १८७९ त आपल्या वयाच्या ५५ व्या वर्षी पेन्शन घेतलें. त्यानंतर त्यांना मुंबई युनिव्हर्सिटीचे फेलो, जस्टिस ऑफ दि पीस, पहिल्या प्रतीचे सरदार, कायदेकौन्सिलचे सभासद, व रतलामच्या महाराजांचे दिवाण असे मानसन्मान प्राप्त झाले.

अशा रीतीनें सरकार व जनता ह्यांची बहुमोल सेवा करून हे इ. स. १८९२ त दिवंगत झाले. सार्वजनिक कार्यांत भाग घेण्याची त्यांना पहिल्यापासूनच आवड होती. त्यांनी मोठया प्रयत्नाने ज्ञानप्रकाश छापखाना व पुस्तकालय याची पुण्यांत स्थापना केली; तसेच आगमप्रकाश, निगमप्रकाश, भिक्षुक कलियुग, जातिभेद, पानिपतची लढाई, इत्यादि अनेक ग्रंथ लिहिले. याशिवाय ऐतिहासिक विषयावरहि त्यांचे पुष्कळ लिखाण प्रसिद्ध झाले आहे. याच्या निबंधातील विषयांची माडणी व भाषाशैली ह्या फार सरळ व मार्मिक आहेत. " लोकहितवादी यांचे लेखांत एक विशेष गुण असा आहे की, त्यात विषयासंबंधी दिलेली माहिती इतकी बारीक व पूर्ण असते कीं, अशी माहिती दुसऱ्या लोकाचे निबंधांतून फारच विरळा आढळते. "† त्या काळातहि त्यांचे विचार पुरोगामी होते व लोकांना ते पटवून देण्यासाठीं कोणाच्याहि रागलोभाची पर्वा न करता त्यांनीं अत्यंत निस्पृहपणें अविश्रात खटपट केली. कित्येक ठिकाणी त्यांच्या विचारांत दुराग्रह, परकीयाचे अंधानुकरण व उथळपणा हे दोष आढळतात पण एकंदरीत त्यांच्या लेखसंग्रहांत ग्राह्यांशाचें प्रमाण फार मोठें आहे हें मान्य केल्यावाचून गत्यतर नाहीं. आपले विचार स्पष्टपणें मांडण्याची त्यांची तडफहि असामान्य आहे. त्याच्या अंतरीचा जिव्हाळा त्यांच्या प्रत्येक वाक्यांत, नव्हे प्रत्येक शब्दांत प्रतिबिंबित झालेला दिसतो. त्याच्या लेखांतील दोनचार ओळी वाचतांच कोणाहि सहृदय माणसास त्याची जाणीव झाल्यावांचून राहाणार नाहीं. त्याचें सामाजिक व वाङ्मयविषयक कार्य फार मोठें आहे. त्याचे यथोचित वर्णन करावयाचे म्हटले तर तो एक स्वतंत्र ग्रंथ होईल. त्यांच्या विचारसरणीची व लेखनशैलीची कल्पना यावी म्हणून त्यांच्या एका पत्रांतील उतारा खालीं देत आहे.

† वि. ज्ञा. वि. पु. १० अं १

" सांप्रत हिंदु लोक भिकारी होत चालले आहेत, व व त्यांस रोजगार धंदा नाहीं. याचे कारण मला असे दिसते कीं या लोकांचा व्यापार अगदीं बुडाला; इंग्रज व दुसरे देशचे लोक फार शाहाणे होऊन या लोकांस सर्व जिनसा पुरवितात. आणि हे मुकाट्यांनीं स्वस्ताईमुळे खरीदी करितात. यास्तव या लोकांनीं एकत्र होऊन जर असा कट केला कीं आपले देशात दुसरे मुलखाचा जिन्नस आला तरी घ्यावयाचा नाहीं. आपले देशांत पिकेल तेवढाच माल घ्यावा. आपले लोक कापडे जाडी वाईट करतात. परंतु तेंच नेसावीं. इकडे छत्र्या कारितांत त्याच घ्याव्या म्हणजे या लोकांत व्यापार राहून इकडे सुख होईल परंतु हे लोक असे करीत नाहींत. आणि थोडी किंमत म्हणून लोकाचा जिन्नस विकत घेतात. वास्तविक पाहिले तर हल्लीं दाणे मात्र इकडे पिकवून हे लोक खातात. अजून दाणे परदेशातील येऊं लागले नाहींत. बाकी सर्व पाहावें तें परदेशचे आहे. आमचे कपडे, आमची छत्री, आमची चाकू कात्री, आमचे घड्याळ, आमची गाडी, आमची बुके सर्व परदेशातील आहेत आम्ही दाणे मात्र आपले खातो. यामुळे सर्व व्यापार बुडाला. उदमी, मजूरदार, कसबी, कारागीर घरीं बसले. आणखी तर काय सांगावें परंतु आमचे रुपये, आमचे घरात सनकाड्या-देखील युरोपच्या. इकडे लोक पैशाचा शंभर सनकाड्या देतात त्या पेटवावयास विस्तव पाहिजे, ठेवावयास मोठी जागा पाहिजे; परंतु विलायतेचा सनकाड्या सुंदर पेटीमध्ये तयार करून भरलेल्या पैशाचा शंभर मिळतात. विस्तव पेटवावयास नको अशी सोय पाहून आम्ही आपले देशचा लोकाचा सनकाड्या घेत नाहीं परंतु याजमुळें आमचे लोक किती भिकारी झाले आहेत. याजकरितां सर्वांहीं असा कट करावा कीं जे आपले देशांत पिकेल तेंच नेसूं. तेंच वापरूं कसेही असो आणि तितक्यात चांगल्या विद्या व जिन्नस उत्कृष्ट करावयाचा विद्या शिकूं.

आम्हास मिळेल तसेच घेऊन आम्ही काळ काढूं. मग हजारो खंडी कापूस इकडून विलायतेस कशास जाईल? कापूस विकणाऱ्यानी असा बेत करावा की इंग्रेजास इकडे तयार केलेलो कापडे द्यावीं परंतु कापूस देऊं नये. येणेकरून हे लोक सुखी होतील. साप्रत आपलेच लोक आपल्या लोकांस मारीत आहेत. जशी बाहेरची चागली स्त्री पाहून घरची लग्नाची स्त्री टाकून तिचे पाठिस लागतात आणि भुलतात. तसे या लोकाचे. झाले येणे–करून हाहाःकार झाला आहे. आणि जो तो शेत करूं लागला; दुसरा व्यापार कांही नाहीं परंतु शेत करण्यात तरी काय नफा? वर्षभर मजुरी मरेमरेतो करावी तरी लंगोटी आणि शिळी कोंड्याची भाकरदेखील मिळावयाची भ्राती. बहुत दाणे पिकावितात. परंतु घेतो कोण? पैसा दुसऱ्या देशात चालला. श्रीमंत लोक जाजवळ लाखो रुपये आहेत ते विलायती जिनसा घेतात आणि पैसा उडवितात. त्यांचे पोटास पावशेर दाणे पाहिजत, त्याची मात्र किमत रयतेकडे जाते. बाकी हजारो रुपये विलायतेस थेट जातात. याप्रमाणे हमेष चालले आहे. असा कट करणे वगैरे उपयोगी गोष्टी आहेत त्या पुराणीक, हरदास यांणी. लोकांस सांगाव्या त्या टाकून दुसऱ्या गोष्टी सांगतात. आणि याकडे लक्ष देत नाहीत. लोक भिकारी झाल्याचें कारण कोणी मनास आणीत नाही. जर हरदास व कथेकरी यांनी असी मते घेतली आणि लोकांस जर भरविली तर बहुत लोक एकत्र होतील. कारण की ही गोष्ट उघडी आहे. परंतु देव आधी बुद्धी नेतो मग भांडवल नेतो. तशी या लोकांची बुद्धी पापाचरणाकडे गेली. नंतर या संकटात ते आले. परंतु सर्व मागील पुराणातील कथा एकीकडे ठेवून हल्लीचे लोकाची स्थिती सुधारण्याबद्दल लोकास उपदेश केला तर महान पुण्य आहे. तसे हे हरदास करीत नाहीत. चांगल्या गोष्टी छापखान्यातून निघाव्या

असेच नाहीं. हरदासांनांही काढाव्या व त्यांस लोक एकत्र करण्याची फार शक्ती आहे. कारण कीं ते चौघात उभे राहून उपदेश करण्याचा आरंभ करितात. त्यांनीं असे उपयोगी विषय लोकास शिकविले तर सर्व आख्यानाहून हीं आख्यानें चागलीं होतील. आणखीं लोकांस समजवावें कीं, तुम्ही मूर्ख आहां. विचार करीत नाहीं. यास्तव विचार करा व विद्या करा. विलायतेतील लोकाप्रमाणें अक्कलवान व्हा. म्हणजे तुम्हास लक्ष्मी अनुकूल होईल. " *

**गोविंद नारायण माडगांवकर**
**( इ. स. १८१५—६५ )**

आपल्या देशांत विद्येचा प्रसार व्हावा या सदिच्छेने प्रेरित होऊन अव्वल इंग्रजीत ज्या काहीं व्यक्तींनीं लेखनव्यवसाय हाती घेतला त्यांमध्यें गोविंद नारायण माडगावकर याची प्रामुख्याने गणना केली पाहिजे. त्यानीं व्यवहारोपयोगी व शास्त्रीय विषयांवर सुबोध मराठी भाषेत पंधरावीस पुस्तकें लिहिलीं. त्याचे बरचेस लिखाण निबंधरूप आहे. 'शुचिर्भूतपणा', (इ. स. १८४९) 'ऋणनिषेधक बोध, (इ. स. १८५०) 'सत्यनिरूपण', (इ. स. १८५२) आणि 'दारूपासून अनर्थ' (इ. स. १८५५) हे त्यांचे निबंध स्वतत्र पुस्तक-रूपाने प्रसिद्ध झाले. या शिवाय त्यानीं 'ज्ञानप्रसारक' मासिकांत 'अचाट खाणें मसणांत जाणें,' 'अति सर्वत्र वर्जयेत्' 'द्रव्येण सर्वे वशाः' 'बळी तो कान पिळी', 'भरत खडांतील कारागीर' इत्यादि निबंध लिहिले. " उदाहरणद्वारा एकादा विषय मनात भरविण्याची शैली ह्यांस फार चांगली साधली होती ... त्यांची भाषा चांगली शुद्ध, सरळ आणि गोड, म्हणजे बहुतकरून सध्यां चांगली मराठी भाषा म्हणतात तीसारखी आहे — ते

---

* **लोकहितवादी**–निबंधसंग्रह ( नं ५७ ) . २६४–६७

गोव्याकडचे रहाणारे असून मुंबई म्हणजे भ्रष्ट मराठीचे अगदी आगर, तेथे अशी चांगली भाषा त्यांनी इतक्या दिवसांमागे लिहिली, हें त्यांच्या कीर्तीस मोठे भूषण आहे "* त्यांचा जन्म गोवे प्रांतात माडगावनजीकच्या पेरी गावी इ. स. १८१५ त झाला. ते आपल्या नवव्या वर्षी मुंबईस आले. त्यांचे इंग्रजी व मराठी शिक्षण मुंबईसच झाले. इ. स. १८३२ त त्यांचे वडील दिवंगत झाल्यामुळे कुटुंबपोषणाचा सर्व भार त्यांच्या अंगावर पडला. त्यामुळे त्यांनी मुंबईतील सुप्रसिद्ध मिशनरी डॉ. विल्सन् यांच्या शाळेत शिक्षकाची नोकरी पतकरली. सुमारे तीस वर्षे पर्यंत त्यांनी हे काम कळकळीने व कुशलतेने करून आपल्या छात्रगणाचे प्रेम संपादन केले. इ. स. १८६३ अखेर त्यांनी हे काम सोडले, तेव्हा सर्वांस फार वाईट वाटले. "त्यांचे विद्यार्थी व इतर मित्रमंडळी यांनी या समयीं मोठ्या आदरपूर्वक, भक्तिभावाने ता. २८ जानेवारी सन १८६४ रोजी त्यास एक मानपत्र दिलें, आणि सुमारे रु. २००० वर्गणीने जमा करून त्यास नजर केले. "† अध्ययन आणि अध्यापन हा त्यांचा जिव्हाळ्याचा विषय झाला होता. त्यामुळे उत्तम शिक्षक म्हणून त्यांचा चांगला नांवलौकिक झाला. "त्यांचा स्वतःचा जीवनक्रम नमुन्यालायक सद्भावप्रेरक, सद्बोधप्रद होता. त्यांचा स्वभाव मोठा मन मिळाऊ, प्रेमळ व गोड होता. त्यामुळे ते सर्वांस तेव्हांच प्रिय होत व हवेसे वाटत "‡ इ. स. १८६५ त त्यांचा अंत झाला "इंग्रजी शिक्षणप्रसार या इलाख्यात सुरू झाल्यावर पहिल्या पिढींत जे आपल्या कलमबहाद्दरीमुळें विद्वान म्हणून गाजले, त्यातच गोविंदजी हे एक होते. "$ त्यांच्या प्रेमळ व मनमिळाऊ स्वभावाचे प्रतिबिंब त्यांच्या

---

* बालबोध नोव्हेंबर १८८७

† ‡ $ महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका ( व. ६ अं. ३ ) पृ. १११–१४

लेखनांत उमटलेलें दिसतें. 'शुचिर्भूतपणा' या त्यांच्या निबंधांतील खालील उताऱ्यावरून त्यांच्या सरळ, सुबोध, शुद्ध व मनोरम भाषाशैलीची स्पष्टपणें कल्पना येईल.

"परम दयाळू परमेश्वराने मनुष्यमात्रास निर्मळपणा ठेवण्यास दुर्भिक्षता न पडावी म्हणून सर्व ठिकाणी पाण्याची सामग्री पुष्कळ करून ठेविली आहे. गरीबगुरीब लोकांनी हवा तसा निर्मळपणा ठेवावा म्हणूनच त्याणे पाण्याचा सुकाळ करून ठेविला आहे. यथाकाळी पाऊस पाडून प्रतिवर्षी पाण्याची वृद्धि करून, ईश्वर लोकास सूचना करितो की, तुम्ही आपल्या शुचिर्भूतपणात काही व्यंग पडूं देऊं नका. जी सामग्री ईश्वराने आमच्या सुखासाठी करून ठेविली आहे, तिचा जर आम्ही अनादर केला, तर तिजपासून आम्हास सुख कसे प्राप्त होईल? आम्हास या पृथ्वीवर पुष्कळ सुखे मिळत नाहीत म्हणून आम्ही वारंवार चडफडत असतो, याचे कारण काय ते पाहा! सुख प्राप्त होण्याची जी साधने ईश्वरानें आम्हास लावून दिल्ही आहेत, त्याप्रमाणे आम्ही करीत नाही तर ते प्राप्त होत नाही, म्हणून ईश्वरास दोष का लावावा? आमचे निमे आयुष्य तर आळसांतच जाते, आणि हा आळस एका मळाणपणापासून उत्पन्न होतो. मग त्याच्या मागून सर्व विपत्ती हळूहळू घरात शिरतात. यास्तव जे जे नेम भगवंताने आमच्या कल्याणासाठी लावून दिल्हे आहेत, ते यथास्थित चालवावे, म्हणजे आपणास इहलोकी व परलोकी सुख प्राप्त होईल." *

---

* शुचिर्भूतपणा पृ. २०—२१

**बाबा पदमनजी**

बाबा पदमनजी या ख्रिस्ती झालेल्या लेखकानें ' हिंदुलोकांच्या सणाविषयीं निबंध, ' ( इ. स. १८५३ ) ' व्यभिचार-निषेधक बोध, ' ( इ. स. १८५४ ) ' कुटुंब-सुधारणा, ' ( इ. स. १८५५ ) 'निबंधमाला, ( इ. सं. १८६० ) इत्यादि पुस्तकें प्रसिद्ध केलीं. या पैकीं दोन निबधांची माहिती आरंभी दिली आहेच. ' निबंधमाला ' या पुस्तकांत त्यांनीं " अर्धी सोडून सगळीला धावूं नको, " ' बौद्ध धर्म, ' ' कुस्तीशास्त्र, ' ' खरे सुख, ' ' मित्रत्व, ' ' स्वदेश-प्रीति, ' वगैरे लहानलहान निबंध लिहिले आहेत. या खेरीज त्यानी मराठी भाषेंत ख्रिस्ती धर्मासबंधी पुष्कळ पुस्तके प्रसिद्ध केली. त्यांची माहिती पुढे येईलच. बाबाची भाषा सरळ व सुबोध असून तिच्यांत एक-तऱ्हेची स्वाभाविक गोडी आहे.

**कृष्णशास्त्री चिपळूणकर**

कृष्णशास्त्री चिपळूणकर यांनी मराठी शालापत्रकात निरनिराळ्या विषयावर निबंध लिहिले. त्यांची लिहिण्याची शैली सुबोध, शुद्ध, व नमुनेदार होती. दुर्बोधता येऊं न देता प्रौढ व भारदस्त भाषा कशी लिहावी, ही कला त्यांना चांगली साधली होती. वरील मासिकांत प्रसिद्ध झालेले मराठी व्याकरणावरील निबंध व ग्रंथ-परीक्षणे ही फार मार्मिक व मुद्देसूद आहेत. " मराठी वाङ्मयाला जसें निबंधमालेचें तसेंच कृष्णशास्त्री चिपळूणकरांचेंही युग आहे. अर्धस्फुट कलिकेचें मुग्ध सौंदर्य हे पुष्पाच्या प्रस्फुट सौंदर्याचें पूर्वस्वरूप असतें. शास्त्रीबुवांची सौम्य व प्रसन्न भाषाशैली पुढे निबंधमालेंत ओजस्वी व अलंकृत होऊन अवतरली. निबंधमालेला अनुकूल व अनुरूप काळ शास्त्रीबुवांनीं उत्पन्न केला ही त्यांची कामगिरी कांहीं साधारण नव्हे. " *

* ग. त्र्यं. माडखोलकर—विष्णु कृष्ण चिपळूणकर (टीकात्मक निबंध)पृ.९

**विश्वनाथ नारायण मंडलीक**

विश्वनाथ नारायण मंडलीक यानीं केवळ आपल्या वयाच्या सोळाव्या वर्षी मराठी ज्ञानप्रसारक सभेपुढे 'व्यवहार शास्त्राचें उद्देश आणि लाभ' हा निबंध वाचला. त्यानंतर इ. स. १८२७ त 'सवयी आणि अभ्यास' हे दोन निबंध पुस्तकरूपानें प्रसिद्ध केले. हे मुख्यतः डॉ. जॉन टॉड् याच्या स्टूडंटस् गाइडच्या आधारानें लिहिले आहेत. त्यानंतर इ. स. १८६२ त याचा 'हिंदुलोकाचा मध्यंतरीय अवस्थेविषयी विचार' हा निबंध प्रसिद्ध झाला. "सिकन्दर पादशाहाचा पूर्वीचे, त्याचा वेळचे आणि विक्रमापर्यंतचे लोक व चाळीसपन्नास वर्षांअलीकडील लोक यांचा स्थितींतील काही गोष्टी-मधील अन्तर दाखविणे, हा या निबंधाचा उद्देश आहे." या निबधातील एक लहानसा उतारा खाली देत आहे.

"**शिल्पः**—पूर्वी या विषयाची अगदी माहिती नव्हती म्हणावे, तर रामराज नामें एका मद्रासेकडील गृहस्थानें या विषयाबाबद हिंदूचे जे प्राचीन ग्रंथ विद्यमान आहेत त्याविषयी एक निबंध लिहिला आहे. त्यावरून या शास्त्राची मूलतत्त्वे पूर्वीचा लोकास चागली समजली होती, व त्यावरून त्यांणी पुष्कळ नियम बसविले होते, असे दिसते. उपानादि बारा प्रकारचे कङ्गोरे, उथळी, स्तम्भमध्यभाग, शिरोभाग व लग या सर्वांचे आकार व परिमाणे ही त्यांणीं दिलीं आहेत. साप्रत जे शुद्ध एतद्देशीय शिल्पी आहेत. त्यास त्याचा शास्त्राचा मूलतत्वांची काहीं माहिती नाही, आणि कोणाजवळ ग्रंथ असल्यास या विषयाचा फार दिवस अव्हेर झाल्यामुळे त्याची परिभाषाहि लावणें जड पडते. असो, साम्प्रत या देशांत इंग्रजी शिल्पाचा पाया पडला आहे; ही सन्धि साधन आमचे लोक या शास्त्रात व तत्संबंधीं

व्यापारात मन घालून परिश्रम करितील तर या देशाचे बरेच दैन्य नाहीसे होईल.'' †

**विष्णुबावा ब्रह्मचारी**

विष्णुबावा ब्रह्मचारी यानी 'सुखदायक राज्यप्रकरणी निबंध' ( इ. स. १८६७ )व 'सहजस्थितीचा निबंध' ( इ. स. १८६८ ) ही दोन पुस्तके प्रसिद्ध केली. त्यापैकी पहिल्या पुस्तकांत त्यांनीं आपल्या मताप्रमाणे आदर्श राज्यव्यवस्था कशी असावी त्याचे कल्पनाचित्र लोकासमोर मांडले आहे. सर्व राज्य हे एक प्रकारचे कुटुंबच आहे या मूलभूत तत्त्वावर निबंधाची उभारणी केली आहे. विष्णुबावांची विचारसरणी उदार, व्यापक स्वतंत्र, जोरदार आणि कौतुकास्पद असली तरी तिच्यात शास्त्रशुद्धतेचा पूर्णपणे अभाव आहे, हे अमान्य करून चालणार नाही. 'विविधज्ञान विस्तार' मासिकाने या निबधावर अत्यंत सडेतोडपणे टीका केली होती. प्रस्तुत निबंधातील खालील उताऱ्यावरून विष्णुबावाच्या विचाराची दिशा समजून येईल.

"यात्रमाणे सर्व प्रजा एक कुटुंब व सर्व जमीन हाच एक बाग व त्यातून जे जे निघेल ते ते सर्वाचे एक. याप्रमाणे राज्यव्यवस्था असली म्हणजे सर्वांना सर्व उपभोग मिळतात. व सर्वांना उत्तम खावयास मिळते व सर्वांना उत्तम विपुल वस्त्रे व अलंकार भूषणे मिळतात व सर्वांना नाच, तमाशे, बैठकी पहावयास साप डतात. व पालख्या व रथ घोडे व हत्ती याजवर सर्वांना बसावयास मिळते, यामुळें कोणाला कांही प्राप्त नाही असे होतच नाही म्हणून सर्व लोक पूर्णकाम होतात यामुळे कामाच्या अपूर्ण-

† हिंदुलोकांचा मध्यंतरीय अवस्थेविषयी विचार पृ. २०—२१

नेने क्रोध येणे हे शिल्लक रहात नाहीं आणि क्रोध नसल्यामुळे गुन्हा करणे किंवा गुन्हा करण्यास्तव मत्सर धरून बसणें याचा लवलेशही राहत नाहीं. यामुळे हाच प्रजेचा व राजाचा खरोखर असावा तसा संबंध आहे." *

**विष्णुशास्त्री चिपळूणकर**

इ. स. १८७२ पासून विष्णुशास्त्री चिपळूणकर शालापत्रकाचे बहुतेक काम पाहूं लागले. या पुढील तीन वर्षांत त्यांनी या मासिकाच्या द्वारें ' प्रवास, ' 'शिक्षणाचें काम,' ' कविता ' ( इंग्रजी ), ' ' कवितेचा निबंध ( मराठी )' ' शिक्षा आणि शिक्षण ' इत्यादि निबंध प्रसिद्ध केले. याच सुमारांस 'संस्कृत कविपंचक ' हा त्यांचा काव्यविषयक टीका-ग्रंथ शालापत्रकांतून क्रमशः प्रसिद्ध झाला. मराठी भाषेत शोधपूर्वक आणि चिकित्सक दृष्टीने लिहिलेला हा पहिलाच विस्तृत टीकाग्रंथ होय. शालापत्रकात प्रसिद्ध झालेल्या विष्णुशास्त्री चिपळूणकराच्या या लिखाणात निबंधमालेच्या द्वारे, तरुण महाराष्ट्रात नवचैतन्य निर्माण करणाऱ्या ओजस्वी लेखणीची चुणूक दिसल्यावाचून राहत नाही. इ. स. १८७४ त निबंधमाला निघाली आणि मराठी वाङ्मयाच्या इतिहासांतील एका नवीन युगाला प्रारंभ झाला. यापूर्वीचे निबंधवाङ्मय हे अगदीं प्राथमिक स्वरूपाचे होते. त्यात इंग्रजी भाषेतील शोधपर निबंधाच्या धर्तीवर एखाद्या विषयाचें थोडक्यात कलमवार विवरण केलेले असे. कोणत्याही प्रश्नाची स्वतंत्र रीतीनें सांगोपांग चर्चा करण्याची धमक त्या काळच्या लेखकात फार क्वचित् आढळते. निबंधमालेतील विस्तृत, विद्वत्तापूर्ण, चित्ताकर्षक आणि प्रभावी लेखाच्या योगानें हा मनु पालटला.

---

* सुखदायक राज्यप्रकरणी निबंध (कलम ५) पृ० १४-१५

महाराष्ट्रांत स्वदेशाभिमानाची ज्योत प्रज्वलित झाली. प्रत्येक विषयाकडे पाहाण्याचा दृष्टिकोन बदलला. उदयोन्मुख लेखकांना नवी दृष्टी मिळाली; त्याच्यात आत्मविश्वास उत्पन्न झाला आणि मराठी गद्य-वाङ्मयाचे वैभव वाढीला लागले.

---

# परिशिष्ट

## कुटुंबविषयक.

१ कुटुंबप्रवर्तननीति–मिसेस फारार, नाशिक इ. स. १८३५

२ मातृबोध–बॉम्बे ट्रॅक्ट आणि बुक सोसायटी,
मुंबई, इ. स. १८५२

३ कुटुंबसुधारणा–बाबा पदमनजी, पुणें, इ. स. १८५५(ग्रां.कॅ.)

४ मुलांस वागविण्याची रीती–एस्. बेंजामिन्,
मुंबई, इ. स. १८७२(इं.ऑ.)

५ कुटुंबसुधारणा–गोविंद नारायण माडगांवकर

## तत्कालीन स्थितीविषयीं चर्चात्मक निबंध

६ हिंदुस्थानची प्राचीन व सांप्रतची स्थिति व पुढे काय त्याचा परिणाम होणार याविषयी निबंध–रामकृष्ण विश्वनाथ,
मुंबई, इ. स. १८४३

७ मुंबईतील सुशिक्षित तरुण हिंदु लोक–भवानी विश्वनाथ कानविंदे, मुंबई, इ. स. १८५८

८ हिंदुस्थानच्या पूर्वीच्या आणि साप्रतच्या स्थितीकडेस अवलोकन–कृष्णनाथ रघुनाथजी.

९ Essay on India–काशिनाथ त्र्यंबक, अहमदनगर, इ. स. १८६३ (ग्रां.कॅ.)

१० लोकसुधारणोपदेश–चिंतो सदाशिव भिडे, पुणें, इ. स. १८६६

११ आमचं कर्तव्यकर्म कोणते–सिताराम रघुनाथजी अधिकारी मुंबई, इ. स. १८७४

## दारू व इतर मादक पदार्थांविषयीं निबंध.

१२ दारू पिणाऱ्यांस सुबोध. मुंबई, इ. स. १८४६

१३ अम्मल करण्यापासून नाश–काशिनाथ थत्ते, मुंबई, इ. स. १८५५

१४ अम्मल करणं वाईट–शिवराम सखाराम खरे, मुंबई, इ. स. १८५५

१५ दारूपासून अनर्थ–गोविंद नारायण मुबई, इ. स; १८५५

१६ दारूपासून अनर्थ–भवानी विश्वनाथ कानविंदे.

१७ दारू व इतर कैफी पदार्थनिषेधकबोध– विष्णु घनःशाम, मुंबई, इ. स. १८५५ (ग्रां.कॅ.)

१८. दुर्व्यसननिषेधक बोध–गंगाधरशास्त्री सहस्त्रबुद्धे, मुंबई, (ग्रा.कॅ.)

१९ Evils of intemperance.–जनार्दन रामचंद्रजी मुंबई, इ. स. १८५६

## सत्य-नीति-परोपकार

२० सत्यनिरूपण-गोविंद नारायण मुंबई, इ. स. १८५२

२१ व्याभिचार-निषेधक बोध-बाबा पद्मनजी
मुंबई, इ. स. १८५४

२२ नीतिसंवाद-गोविंद नारायण, मुंबई, इ. स. १८५७

२३ द्यूतवर्जक संवाद, मुंबई, इ. स. १८६०

२४ सत्यासत्यविवेचन-कृष्णनाथ रघुनाथजी
मुंबई, इ. स. १८६२

२५ शिक्षापद्धति (भाग २) धर्म आणि नीति यासंबंधीं शिक्षण
मुंबई, इ. स. १८६३

२६ परोपकार-एक हिंदु मुंबई, इ. स. १८७२

२७ स्वदेशाभिमान-एक हिंदु मुंबई, इ. स. १८७२

## राजकीय

२८ हिंदुस्थानांतील ब्रिटिश लोकांचें राज्य व पूर्वीचीं राज्यें यांची तुलना आणि हल्लीं उम्दवलेल्या बंडापासून होणारे तोटे-डोसाभाई फ्रामजीकृत. गुजराथीवरून भाषांतर-
केशव सखारामशास्त्री, मुंबई, इ. स. १८५७

२९ धान्याचा निरख-सरकारनें धान्य ठरविण्याच्या बाबतींत हात घालावा किंवा नाहीं याबद्दल चर्चा-गरिबांचा मित्र, पुणे
इ. स. १८६२ (ग्रा.कॅ.)

...११

३० सुखदायक राज्यप्रकरणीं निबंध–विष्णुबावा ब्रह्मचारी
मुंबई इ. स. १८६७

३१ राजकीय विचार— मुंबई इ. स. १८६८

३२ हिंदुस्थानांतील इंग्रेजी राज्यसत्ता इजविषयी संभाषण ( भाषांतर ) प्रो. दादाभाई नौरोजी. मुंबई इ. स. १८६८

३३ हिंदुस्थानांत युरोपियन लोक एत्तद्देशीय लोकांबरोबर कसे वागतात ? (नौरोजी फर्दुंजी यांच्या व्याख्यानाचें भाषांतर) विनायक बाळकृष्ण दामले. पुणे इ. स. १८७४

## वाङ्मयविषयक—

३४ नावल व नाटक ह्यांविषयीं निबंध–काशिनाथ बाळकृष्ण मराठे
मुंबई इ. स. १८७२

## संकीर्ण विषयांवरील निबंध—

३५ होळीविषयीं उपदेश— मुंबई इ. स. १८४७

३६ आळशी आणि दिवाळखोर यांस उपदेश (आवृत्ति २ रि)
पुणें इ. स. १८४७

३७ नामदार सर आर्स्किन पेरी साहेब यांचें शिक्षामंडळीच्या शाळेत भाषण ( मराठी भाषांतर ) जेम्स फ्लिन
मुंबई इ. स. १८४८

३८ शुचिर्भूतपणा—गोविंद नारायण, मुंबई इ. स. १८४९

३९ सर आर्स्किन पेरी आणि डॉक्टर जेम्स बर्नस् यांची ग्रांट मेडिकल कालेजांतील व्याख्यानें. (मराठी तर्जुमा) नारायण दिनानाथजी
मुंबई इ. स. १८४९

४० ऋणनिषेधकबोध-गोविंद नारायण, मुंबई इ. स. १८५०

४१ सरकारचे चाकर आणि सुखवस्तू हिंदुस्थानांतील साहेब लोकांशीं संभाषण पुणे इ. स. १८५०

४२ कामगार लोकांशीं संभाषण पुणे इ. स. १८५३

४३ हिंदु लोकांच्या सणाविषयी निबंध मुंबई इ. स. १८५३

४४ विद्याभ्यास केलेल्या तरुणास व्याख्यान-कुकडे मुंबई इ. स. १८५५

४५ संवयी आणि अभ्यास-विश्वनाथ नारायण मंडलीक मुंबई इ. स. १८५७

४६ निबंधमाला-बाबा पदमनजी, पुणे इ. स. १८६०

४७ हिंदुलोकांचा मध्यंतरीय अवस्थेविषयी विचार-विश्वनाथ नारायण मंडलीक मुंबई इ. स. १८६२

४८ संवादमंडळ (भाग १) हरी नारायण मोडक. मुंबई इ. स. १८६७

४९ सहजस्थितीचा निबंध-विष्णुबावा ब्रह्मचारी, मुंबई इ. स. १८६८

५० चंदन-एक हिंदु. मुंबई इ. स १८७२

५१ व्यापारसंबधीं व्याख्यानें-माधवराव गोविंद रानडे, पुणे इ. स. १८७३

५२ बडोद्याच्या स्थितीविषयीं विचार पुणें इ. स. १८७४

---

## ५ सामाजिक वाङ्मय

**पाश्चात्यांचें सांस्कृतिक आक्रमण**

इ. स. १८१८ त पेशवाईचा अस्त होऊन शनवारवाड्यावर इंग्रजांचें निशाण फडकलें. एखाद्या देशांत आपलें राजकीय वर्चस्व स्थापित झाल्यावर त्याला बळकटी आणण्यासाठीं जेते लोक प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष रीतीनें जित राष्ट्रावर आपली संस्कृति लादीत असतात ही गोष्ट इतिहासप्रसिद्ध आहे. इंग्रजांच्या बाबतींतहि असाच प्रकार झाला असल्यास नवल नाहीं. एकोणिसाव्या शतकाच्या पूर्वार्धातच ब्रिटिश मुत्सद्यांनीं पाश्चात्य शिक्षणाच्या द्वारें आपली संस्कृति हिंदी लोकांच्या गळीं उतरविण्याचा पद्धतशीर प्रयत्न सुरू केला. त्या वेळच्या मिशनरी लोकांचें कार्यहि या प्रयत्नाला पूरकच होतें. " Our vocation is to plant the seeds of European civilization and the principles of Christianity " † पाश्चात्य संस्कृतीचें बीजारोपण आणि ख्रिस्ती धर्माचा प्रसार यासाठींच त्यांच्या नानाविध चळवळींचें जाळें मोठ्या कुशलतेनें पसरविलें जात होतें. त्यांच्या संस्कृतीचें श्रेष्ठत्व सिद्ध करतांना आमच्या समाजांतील दोष दाखविणेंहि अवश्य होतें, आणि म्हणून मिशनरी लेखकांनीं मुद्रण-कलेच्या

---

† **John Clark Marshman**-*History of Serampore mission Vol. II, P. 19*

साह्याने हिंदु समाजव्यवस्थेवर जोराचा हल्ला चढविला. आमच्यांतील अनिष्ट चालींचें आणि वेडगळ समजुतींचे हिडिस स्वरूप त्यांनीं उघड करून दाखविलें. जातिभेद, बालविवाह, स्त्रीशिक्षणाचा अभाव, विधवांची दुःस्थिति इत्यादि विषयावर त्यांनीं लहान लहान पुस्तकें प्रसिद्ध करून खेड्यापाड्यांतून वाटलीं. बाजारातून व यात्रांमधून व्याख्याने देऊन समाजाच्या अगदीं खालच्या थरापर्यंत त्यांनीं आपल्या धर्माचा व संस्कृतीचा प्रचार केला आणि तो परिणामकारक व्हावा, म्हणून आमच्या समाजरचनेची आणि रीतिरिवाजांची भरपूर नालस्ती करण्यासहि कमी केलें नाही. त्याचा हेतु कसाहि असला तरी त्यांच्या विचारसरणींत काहीच तथ्य नव्हतें असें म्हणता येणार नाही. उलट त्यांचा प्रचार ही एका दृष्टीने इष्टापत्तीच होती, हे मान्य करणें भाग आहे. यामुळे तरी त्या वेळच्या विचारी आणि समंजस लोकाचे डोळे उघडले, व आपल्यांतील दोष शोधून काढण्याकडे त्याचे लक्ष लागले. त्यांनीं व्यापक दृष्टीने आपल्या समाजस्थितीचा विचार केला, आणि त्यांना ज्या ज्या सुधारणा इष्ट वाटल्या त्या त्या प्रांजल बुद्धीने आणि निर्भीडपणें लोकांसमोर मांडल्या.

**पतित--परावर्तन**

अर्वाचीन काळातील सामाजिक सुधारणेचे आद्य प्रवर्तक बाळशास्त्री जांभेकर हे होत. या थोर पुरुषाने महाराष्ट्रांत अनेक चळवळींचे बीजारोपण केलें. गंगाधरशास्त्री फडके याजकडून त्यांनीं विधवाविवाहाविषयीं एक अनुकूल ग्रंथ लिहविला. त्याचप्रमाणे रे. नारायण शेषाद्रि याचे ख्रिस्ती झालेले बंधु श्रीपाद शेषाद्रि यांस प्रायश्चित्त देऊन परत हिंदुधर्मांत घेण्याच्याकामीं त्यांनीं पुढाकार घेतला होता. महादेवभट शेडये आणि गंगाधरशास्त्री फडके यांचें त्यांना सहकार्य लाभले. त्र्यंबकशास्त्री शालिग्राम आणि नारायण-

शास्त्री थत्ते यांनीं शास्त्रार्थ काढून दिला. जगद्गुरु श्री. शंकराचार्य मठ कोल्हापूर यांचें आज्ञापत्रहि आणविले होतें. इतक्या शास्त्रशुद्ध रीतीनें शुद्धी-करण झालें, तरी देखील शास्त्रीमंडळीना याबद्दल सतत पांच वर्षे ग्रामण्याचा जाच सोसावा लागला. आज शुद्धीच्या चळवळीचें महत्व लोकांना कळूं लागले आहे. पण जवळजवळ एका शतकापूर्वी ज्यांनीं या कार्याला हात घातला त्याचा दूरदर्शीपणा आणि धडाडी हे गुण गौरवास्पद नाहींत काय ? श्रीचे आज्ञापत्र, शुद्धीविषयीचा शास्त्रार्थ इत्यादि सर्व पत्रव्यवहार ' उपदेश-चंद्रिका ' मासिकांत ( इ. स. १८४४ ) प्रसिद्ध झाला आहे. जिज्ञासूंनीं तो अवश्य पहावा.

**स्त्रीशिक्षण**

मुंबई इलाख्यात स्त्रीशिक्षणाचा उपक्रम अमेरिकन मिशनने केला. " It was in March 1824 that female education commenced in the island of Bombay under the American Mission" * मिशनरी लोकाच्या शाळेत मुली धाडण्यास लोक आरंभी मुळींच तयार नसत आणि मोठ्या मिनतवारीने ज्या थोड्या मुली येत त्याहि लोकापवादाच्या भीतीने लवकरच शाळा सोडून जात असें " Oriental Christian Spectator ' Vol V ( 1834 ), मधील त्यांच्या अहवालावरून दिसून येते. अशा प्रतिकूल परिस्थितींतहि त्यांनीं आपले प्रयत्न चिकाटीने चालू ठेवले. हळुहळू मुलींची संख्या वाढत चालली परंतु लोकांचा विरोध मात्र कायमच होता. इ. स. १८४१ त ' स्त्रीविद्याभ्यास–प्रकरण ' या नांवाचा दोनतीन पृष्ठांचा लहानसा निबंध प्रसिद्ध झाला. त्यांत स्त्रीशिक्षणावरील आक्षेपाचे थोडक्यात खंडन केलें

* *Memoir of Rev Robert Nesbit*

आहे. शिक्षणानें स्त्रिया बिघडतील, दुराचारी बनतील ही कल्पना चुकीची आहे; त्याप्रमाणेंच शिक्षणामुळें शीघ्र वैधव्य येतें ही समजूतहि वेडगळपणाची आहे असें सांगून शेवटीं " रुक्मिणीनें कृष्णास पत्र लिहून श्लोकबद्ध ब्राह्मणाहातीं पाठविलें होतें. ही कथा श्रीमद्भागवतीं दशमस्कधात प्रसिद्ध आहे. तेव्हां पूर्वी चाल असतांही क्षुद्र दृष्टीनें मना केली, असें स्पष्ट दिसतें. " असें म्हटंल आहे.

इ. स. १८४८ त जोतिराव फुले यांनी आपल्या वयाच्या एकविसाव्या वर्षी पुण्यांत एक मुलींची शाळा काढिली. या कामीं त्यांच्या पत्नीनें त्यांना निष्ठापूर्वक साह्य केलं. त्यांचे पुष्कळ हाल झाले. त्यांनीं ते निमूटपणें सहन केले; पण आपलं कार्य मात्र सोडिलें नाहीं. त्यांतच त्यांच्या कर्तव्यनिष्ठेची कसोटी होती. इ. स. १८५१ मध्ये सर अर्स्किन यांच्या प्रयत्नाने जोतिबांना एक शालजोडी व २०० रु. बक्षीस मिळाले. अशा रीतीनें स्त्रीशिक्षणाचा दिवसानुदिवस अधिकाधिक प्रसार होत होता. 'मराठी ज्ञानप्रसारक' मासिकांत स्त्रीशिक्षणाचा पुरस्कार करण्यासाठीं 'स्त्रीशिक्षणाविषयीं निबंध,' 'स्त्रीशिक्षणाविषयीं विचार,' 'एतद्देशीय स्त्रियांची स्थिति' इत्यादि अनेक लेख प्रसिद्ध झाले होते. बाबा पदमनजी यांनीं इ. स. १८५२ त 'स्त्रीविद्याभ्यास' या नांवाचा निबंध लिहिला.* याच वर्षी डॉ. रामजी गणोजी यांनींहि या विषयावर एक पुस्तक प्रसिद्ध केलें. 'ज्ञानप्रसारक' मासिकांतील खालील उताऱ्यावरून त्यावेळच्या स्त्रीशिक्षणविषयक लेखांची कल्पना येईल.

---

* " प्रभाकर पत्रांत ह्या लहानशा पुस्तकाविषयीं चांगला अभिप्राय आला होता. " बाबा पदमनजी—'अरुणोदय' पृ. १२०

"सुवाच्य व दिव्य अक्षर लिहिणें, सुमाराचे हिशेबठिशेब जाणणे, याचे नाव विद्या नव्हे. हीं केवळ विद्येची साधनें मात्र होत. जिच्या योगे आपल्या इहलोकीं परलोकसाधनार्थ काय कर्तव्य आहे हें समजतें, जिच्या योगें भूतदया अंतःकरणांत उत्पन्न होत्ये, जिच्या योगे सृष्टिजन्य ईश्वरीज्ञान कळते, जिच्या योगे आपल्या शेजाऱ्यापाजाऱ्यासी व आपला आत्मा आणि जगन्नियंता भगवान् याशी काय संबंध आहे हे समजतें; जिच्यायोगे हिताहिताची बऱ्यावाईटाची, पापपुण्याची निवड करण्याची शोधक बुद्धि आपणास प्राप्त होत्ये; जिच्या योगे नीतिशास्त्र व ईश्वरप्रेरित धर्मप्रकरण वाचून समजण्यात आनंद प्राप्त होतो, तिचे नाव विद्या. तर अशा विद्येच्या योगे स्त्रियांचे मन सन्मार्गाकडेस वळल्यावाचून कसें राहील? मातापितरांची सेवा, पतिशुश्रूषा, व पातिव्रत्य रक्षण, हे जे स्त्रियांचे उत्कृष्ट धर्म, तेच आचरित जावे, असे त्यास बलात्कारानेंच सांगितलें तर त्या भिडेभाडेने ऐकतील एवढेच मात्र परंतु त्याच्या मनावर असा दृढ संस्कार करून देण्यास ज्ञान हेच मुख्य साधन होय. याप्रकारची विद्या शिकून ज्यांचा मनात नीतीचा प्रकाश व दुराचरणाचा वीट बसला आहे, अशा कुलपालिका स्त्रिया कधीही दुराचारास प्रवृत्त होणार नाहीत." †

**पुनर्विवाह**

इ. स. १८३७ त एक तैलंग ब्राह्मण व दुसरा परशुराम क्षेत्रस्थ ब्राह्मण अशा दोघा लेखकांनीं एक किताब छापून महाराष्ट्रांत पुनर्विवाहाच्या प्रश्नाला प्रथम चालना दिली. त्यानंतर इ. स. १८४१ त 'पुनर्विवाहप्रकरण' या नांवाचें एक ल्हानसे पुस्तक प्रसिद्ध झालें. गंगाधरशास्त्री फडके यांनींहि

† मराठी ज्ञानप्रसारक मासिक (पु. ४ अं. ३) पृ. ७०

या विषयावर एक ग्रंथ लिहिल्याचा उल्लेख आढळतो. † कदाचित् हाच तो ग्रंथ असण्याचा संभव आहे. गतभर्तृकांना पुनर्विवाहाची मोकळीक नसल्यामुळें वैधव्यदशेंत त्यांचें वाकडे पाऊल पडले तर त्याबद्दल त्यांना दूषण देणें योग्य नाहीं असे या पुस्तकांत स्पष्ट म्हटलें आहे. त्यांतील खालील उताऱ्यावरून पुनर्विवाहाच्या चळवळीची पूर्वपीठिका लक्षांत येईल.

"असे हे बालविधवाकृत दुष्कृत उघड पाहून जे लोक विचारवंत, पापभीरू, लोकहितेच्छु आहेत त्यानी पुनर्विवाहविधि चालविल्यावांचून हा दुराचार मिटणार नाही. असे विचारून त्या विधीकरिता प्राचीन संमत घेऊन बहुत लिहिले. असे पूर्वी सवाई जयसिंगाचे वळेस व त्याचे आलीकडे पुण्यास परशुरामभाऊ पटवर्धन, कलकत्यास राममोहनराय, हे आदिकरून बहुताही वादविवाद चालविला, परंतु विचारवंत थोडे, गतानुगतिकें बहूत याजकरितां तो विचार तसाच राहिला. त्याचे आलिकडे शके १७५९ इसवी सन १८३७ या सालीं मुंबईत एक किताब छापिली. त्याचे लिहिणार दोघे; एक तैलंग ब्राह्मण, दुसरा परशुरामक्षेत्रस्थ ब्राह्मण; त्या किताबा सर्वत्र गेल्या, त्याजवर एक धर्मशास्त्री यांणी दूषण लिहिले तें मुंबई दर्पणांत छापिले;त्याजवर परशुरामक्षेत्रस्थ याणीं कटु लिहिलें. ती दोन्ही पाहून तैलंग ब्राह्मण याणे कटु लिहायाचे कारण नाही, म्हणून दोघांचे समाधान करून युक्तिप्रयुक्तीनें आपले मत स्थापिले. हे सर्व दर्पणात छापिले आहे. तें सर्व पाहून एका मध्यस्थाने साधकेबाधके विस्तारपूर्वक लिहून अक्षतयोनि स्त्रियांचा पुनर्विवाह करावा असें तैलंग ब्राम्हणाचेंच मत स्थापिले; त्यात फळेंही दाखविलीं. म्हणून ती किताब विस्तृत आहे, यास्तव दर्पणांत समावेश न होय म्हणून छापिली नाही. वेगळीही छापिली गेली नाहीं; परंतु कांहीं प्रति लिहवून धर्मशास्त्री

वगैरे यांजकडे पाठविल्या. त्याजवर पुन्हा कोणी दूषण दिल्हें नाहीं. तेव्हां सर्व संमतीच दिसली परंतु संमति देऊन लिहिलें न होते. त्यानंतर या सालात मुंबई अखबारामध्ये पुनर्विवाह करण्या॰ विषयीं सरकार चित्त पुरवीत आहे यास्तव हिंदुस्थानांतील नेटिव लोकांही बालविधवांस कामोत्पत्तीच न व्हावी अशा मात्रा करून ठेवाव्या. असे थट्टेप्रमाणे लिहिलें होते परंतु त्यांत पंडित लोकांना पाहायाजोगी हासल गोष्ट एकही न होती. असी ही चर्चा स्तब्ध झाल्याप्रमाणें होती. साप्रत नागपुरी एक भरंवशीक गृहस्थाचे पदरचा पंडित यानेंही हा दुराचार पाहून अनुतापानें एक किताब लिहिली त्यात प्राचीन ग्रंथस्थवचने व युक्तिप्रयुक्ति चागल्या लिहिल्या आहेत. ती किताब पुण्यास छापणार आहेत. ही किताब आणि मध्यस्थानी लिहिलेली एक अशा दोन्ही छापवून त्या किताबा सर्वत्र पंडिताकडे पाठविल्यास श्रीभगवान् त्याना बुद्धि देऊन संमत करवील म्हणजे हे कार्य सिद्धीस जाईल अशी आम्हांस आशा आहे. सर्व पंडित मंडळीस आमची प्रार्थना हीच कीं, पाहा सर्वत्र दुराचार सर्वांस दिसत असतांही कोणी मिटवि ण्याचा उद्योग करीत नाही. जो करितो त्याला सहायही करीत नाहींत हे आश्चर्य आहे. भगवंताने विवेक दिल्यासारखा लोकोप-पकाराचा विचार करावा यातच किर्ति आणि सुकृत आहे. गतानु गतिकत्व करूं नये. सर्वांसही त्या किताबा मागवून आद्यंत चांगला पाहून एकमत होऊन संमती द्यावी. म्हणजे लोकोपकार मोठा होऊन त्याचें श्रेयही मिळेल." †

'प्रभाकर' पत्राच्या २३ जानेवारी १८४२ च्या अंकांत बेळगांव येथे दोन ब्राम्हण बालविधवांचे पुनर्विवाह झाल्याचें वृत्त प्रसिद्ध झालें आहे.

---

† पुनर्विवाह प्रकरण ( इ. स. १८४१ )

त्यावरून महाराष्ट्रांत पुनर्विवाहाची प्रथा निदान पंचाण्णव वर्षांपूर्वी तरी सुरू झाली होती हें उघड होतें.

लोकहितवादी

लोकहितवादी याची 'प्रभाकर' पत्रांतून पुनर्विवाहविषयक आठदहा पत्रें प्रसिद्ध झालीं आहेत. त्यांत त्यांनीं अत्यंत कळवळ्यानें हा विषय लोकांसमोर मांडला आहे. "ईश्वरानें स्त्री व पुरुष सारखे उत्पन्न केले व उभयताचे अधिकार समसमान आहेत असें असतां पुरुषास पुन्हा विवाहाची आज्ञा आणि स्त्रियांस मात्र मनाई हा केवढा जुलूम आहे." लोकांनीं मनांत आणले तर हा अन्याय ताबडतोब दूर करता येईल. "शास्त्र यद्यपि असेल कीं, स्त्रीचा पुनर्विवाह करूं नये. तर शास्त्र हे कायदे आहेत. व जे अनहित-कारक कायदे असतील ते सोडून दुसरे करण्यास काही चिंता नाही."† निर्भय-पणानें पुढें होऊन आता ह्या कामाला आरंभ केला पाहिजे. कोणाचीहि भीडमुर्वत धरून स्वस्थ बसण्यांत आपलाच नाश आहे. अशा तऱ्हेचे स्पष्ट आणि सडेतोड विचार त्यांनीं या पत्रांत प्रगट केले आहेत.

विधवाश्रुमार्जन

दादोबा पांडुरंग यांनीं इ.स. १८५७ त संस्कृत भाषेमध्यें 'विधवाश्रुमार्जन' या नांवाचा एक निबंध लिहिला, आणि त्या-बरोबरच त्याचें सारांशरूपानें मराठी भाषांतरहि प्रसिद्ध केलं. यांत त्यांनीं निरनिराळ्या शास्त्रग्रंथांच्या आधारें पुनर्विवाह-पक्षांचें समर्थन केलें आहे-

---

† लोकहितवादी–निबंधसंग्रह ( नं. १६ ) पृ. ६०

इ. स. १८६३ च्या सुमारास 'पाठारे रिफॉर्म असोसिएशन' या नांवाची एक सभा स्थापन झाली. तिचे चिटणीस मोरोबा कान्होबा विजयकर हे होते.

**मोरोबा कान्होबा**

या सभेच्या विद्यमाने विधवाविवाहासंबंधीं एक इंग्रजी व एक मराठी अशी दोन पत्रकें प्रसिद्ध झाली. ह्या पत्रकांवर अभिप्राय देण्याच्या निमित्ताने वर्तमानदीपिका, वृत्तवैभव, ज्ञानप्रकाश इत्यादि पत्रांनीहि या विषयाची चर्चा केली. मोरोबा कान्होबा हे विधवाविवाहाचे कट्टे पुरस्कर्ते होते. त्यांनीं इ. स. १८७० त स्वत: पुनर्विवाहहि केला. याच वर्षांतील त्यांचे विधवा विवाहावरील व्याख्यान पुस्तकरूपाने प्रसिद्ध झाले आहे. इ स. १८६४ त ज्योतिराव फुले यानी शेणवी जातीत एक पुनर्विवाह घडवून आणिला आणि या चळवळीला आपला पूर्ण पाठिंबा आहे हे दाखवून दिले.

**विष्णुशास्त्री पंडित**
**( इ. स १८२७-७६ )**

यानंतर विष्णुशास्त्री पंडित यांनीं हा प्रश्न हातीं घेतला, आणि तो सोडविण्यासाठी जन्मभर कसोशीने प्रयत्न केला. इ. स. १८६५ त बंगाल प्रांतातील पुनर्विवाहपक्षाचे अध्वर्यु पंडित ईश्वरचद्र विद्यासागर यांच्या 'विधवाविवाह' ह्या ग्रंथाचे त्यांनीं मराठींत भाषांतर केले. त्यांत धर्मग्रंथातील आधार देऊन पुनर्विवाहाच्या सशास्त्रतेची चर्चा केली आहे. हा ग्रंथ प्रसिद्ध होतांच महाराष्ट्रात मोठी खळबळ उडाली. सनातनी आणि सुधारक असे दोन तट पडून पुनर्विवाहाच्या लढ्याला तोंड लागले. सामाजिक सुधारणेची चळवळ म्हणजे 'सुळावरील पोळी' आहे याची विष्णुशास्त्री पंडितांना पूर्ण जाणीव होती, लोकविरोधाला न जुमानता त्यांनीं लेख, व्याख्यानें, वादविवाद इत्यादि साधनांच्या द्वारें आपला प्रचार जोरांत सुरू केला; आपल्या प्रयत्नांना संघटित स्वरूप प्राप्त व्हावें म्हणून त्यांनीं गोपाळराव हरी

देशमुख ( लोकहितवादी ), न्यायमूर्ति रानडे, रा. ब. मोरोबा कान्होबा वगैरे मंडळींच्या साह्यानें इ. स. १८६५ त पुनर्विवाहोत्तेजक मंडळीची स्थापना केली, आणि तिच्या विद्यमानें दोनतीन पुनर्विवाहहि घडवून आणिले. इ. स. १८७४ त त्यांनीं स्वतःपुनर्विवाह केला आणि आपली अढळ तत्वनिष्ठा जगाच्या प्रत्ययास; आणून दिली.

विष्णुशास्त्री यांचे मूळ गांव सातारा. तेथें इ. स. १८२७ त त्याचा जन्म झाला. त्यांनीं लहानपणीं वे. शा. स. राघवेंद्राचार्य गजेंद्रगडकर यांच्यापाशीं व्याकरणशास्त्राचा अभ्यास केला. त्यांचे इंग्रजी शिक्षण पुणें येथे झाले. इ. स. १८५५ त त्यांनी शिक्षणखात्यांत नोकरी पतकरली. सातआठ वर्षें काम केल्यानंतर नोकरीचा राजीनामा देऊन ते इ. स. १८६४ त इंदुप्रकाश वर्तमानपत्र चालवूं लागलें. ह्यावेळेपासून त्यानीं विधवाविवाहाचें कार्य हातीं घेतले आणि सतत बारा वर्षेंपर्यंत ते नेटाने चालविले. इ. स.१८७६ त त्यास देवाज्ञा झाली. त्यांनीं ' नाना फडनवीस ह्याची संक्षिप्त बखर, ' हिंदुस्थानचा इतिहास-भाग ३ रा ( मरेचे भाषांतर ) ' ब्राह्मणकन्याविवाहविचार ' 'इंग्रजी'-मराठी कोश, ' 'विधवाविवाह,' ' संस्कृत आणि महाराष्ट्र धातुकोश' 'पुणें व नासिक येथील स्त्रीपुनर्विवाहावरील व्याख्याने,' ' आर्य लोकांच्या प्राचीन आणि अर्वाचीन रीति व त्याची परस्पराशीं तुलना आणि द्विजानीं नावेंतून विलायतेस जाणें निर्दोष आहे या विषयांवर व्याख्याने,' ' शूद्रधर्म ,' ' स्मृतिशास्त्र,' ' वेदातील सूर्य सावित्रीचा विवाह ' इत्यादि पुस्तकें प्रसिद्ध केलीं. त्यांच्या विधवाविवाह या ग्रंथांतील खालील उताऱ्यावरून पुनर्विवाह-पक्षीयांची भूमिका स्पष्ट होईल.

> " विधवाविवाह मन्वादि स्मृतिकर्त्यांच्या मतास वास्तविकच विरुद्ध नाहीं. इतकीच एक गोष्ट समजली पाहिजे कीं, दुसऱ्या

वेळेस विवाह झालेल्या स्त्रियास ते पुनर्भू म्हणत असत, आणि त्याजपासून झालेल्या पुत्रास पौनर्भव म्हणत असत, आणि पराशराच्या मताप्रमाणे अशा स्त्रियांस व अशा पुत्रांस कलियुगांत ती नावे नाहीत. हा एवढाच काय तो फरक पराशर व अन्य स्मृतिकर्ते याच्या मतात आहे. पराशराच्या मनांत कलियुगांत त्या संज्ञा चालवायाच्या असत्या तर त्याने अशा स्त्रियास पुनर्भू हा शब्द लावला असता आणि सांगितलेल्या पुत्राच्या प्रकारांत पौनर्भव पुत्राचें परिगणन केले असतें. कलियुगांमध्यें अशा स्त्रियास पुनर्भू शब्द लावायाचा नाहीं, आणि त्याजपासून झालेल्या पुत्रांस पौनर्भव या प्रकारचे न मानितां औरसच मानावयाचे, हें चालू संप्रदायावरूनही सिद्ध आहे. पाहा कीं, वाणीने एखाद्या पुरुषास कन्या दिल्यानंतर विवाह होण्यापूर्वींच तो पुरुष मेला अथवा दुसऱ्या कारणानें त्याजबरोबर व्हावयाचा विवाह रहित झाला तर त्या कन्येचा विवाह दुसऱ्या पुरुषाबरोबर होतो. मागील युगांत अशा स्त्रियांस पुनर्भू व त्याच्या संततीस पौनर्भव असें म्हणत असत. ते असेः—

सप्त पौनर्भवाः कन्या वर्जनीयाः कुलाधमाः ।
वाचा दत्ता मनोदत्ता कृतकौतुकमंगला ।
उदकस्पर्शिता या च या च पाणिगृहीतिका ।
अग्निं परिगता या च पुनर्भूप्रभवाच या ॥
इत्येताः काश्यपेनोक्ता दहन्ति कुलमग्निवत् ॥

हल्लींच्या काळांत वर सांगितलेल्या सात प्रकारच्या पुनर्भूपैकीं वाग्दत्ता, मनोदत्ता, कृतकौतुकमंगला आणि पुनर्भूप्रभवा या चार प्रकारच्या पुनर्भूचा विवाह धडका चालूच आहे. अशा स्त्रियांस जरी पूर्वीच्या युगांत पुनर्भू म्हणत असत, तरी आतां त्यास निराळें विशेषण लागत नाहीं, आणि सर्व गोष्टींमध्यें त्या,

ज्याचा प्रथमच विवाहसंबंध झाला आहे, त्यांजप्रमाणेच मानल्या आहेत. आणि त्यांजपासून झालेले पुत्र पौनर्भव असे न मानता सर्व गोष्टीविषयीं औरसच मानले आहेत. मातापितरांस पिंडदान करणे त्यांच्या मालमत्तेचे वारस होणें वगैरे पुत्राने करावयाच्या गोष्टी ते औरस पुत्राप्रमाणेंच करितात. त्यास चुकूनही कधी पौनर्भव असे म्हणत नाहीत''†

**विधवाविवाहखंडन**

' विधवाविवाह ' हा ग्रंथ प्रसिद्ध झाल्यानंतर त्याचें खंडन करण्यासाठीं तीनचार पुस्तके लिहिली गेलीं. इ. स. १८६५ त बाळकृष्ण लक्ष्मणशास्त्री बापट यानीं ' विधवाविवाहखंडन ' हा ग्रंथ छापला. त्याच्या प्रस्तावनेत " या ग्रंथाच्या नांवावरून ग्रंथकाराचा आशय पुनर्विवाहाविरुद्ध आहे अशी शंका येईल, परंतु त्याचा अभिप्राय तसा नाही, तर तो तूर्त उभयपक्षींच्या अडचणी पाहून उदासीन आहे हे उपोद्घातावरून समजेल. तथापि जे शास्त्रार्थ पुनर्विवाहास लागू केलेले आहेत ते तसे नसतां त्याचा विपरीत अर्थ करून स्वार्थपर लाविल्यामुळें ग्रंथकारानें स्वबुध्द्यनुसार त्यांचें सशास्त्र खंडन करून दाखविलेलें आहे " ‡ असा स्पष्ट खुलासा केला आहे. यानंतर कृष्ण प्रभाकरशास्त्री साठे यांनीं श्रीकाशीक्षेत्रस्थ पंडितांनीं गीर्वाण भाषेत लोकोपकारार्थ केलेल्या 'पुनर्विवाहनिषेध ' या ग्रंथाचें मराठी भाषांतर केले. इ. स. १८७० त रत्नागिरीस यथार्थवर्णनसूचक यानें बाळशास्त्री आगाशे यांच्या साह्यानें ' विश्वस्तोद्वाहकालिका ' या नांवाचा ग्रंथ लिहिला. याच वर्षी पुण्यास पंचासमक्ष दोन्ही पक्षांत जो वादविवाद झाला, त्याचा निर्णयहि

---

† विधवाविवाह पृ. ७४–७६

‡ प्रस्तावना–विधवाविवाहखण्डन

पुनर्विवाह पक्षाला अनुकूल असा नव्हता. या वादाचे विस्तृत माहिती-पत्रक प्रसिद्ध झालें आहे. बाळकृष्ण लक्ष्मण बापट याच्या ग्रंथांतील दोन उतारे खालीं देत आहे.

" साधारणतः जे विलायती ( म्हणजे इंग्रजी ) तें सर्वोत्कृष्ट आणि तद्भिन्न ते निंद्य " असे बहुत नवीन विद्वान लोकांच्या मनात दिवसोंदिवस बिंबत चालले आहे. आणि यद्यपि यांत अंशतः सत्यता आहे तथापि मिथ्याभावही तितकाच आहे. परंतु सारासार विचाराकडे विशेष लक्ष न देतां " इंग्रजी " हें ज्यास सामान्यतः विशेषण प्राप्त झाले आहे अशाचा हल्लीं विशेष खप होत चालला आहे; आणि त्या माळेपैकींच पुनर्विवाह हे एक रत्न होय असें दिसतें. हा व स्त्रीशिक्षणादि दुसऱ्या गोष्टी विचारार्ह व आपल्या लोकांत चालू करण्यास अयोग्य असें सर्वथैव म्हणणें नाहीं. परंतु साम्प्रत या कोणत्या दिशेकडून येऊन एतद्देशीय प्राकृत विद्वज्जनाच्या सदय अंतःकरणांत प्रविष्ट झाल्या आहेत व त्याकडे इतके प्रेम कोणत्या हेतूस्तव लागत चालले आहे याच्या मूळाकडे मात्र पहाणे आहे."‡

" येणेंप्रमाणे ' शास्त्रोक्त विधवाविवाहाचे ' सशास्त्र खंडन झाले. सबब हे ' सशास्त्र आहे म्हणून तुम्ही करा ' असे तूर्त विद्यासागरांच्यानें लोकास म्हणता येत नाहीं. आणि यद्यपि विद्यासागरांनीं अगर अन्याने त्या ग्रंथाचे पुनः मंडन आरंभिलें तथापि कोणी तरी पुनः खंडनार्थ कंबर बांधील यात शंका नाहीं. कारण कोणास हे आवडत असेल व कोणास नसेल, सबब शास्त्राच्या महाघोटाळ्यांत पडून तडीस पोचण्याची कोणीही आशा बाळगूं नये. तर सर्व श्रुतिस्मृति पक्क्या वेष्टनात बांधून ठेवून ज्यांच्या अंगीं सामर्थ्य असेल त्यानी या कृत्यास आज

‡ विधवाविवाहखण्डन—उपोद्घात पृ. ३–४

आरंभ करावा. हाच एक मार्ग राहिलेला आहे. म्हणजे जशा आपल्या लोकात शेंकडो प्रत्यक्ष शास्त्राविरुद्ध चाली यथाशास्त्र होऊन गेल्या आहेत त्याच रीतीने विधवाविवाहही कालांतराने त्यांच्या मालिकेंत बसेल हे खचित आहे. आणि जो कोणी समर्थ पुरुष पुढें येऊन या महत् कृत्यास अनुकूल होईल त्यास वैधव्य-दुःखाग्नीने होरपळून गेलेल्या बालविधवांस द्वितीयसंबंधसुख-रसाने, संजीवित शांत, व जन्मभर सुखी केल्याचे श्रेय येईल यांत तिलप्रायही संशय नाही. ”†

इ. स. १८४८ त लोकहितवादी यांनी ‘ लहानपणच्या लग्नापासून अडचणी ’ हे पत्र प्रसिद्ध केले. त्यात त्यांनीं बालविवाहामुळे होणारे दुष्परिणाम दाखवून दिले आहेत. “ लहानपणीं बापानीं आपले मुले शाहाणी केली तर कितीएक चागली निघतील आणि लग्न हे केव्हां तरी त्याचें स्वसामर्थ्याने घडेल; परंतु मुलास रोजगार धंदा नाहीं, शाहाणपण नाही, व पुढें कसा निघतो त्याचा अंकूर दिसत नाही तो त्याचे गळ्यात मुलगी बांधून जोखिमात घालावा व त्याची विद्या, आयुष्य सर्व बुडवावें यात काय लाभ होतो ? ”* अशा तऱ्हेची त्यांची विचारसरणी होती याशिवाय अन्य पत्रांतहि त्यांनीं ह्या विषयाचा उहापोह केला आहे, आणि त्याबरोबरच जरठकुमारीविवाहाच्या अमानुष चालीवर कोरडे ओढले आहेत. मराठी ज्ञानप्रसारक मासिकातहि ह्या विषयावर एकदोन लेख प्रसिद्ध झाले होते.

**बालविवाह**

---

† विधवाविवाहखण्डन पृ. ९९

* लोकहितवादी--निबंधसंग्रह ( नं. २ ) पृ. ८

नंतर विष्णुशास्त्री पंडित यांनीं ' एक स्वदेशहितेच्छु ' या नांवाने इ. स. १८६४ त ' ब्राह्मणकन्याविवाहविचार हे पुस्तक लिहिले. त्यात प्रौढविवाहाचें सशास्त्र समर्थन केले आहे. त्यांतील लहानसे दोन उतारे खाली उद्‌धृत करितो.

**ब्राह्मणकन्याविवाहविचार**

" महान महान विचारी व दूरदर्शी अशा आपल्या शास्त्रकर्त्यांनीं ज्या लोकानी अज्ञानतमांत न चाचपडावे म्हणून ढळढळीत शास्त्रदीपक लावून जिकडे तिकडे अक्षय प्रकाश पाडला आहे, ते लोक आपले डोळे घट्ट झाकून अंधारात ठेचा खात चालले आहेत. " खोट्या खड्यास चमक अधिक " या म्हणी प्रमाणे वडिलांच्या चाली खऱ्या शास्त्रार्थापेक्षा अधिक तेजस्वी होऊन बसल्या आहेत. त्यामुळे एखाद्याने सर्व शास्त्रास संमत पण या चालीस यत्किंचित् विरुद्ध असे काही लिहिले म्हणजे त्याच्या कपाळी पहिला डाग हाच कीं, हा लिहिणारा सुधारलेला आहे, नास्तिक आहे याचा लेख वाचूं नये. तर अशा प्रकारचे दोष देणारास आम्ही इतकेच सांगतो की हा समज आपल्या पूर्वजाचा असता तर नास्तिक ग्रंथाचीं त्यांनी केलेलीं हजारो हजार खंडनें आपल्या दृष्टीस पडतीं काय हे मनांत आणा आणि जें काय कोणी लिहील ते फुरसतीप्रमाणे वाचून पाहा. " †

" विवाहसंस्कार हा स्त्रीपुरुषांमध्यें शास्त्रविहित एक संकेत अथवा करार आहें असें विवाहप्रयोग साकल्येकरून पाहातां खचीत मनात येते, कारण करारास ज्या प्रकारच्या गोष्टींची आवश्यकता आहे त्याचप्रकारच्या गोष्टी त्या प्रयोगांत बहुत

† प्रस्तावना--ब्राह्मणकन्याविवाहविचार

आढळतात. यात स्त्रीपुरुष या उभयतांचा संबंध उभयताच्या संबंधाचे हेतु, उभयतांनी परस्परांशी कसे वागावे इत्यादि गोष्टींचा उल्लेख फार व्यक्त रीतीने केला आहे. आणि तो उभयतांपैकी कोणा एकानेंहि मोडूं नये, यास्तव प्राचीन सांप्रदायाप्रमाणे शपथा घेतल्या आहेत व साक्षीहि ठेविले आहेत, आणि कितीएक मुख्य मुख्य गोष्टींचा उच्चार त्या कायम असे दाखविण्यासाठीं त्रिवार केला आहे. व्यवहारातील दुसरे कोणतेहि करार अथवा त्यातील काही अंश मोडिल्यास स्मृतींत ज्याप्रमाणे शिक्षा सांगितल्या आहेत त्याप्रमाणे विवाहरूप संकेत किंवा त्याचा एखादा अंश मोडल्यास मोडणारास यथायोग्य प्रायश्चित्त सांगितलें आहे. सामान्य करारनाम्यापेक्षा यात आणखी विशेष हा आहे कीं, हा त्याजप्रमाणे अगदी सहज अथवा क्षुल्लक कारणाने मोडण्यासारखा नाही.

अशा प्रकारचा परस्परांशीं परस्पराचे बंधन करणारा करारनामा करण्याविषयीं स्त्रीपुरुष या उभयपक्षाची पूर्ण इच्छा असली पाहिजे आणि ती इच्छा ती उभयता जाणत्या वयात आल्यानंतर झालेली पाहिजे. कारण अज्ञान स्थितींत असणाऱ्या लोकांनीं केलेला करारनामा त्यांस बंधनभूत होईल असे कोणत्या लोकात मान्य होणार आहे.?"†

**अस्पृश्योद्धार**

लोकहितवादी यांचे हरिजनाविषयींचे विचार त्याच्या अंतःकरणाची साक्ष पटवितात. ते एका पत्रात म्हणतात " ब्राह्मण महाराची निंदा करितात. त्यास शिवत नाहींत. व इंग्रजाजवळ प्रीतीने बसतात. हे पाहून मला आश्चर्य वाटते.

† ब्राह्मणकन्याविवाहविचार पृ. २६–२७

शास्त्राप्रमाणे पाहिले असतां महार बरे परंतु इंग्रजाचे मंडळींत ब्राह्मण असू नयेत. " † लोकहितवादीप्रमाणेच जोतिबा फुले यांनींहि आपल्या दलित-बांधवाच्या उद्धारासाठी कळकळीने प्रयत्न केले. त्यानीं महारमांगादि अति-शूद्रासाठीं एक स्वतंत्र शाळा चालविली होती.

**परदेशगमन**

परदेशगमन निषिद्ध मानल्यामुळे आपल्या लोकाच्या साहसप्रियतेला आणि पराक्रमाला ओहोटी लागली होती. सहा हजार मैलांवरून येऊन इंग्रज लोकानीं येथ राज्य स्थापिलें पण तेवढयानेंहि आमच्या लोकांचे डोळे उघडले नाहींत. विलायतेस जाण्यात पाप आहे ही समजूत कायमच होती. यासंबंधी मधूनमधून चर्चा होत असे. इ. स. १८७२ त विष्णुशास्त्री पंडित यानी ' द्विजानी नावेतून विलायतेस जाणें निर्दोष आहे. ' या विषयावर एक व्याख्यान दिले आणि ते पुस्तकरूपाने प्रसिद्ध केले.

**जातिभेद आणि वर्णव्यवस्था**

जातिभेद आणि वर्णव्यवस्था याविषयी लोकहितवादी यांनीं तीनचार पत्रें प्रसिद्ध केलीं.श्रमविभागाच्या दृष्टीनें करण्यांत आलेली चातुर्वर्ण्यव्यवस्था त्यांना तत्वतः संमत होती. ते म्हणतात, " प्रत्येक मुलखांत चारी वर्ण आहेतच. याशिवाय तर कोठेहि चालावयाचे नाहीं....परंतु अंतर इतकेंच आहे कीं, अन्य देशांत हे धर्म परंपरा चालत नाहीत. वाणी आहे आणि त्याचा मुलगा बुद्धिमान निघाला तर तो पंडितामध्ये जातो आणि पंडिताचा मुलगा मूर्ख निघाला तर तो चाकरांत जातो. अशा रीतीनें हे चारी वर्ण सर्व देशात आहेत. परंतु हिंदुस्थानात त्यांचीं वेगळालीं कुळेच झालीं आहेत. आम्हांस वाटतें

---

† लोकहितवादी–निबंधसंग्रह ( नं. ६४ ) पृ. ३०१

कीं पूर्वी जातींत फेरफार होण्याची चाल असे. रावण ब्राह्मणाचा मुलगा परंतु दैत्य झाला; कारण तो महादुष्ट होता. ''* खरें पाहिले तर चालू काळांत चाऱ्ही वर्णांच्या लोकांनी उच्चनीच भाव मनातून काढून टाकला पाहिजे कारण " सांप्रत जितके लोक हिंदुस्थानांत आहेत तितक्यांचा एक वर्ण मला दिसतो कीं ते सर्व शुद्र आहेत. इतर वर्णांची नांवे मात्र घेतात परंतु त्यांचे गुण व कर्म नाही '' † जातीजातींतील वैमनस्य नाहीसे करून पोटजातींत तरी सर्रास विवाह चालू करावे असे आपले मत त्यांनीं दोनतीन पत्रांत प्रगट केले आहे.

**जातिभेदविवेकसार**

इ. स. १८६१ त तुकाराम तात्या पडवळ यानीं आपल्या दोनतीन मित्रांच्या साह्याने 'जातिभेदविवेकसार' हा ग्रथ लिहिला आणि 'एक हिंदू' या नांवाने प्रसिद्ध केला. चार वर्षांतच या ग्रंथाची दुसरी आवृत्ति निघाली. या आवृत्तीच्या प्रस्तावनेत त्यांनी आपला ग्रंथरचनेचा उद्देश स्पष्ट शब्दांत सागितला आहे. " ज्या शोधांचा लाभ या ग्रंथकर्त्यास झाला आहे ते शोध आपल्या स्वदेशीयांस सांगून त्यांस या जातिभेदामुळें प्राप्त झालेल्या नीचत्वापासून मुक्त करण्यापेक्षा दुसरे कोणतेहि धर्मसंबधी कार्य साधावयाचें नाही. त्यास वाटते की हिंदुजन जीं संसारांत दुःखे भोगितात त्या, किंबहुना सर्व दुःखाचे मूळ हा जातिभेद आहे. म्हणून तो या अशा नाशकारी भेदाचा उच्छेद करण्यास प्रयत्न करीत आहे. ''

---

* लोकहितवादी–निबंधसंग्रह ( नं. २२ ) पृ. ८५–८६

† लोकहितवादी–निबंधसंग्रह ( नं. २३ ) पृ. ९२.

**जोतिबा फुले**
**( इ. स. १८२७–१८९० )**

लक्षावधि ब्राह्मणेतराना ब्राह्मणांच्या बौद्धिक गुलामगिरीतून मुक्त करण्या-साठी जोतिबा फुले यांनी आटोकाट प्रयत्न केले. हलक्या मानल्या गेलेल्या जातींतलि लोकांना आपल्या सामाजिक हक्कांची जाणीव झाली म्हणजे ब्राह्मणाचें प्रस्थ आपोआपच कमी होईल याबद्दल त्यांना पूर्ण खात्री होती. 'भटांची' कारवाई उघडकीस आणण्यासाठीं त्यांनीं 'ब्राम्हणाचे कसब' ( इ. स. १८६९ ) व 'गुलामगिरी' ( इ. स. १८७३ ) ही दोन पुस्तकें प्रसिद्ध केलीं. आपल्या चळवळीला संघटित स्वरूप प्राप्त व्हावें म्हणून त्यानीं इ. स. १८७३ त सत्यशोधक समाजाची स्थापना केली. शेकडों वर्षेपर्यंत दडपल्या गेलेल्या अज्ञानी जनतेच्या वतीने ब्राह्मण-शाहीशीं झगडण्याच्या कार्याला त्यानी आपले आयुष्य वाहिलें होतें. त्यांच्या विचारसरणीत जळजळीत ब्राह्मण–द्वेष आणि शास्त्रशुद्धतेचा अभाव हे दोन दोष प्रामुख्याने आढळतात. तरी पण त्याच्या मनाची तळमळ, त्यांचा स्वार्थत्याग, आपल्या मतांचा प्रचार करण्यांत त्यांनीं दाखविलेले धैर्य,मागास-लेल्या जातीच्या उन्नतीसाठीं त्यांनीं सोसलेले कष्ट इत्यादि गोष्टी लक्षांत घेतल्या म्हणजे त्यांच्या मोठेपणाबद्दल कोणालाहि शंका राहाणार नाहीं. स्वकीयांकडून काडीचेहि उत्तेजन मिळाले नाहीं; त्यांचा जाच मात्र सहन करावा लागला. उलट मिशनऱ्यांनीं जोतिबांच्या कार्याचें कौतुक केलें; त्यांना थोडीफार मदतहि केली. यामुळें त्यांच्या आचारविचारांवर मिशनरी लोकांची छाप पडलेली दिसली तर त्यांत कांहीं नवल नाहीं. जोतिबाचा जन्म इ. स. १८२७ त पुणें येथें फुलमाळी जातींत झाला. अनेक अड-चणी सोसून त्यांनी आपलें शिक्षण पुरे केलें. सरकारी नोकरीच्या मोहांत न पडतां त्यांनीं समाजसेवेचा ग्वडतर मार्ग स्वीकारला. इ. स. १८४८

त त्यांनीं पुणें येथें मुलींची शाळा काढिली. त्यानंतर महारमांगांसाठींहि त्यांनीं एक स्वतंत्र शाळा चालविली होती. इ. स. १८६३ त त्यांनीं जननिंदेची पर्वा न करतां ‘ बालहत्याप्रतिबंधगृहा ’ सारखीं उपयुक्त संस्था स्थापन केली. त्यानंतर इ. स. १८७३ त सत्यशोधक समाजाची स्थापना करून त्यांनीं ब्राह्मण-ब्राह्मणेतर चळवळीला तोंड फोडलें. ‘ शिवाजीचा पवाडा, ’ ‘ गुलामगिरी ’ ‘ शेतकऱ्याचा असूड ’ ‘ सार्वजनिक सत्यधर्म ’ इत्यादि पुस्तकें त्यांनीं प्रसिद्ध केलीं व ‘ दीनबंधु ’ नामक वर्तमानपत्रहि काढिलें. अशा रीतीने दीनदुबळ्यांचा कैवार घेऊन झगडणारा हा थोर पुरुष इ. स. १८९० त दिवंगत झाला. त्यांच्या ‘ गुलामगिरी ’ पुस्तकांतील एक उतारा खाली देत आहे.

“ अरे कित्येक घरंदाज अज्ञानी शूद्राचीं घराणीं इर्षेस पेटून एकमेकांशीं लढत असतां, आतून या कलमकसायांसहित दुसऱ्या भटकामगारांचीं घरें शेकारता शेकरतां धुळीस मिळाली नसतील काय? अरे या कसायाच्या नारदशाईमुळें मुलकी, फौजदारी, आणि दिवाणी खात्यांत अतोनात खर्च फुगून त्यांतील बहुतेक कारकून मामलेदारासहित चिटणीसांनीं आपल्या “ तत्सवितुर्वरेण्यं भर्गो देवस्य धीमहि धियो यो नः प्रचोदयात्” या अस्सल बीजमंत्रास हरताळ लावून त्याबद्दल “ चिरिमिरी देव चिरिमिरी देव ” या यवनी गायत्रीचा उपदेश त्या पवित्र भटमुल्लापासून त्यानीं घेतल्यामुळें भट वकिलांची दलाली वाढून ते मोठमोठ्या रथांत बसून पोळासारख्या डुरक्या फोडीत फिरतात कीं नाहीं? याखेरीज मुनसफनबाबांचे सरंजाम किती वाढले आहेत याची बेरीज घे. इतकाही बंदोबस्त असून गरीब लोकांस न्याय स्वस्ता पडून वेळेस तरी मिळतो काय? यामुळें खेड्यापाड्यांनींसुद्धां एक जगप्रसिद्ध म्हण पडली आहे, ती अशी कीं,

सर्व खात्यात ब्राह्मण कामगाराच्या हातावर अमुकतमुक केल्याशिवाय ते आमच्या गरीबाच्या कामास हातच लावीत नाहींत. “ त्याच्या डोमल्यावर घालावयास कांहीं तरी बरोबर घ्या तेव्हा बाहेर निघा.”†

जामेकर– लोकहितवादी– फुले– पंडितप्रभृति लेखकाचे वरील प्रयत्न सामाजिक दृष्ट्या अत्यंत महत्वाचे आहेत. लोकांच्या तात्कालिक विरोधाला न जुमानता त्यानी स्त्रीशिक्षण, पतितपरावर्तन, परदेशगमन, पुनर्विवाह, जातिभेद इत्यादि विषयावरील आपली मते निर्भीडपणे समाजापुढे मांडली, आणि म्हणूनच त्यापैकी कांहीं प्रश्न तरी आज आपल्याला अंशतः सुटल्यासारखे वाटतात.

---

† गुलामगिरी पृ. ८९–९०

# परिशिष्ट

## स्त्रीशिक्षण

१. स्त्रीविद्याभ्यासप्रकरण मुंबई इ. स. १८४१
२. स्त्रीविद्याभ्यास–बाबा पदमनजी इ. स. १८५२
३. स्त्रीविद्याभ्यासापासून लाभ–रामजी गणोजी
मुंबई इ. स. १८५२

## विधवाविवाह

४. पुनर्विवाहप्रकरण– मुंबई इ. स. १८४१
५. विधवाश्रुमार्जन–दादोबा पांडुरंग, मुंबई इ. स. १८५७
६. पाठारे परभू ज्ञातीत पुनर्विवाहाविषयीं घाटाघाट
मुंबई, इ. स. १८६३
७. विधवाविवाह–विष्णु परशुरामशास्त्री पंडित
मुंबई, इ. स. १८६५
८. विधवाविवाहखण्डन–बाळकृष्ण लक्ष्मण बापट
मुंबई, इ. स. १८६५

९. पुनर्विवाहनिषेध—कृष्ण प्रभाकरशास्त्री साठे,
मुंबई, इ. स. १८६५

१०. विधवाविवाहसंहारसार—सितारामपंत—रत्नागिरी
इ. स. १८६६ (ब्रि. म्यु.)

११. स्त्रीपुनर्विवाह सशास्त्र असल्याविषयीं पुणे व नासिक येथें वारंवार व्याख्याने दिलीं तीं. विष्णु परशुराम शास्त्रीपंडित
मुंबई, इ. स. १८७०

१२. विधवाविवाहाच्या अशास्त्रतेविषयीं निर्णयपत्र—पुणें
इ. स. १८७०

१३. विधवादुःखवर्णन—विनायक यशवंत बेरडे,
मुंबई, इ. स. १८७०

१४. विधवाविवाहाविषयीं व्याख्यान—रा. ब. मोरोबा कान्होबा
मुंबई, इ. स. १८७०

१५. स्त्रीपुनर्विवाहाचा अशास्त्रतेचा बोधक वाद—
इ. स. १८७०

१६. विधवाविवाहाविषयीं पुण्यांत झालेला वाद—
मोरोबा कान्होबा मुंबई, इ. स. १८७०

१७. विश्वस्तोद्वाहकलिका—यथार्थवर्णनसूचक (बाळशास्त्री आगाशे यांच्या साह्यानें) रत्नागिरी इ. स. १८७०

१८. विधवाविवाहखण्डनाचा साद्यंत इतिहास—दप्तरदार आणि बेडेकर, सातारा, इ. स. १८७१

(आवृत्ती २ री Revised by बा. ना. काशिकर)

## बालविवाह

१९. ब्राह्मणकन्याविवाहविचार –एक स्वदेशहितेच्छु
मुबई, इ. स. १८६४

## परदेशगमन

२०. आर्य लोकांच्या प्राचीन व अर्वाचीन रीति व त्यांची परस्पराशीं तुलना आणि द्विजांनी नावेतून विलायतेस जाणे निर्दोष आहे या विषयावर व्याख्यानें–विष्णुशास्त्री पंडित
मुंबई, इ. स. १८७२

## जातिभेद

२१. जातिभेदविवेकसार– एक हिंदु (तुकारामतात्या पडवळ) मुंबई इ. स. १८६१

२२. ब्राह्मणाचें कसब– जोतिराव फुले. मुंबई इ. स. १८६९

२३. ज्ञातिभेदावर सभाषण– (कुणबी लोकासाठी) सिदोबा बापुजी भिसाळ इ. स. १८७०

२४, गुलामगिरी– जोतिराव फुले. पुणें. इ. स. १८७३

## संकीर्ण

२५. हिंदुलोकांच्या रीतिसुधारणा–गोविंद नारायग, मुंबई इ. स. १८५१

---

# ६ इतिहास–चरित्रें

## १

## इतिहास

इंग्रजी राज्य स्थापन होण्यापूर्वी शास्त्रीय दृष्टीने यथार्थ इतिहास लिहिण्याची प्रथा महाराष्ट्रांत रूढ होती असे दिसत नाहीं. मुसलमानाच्या तवारिखा पाहून स्वकीयांचा वृत्तात लिहिण्याची मराठयाना प्रेरणा झाली आणि मराठी भाषेंत त्यांनीं आपल्या बखरी सजविल्या. या बखरींतून ऐतिहासिक घडामोडी आणि काल्पनिक वर्णने याच्या चमत्कारिक मिश्रणामुळे खरा इतिहास समजणे कठीण झाले आहे. " कोणतीहि बखर घ्या, तीत कालाचा विपर्यास झाला नाहीं असे क्वचित्च आढळेल. "* याशिवाय अतिशयोक्तीचें प्राबल्य, क्षुल्लक गोष्टींचा निरर्थक पाल्हाळ इत्यादि दोष आहेत ते निराळेच. महाराष्ट्राचा सुसंगत इतिहास लिहिण्यास प्रथमतः युरोपियन लेखकांनी आरंभ केला. अव्वल इंग्रजीतील महाराष्ट्रीय विद्वानांनीं या इतिहासांची भाषांतरे मात्र केली. स्वतंत्र रीतीनें इतिहासाचें संशोधन करण्याचा कोणीहि फारसा प्रयत्न केला नाहीं.

---

* वि. का. राजवाडे–ऐतिहासिक प्रस्तावना पृ. ३

# मराठ्यांचा इतिहास

**रघूजी भोंसल्याची वंशावळी**

इ. स. १८१६ च्या सुमारास श्रीरामपुर येथें ' रघूजी भोसल्याची वंशावळी ' या नावाचे एक लहानसें पुस्तक प्रसिद्ध झालें. त्यात बाबाजी भोसले यांच्यापासून भोसले कुळाचा वृत्तांत वर्णिला आहे. मराठी भाषेत छापलेला हा पहिलाच इतिहास–ग्रंथ होय. यांतील एक उतारा खाली देत आहे.

" त्या उपरी भेटीस शीवाजी राजे व संभाजी राजे व मुत्सद्दी ऐसे घेऊन रामसीह पादशहाचे भेटीस गेलेत्.अगोधर रामसीहानी व नीराजीपंत मजुरीयाचा राहारवेश उभे राहून करावा हे पढवीले होते. भेटीस तखतापुढे संनीध जाताच सलाम न करीता राहीले खान दवान त्याचे वर्ते जाउन पिता व पुत्र उभयता उभे राहीलेत. ते खुणेने रामसीहानें सागीतल परंतु सलाम न करीता मनामधे की तुर्कास सलाम करण उचीत् नाही.पादशाह शीवाजीस पाहून रुमाल मुखास् लाउन् हसूं लागलेत्. रामसीहाकडे पाहूं लागले. रामसीहानी सागीतल की महराटे यास राहारवेश ठाऊक नाहीं. तेच क्षणी रामसीहास आज्ञा केली जे उभयतास घेउन् जाणे. जात्या समयींही मजुरा केला नाही. पाठी पादशहाकडे करून चाललेत् लश्करात आपले डेऱ्यास् आलेत. "†

**मराठ्यांची बखर**

यानतर क्यापटन डेविड केपन यानी इ. स. १८२९ त बाबा साने याच्या साह्यान ' मराठयांची बखर ' लिहिली. हें पुस्तक ग्राट डफच्या इंग्रजी ग्रथाचें भाषातर आहे. ऐतिहासिक ग्रंथाची परिभाषा मराठेशाहीतच निश्चित झाली असल्यामुळें

† रघूजी भोंसल्याची वंशावळी. पृ. ५९

त्यावेळच्या इतर पुस्तकांच्या मानानें हें भाषांतर फार चांगलें उतरलें आहे. यांतील भाषा प्रौढ पण सुबोध आहे.

पुणें येथील सरकारी इंग्रजी शाळेतील विद्यार्थी कुशाबा लिमये याने इ. स. १८४० त दे. अ. इजदेलसाहेब यांच्या ग्रंथावरून 'महाराष्ट्र देशाचे वर्णन' लिहून प्रसिद्ध केले. इ. स. १८६६ त बाबा पदमनजी यांचा शाळाकरितां लिहिलेला 'महाराष्ट्र देशाचा संक्षिप्त इतिहास' छापला गेला.

**ग्रांट डफकृत मराठ्यांच्या बखरीवर टीका**

वर उल्लेखिलेले सर्व ग्रंथ भाषांतरात्मक आहेत, याचे कारण म्हणजे प्रत्येक गोष्टीत इंग्रजाच्या ओंजळीने पाणी पिण्याची तत्कालीन विद्वानांची प्रवृत्ति हेंच होय. इ. स. १८६७ त नीळकंठ जनार्दन कीर्तने यांनी पुणे कॉलेजांत शिकत असतांनाच 'ग्रांट डफकृत मराठ्याच्या बखरीवर टीका' हा निबंध लिहिला. त्यात ग्रांट डफच्या इतिहासांतील माहिती अपुरी असून कित्येक ठिकाणीं चुकीचीहि आहे असे दाखविले आहे. हा निबंध लिहून नीळकंठराव कीर्तने यांनीं भावी पिढीला आपल्या इतिहासाचा स्वतंत्र दृष्टीने अभ्यास करण्याचा कित्ता घालून दिला. यांतील एक उतारा खाली सादर करीत आहे.

> "महाराष्ट्रांचे नाव पुराणांमध्ये अगदीच निघत नाही असे नाही. या देशात सीतेच्या स्नानाने परिपूत झालेले निर्झर वाहात आहेत व रामायणात ज्या ऋषींची नांवें सांपडतात त्यांतील कित्येक परम विख्यात ऋषींचे आश्रमही याच देशात होते. पुराणांत अशी दंतकथा आहे कीं, हा देश (ज्यास पूर्वी दंडकारण्य असे म्हणत असत) रावणाचे राज्याखालीं होता; व

त्यानें आपल्या घडशास म्हणजे वाजंत्र्यास बक्षीस दिला असेही आहे. हें वर लिहिले याचे प्रसंगानें हे म्हणण्यास मूळभूत जो रामायण ग्रंथ याविषयीं साप्रत विद्वानांचे जे मत आहे व त्या मतास दृढ करणारीं जीं कारणे आहेत, तीं सर्व येथें सागण्याचे प्रयोजन नाहीं; परंतु इतकेच सांगतो कीं, रामायणांतील मूळ कथा खचित घडली असावी, व राक्षस म्हणून ज्यास म्हटले आहे, ते कोणी तरी अफगाण, ज्यास मराठे लोक गिलचे असे म्हणतात, त्याप्रमाणे शरीरानें धिप्पाड व क्रूर असावे, व रामानें वानराची सेना केली यातील तात्पर्य रामानें रानटी लोकांची एक सेना केली असे असावे असे बहुताचें मत आहे. याविषयीं जास्त माहितीची ज्यास अपेक्षा असेल त्यानें एका बंगाली विद्वानानें रामयणावर ·सर्वमान्य कलकत्ता रिव्ह्यू या नावाच्या मासिकपत्रात जी टीका केली आहे ती पाहावी. या गोष्टीचा शक कोणता होता हें माहीत नाहीं. याविषयीं शुष्क तर्क फार आहेत."†

## मराठेशाहीतील सरदार घराण्यांचा इतिहास

इ. स. १८६२ च्या सुमारास लोकहितवादी यानीं 'इंदुप्रकाश' पत्रांत

**लोकहितवादी**

मराठेशाहींतील भोसले, शिंदे, होळकर, गायकवाड इत्यादि घराण्यांची संक्षिप्त माहिती लेखरूपानें प्रसिद्ध केली. त्याचा इतिहासाचा व्यासंग फार दांडगा होता. त्याच्या चौकस व मेहनती स्वभावामुळे त्यानी मराठ्याच्या इतिहासाची बरीच बारीकसारीक माहिती मिळविली होती.

---

† ग्राड डफकृत मराठ्याच्या बखरीवर टीका पृ. १४–१५

**विष्णु गोपाळ भिडे**

भोर संस्थानचे चिटणीस विष्णु गोपाळ भिडे यांनीं इ. स. १८६६ त 'सातारचे श्रीमंत छत्रपति शिवाजी महाराज यांचे वंशाचा व प्रतिनिधी आणि अष्टप्रधान यांचा इतिहास' लिहिला. हा ग्रंथ सातारचे दमरांतील खात्रीलायक माहिती वरून व दुसऱ्या अनेक दाखल्यावरून तयार केला आहे. अस्सल कागद-पत्रांच्या आधारें ऐतिहासिक ग्रथ रचण्याचा मराठी भाषेतील हा पहिलाच प्रयत्न होय. खालील उताऱ्यावरून या ग्रंथाची ढब लक्षात येईल.

> " शिवाजी महाराज मोठे विलक्षण चतुर पुरुष होते; त्यांचें शौर्य त्यांचे सदरचे पराक्रमावरून किती होते हें समजतेच व प्रसंगानुसार अनुसरून स्वकार्य साधण्याची मोठी दक्षता होती. मिजास अगदी नसून कजाखी सोसण्याचा मोठा अभ्यास होता. द्रव्याचा व्यय उदारपणे धर्मादि सत्कर्मास करण्याची मोठी आवड होती. अंतःकरण त्याचे निरंतर सदय असून सर्वाभूतीं दया होती. त्यांणी ब्राह्मणाचे व प्रजेचे पालन उत्तम प्रकारे केलें. भगवद्भक्तीविषयीं मोठी निष्ठा व गुरुसेवेच्या ठायीं अति आदर. त्यांस पूर्वी साक्षात्कार झाला होता, हे मागे लिहिलेंच आहे व ज्या पुरुषावर श्रीरामदासस्वामीची व श्रीभवानी देवीची पूर्ण कृपा होती. साराश असा पुरुष दोनशे वर्षांत झाला नाही व पुढे होणे कठीण.''‡

**जगन्नाथ प्रभाकर सरंजामे**

इ. स. १८७२ त जगन्नाथ प्रभाकर सरंजामे यानी 'शिंदे अलिजाबहादूर ह्याचे घराण्याचा इतिहास' प्रसिद्ध केला. " माल्कम, ग्रांट डफ, मरी " वगैरे साहेब लोकांनी जे इतिहास लिहिले आहेत, त्यांच्या आधाराने मुख्यत्वेकरून हा

---

‡ सातारचे श्रीमंत छत्रपति शिवाजी महाराज यांचे वंशाचा व प्रतिनिधी आणि अष्टप्रधान याचा इतिहास. पृ. ४५

इतिहास लिहिला आहे. अस्सल मराठी कागदपत्रावरून इतिहास तयार करण्याचा विचार होता, पण भरपूर साहित्य मिळाले नाहीं यामुळें वरील लेखकांचें सहाय्य घ्यावें लागलें असें ग्रंथकारानें प्रस्तावनेत म्हटलें आहे.

## हिंदुस्थानचा इतिहास

**बाळशास्त्री जांभेकर**
**( इ. स. १८१०-४६ )**

बाळशास्त्री जाभेकर यानीं इ. स. १८४६ त एलफिन्स्टन साहेबाच्या इतिहासाचा साराश मराठींत लिहून पुस्तकरूपाने प्रसिद्ध केला. हे पुस्तक मुख्यतः शाळेतील विद्यार्थ्यांच्या उपयोगाकरिता तयार केलें आहे. त्याच्या प्रस्तावनेंत स्वदेशाच्या इतिहासाचें ज्ञान किती उपयुक्त आहे ते सागितले आहे. ह्यानंतर त्यानी लिहिलेला ' हिंदुस्थानातील इंग्लिशाच्या राज्याचा इतिहास ' हा ग्रथ शुद्ध करून मेजर कँडी यांनी इ. स. १८४९ त छापला. बाळशास्त्री जांभेकर हे तत्कालीन विद्वानांचे मुकुटमणी म्हणून गणले जात. त्यांनी महाराष्ट्रांतील शिक्षणप्रसाराच्या कार्याला आणि मराठी गद्यवाङ्मयाच्या वाढीला सहाय्य केलें. "बाळशास्त्री हे मूळचे राजापूर प्रांतीं पोबुर्ले गांव आहे तेथील राहणार." त्यांचा जन्म इ. स. १८१० त झाला. त्यांचे वडील चांगले व्युत्पन्न भिक्षुक होते. त्यांनीं आपल्या मुलास चांगली काव्यव्युत्पत्ति करून दिली होती. ' बापू छत्र्याच्या सांगण्यावरून गंगाधरशास्त्री यांणीं आपला मुलगा बापूकडेस इंग्रजी शिकण्याकरितां ठेविला. त्यांहीं त्या मुलाची अल्पवयांत थोर बुद्धि पाहून त्यास सोसायटीच्या इंग्रजी शाळेंत अभ्यासाकरिता ठेविलें. दिवसास इंग्लिश शिकावे व संध्याकाळीं आमचे गुरु बापूशास्त्री शुक्ल याच्या बिऱ्हाडीं कौमुदीची पोथी घेऊन तेथे पढावयास जावें.........ते मुंबईस आल्यावर प्रोफेसर आर्लिबार यांजपाशीं गणितशास्त्र शिकले."* बाळशास्त्री यांची कुशाग्रबुद्धि पाहून प्रोफेसरसाहेब त्यांची तारीफ करीत असत. ह्यानंतर एल्फिन्स्टन

* दादोबा पांडुरंग—आत्मचरित्र पृ. २२

विद्यालयांतील उपगुरूच्या जागी त्यांची नेमणूक झाली होती. भाऊ महाजन यांच्या साह्यानें बाळशास्त्री यांनीं ‘ दर्पण ’ या नांवाचे वर्तमानपत्र व ‘ दिग्दर्शन ’ या नावाचे एक मासिक चालविलें होतें. मराठी भाषेत त्यांनीं हा नवीनच उपक्रम केला. त्याच्या लिहिण्यावर संतुष्ट होऊन त्यावेळचे गव्हर्नर सर जेम्स कॉरनॅक यांनी त्याना ‘ जस्टिस ऑफ दि पीस ’ ही पदवी दिली. शास्त्रीबुवास मराठी, संस्कृत, इंग्रजी, लॅटिन ह्या चार भाषा चांगल्या येत होत्या. त्याचे ‘भूगोलविद्या’, ‘नीतिकथा’, ‘सारसंग्रह,’ ‘ भास्कराचार्यावरील निबंध, ’ ‘ हिंदुस्थानचा इतिहास ’ इत्यादि ग्रंथ प्रसिद्ध आहेत. त्यांनी नियतकालिके, शुद्धिकरण आणि विधवाविवाह या तीन प्रमुख चळवळी महाराष्ट्रांत सुरू केल्या. इ. स. १८४६ त त्यांचा अकाली अंत झाला. त्यांच्या ‘ हिंदुस्थानातील इग्लिशाच्या राज्याचा इतिहास ’ या ग्रंथांतील एक उतारा खाली देत आहे:—

“ इंग्लिश लोक प्रथम हिंदुस्थानात व्यापाराकरिता आले, त्याचा राज्ये घेण्याचा बेत आरंभी नव्हता; आणि मूळापासून कंपनी व पार्लमेंट ह्याजकडून कामगारांस हुकूमही वारंवार निक्षून तसेच येत होते. परंतु व्यापाराचे सोईकरिता व वखारीच्या रक्षणाकरिता पाहिल्याने· बंदराच्या सभोवताली काही आपली सत्ता असावी असें त्यांस वाटले. पुढे त्यास ज्यानी उपद्रव केला, त्याचे पारिपत्य करून त्याचा काही मुलूक घेतला; व ज्यास इंग्लिशांनीं मदत केली, त्यानी त्यास संतोषाने काहीं मुलूक दिला. त्या मुलकाच्या बचावाकरितां फौजा ठेवणें प्राप्त झालें; त्याचा खर्च निभेना म्हणून मुलकातील संस्थानिकांचे रक्षण कर· ण्याचे कबूल करून व आपले फौजेपैकी कांही फौज त्यांजवळ ठेवून तिच्या चरितार्थाकरितां त्यांजकडून ते द्रव्य घेऊं लागले. तें द्रव्य ठरावलेल्या मुदतीस येईना, म्हणून त्या संस्थानिकाचे तालुके

आपणाकडे लावून घेत चालिले; त्यामुळे इंग्लिशाची गणना हिंदु-स्थानांतील संस्थानिकांत झाली.”†

**हिंदुस्थानाच्या इतिहासा-वरील निरनिराळे ग्रंथ**

इ. स. १८५१ त ‘ शब्दालंकार ’ या पुस्तकाच्या कर्त्यानें ‘ भरत-खंडपर्व ’ या नावाचा एक लहानसा इतिहास-ग्रथ लिहिला त्यात भारतवर्षाच्या इतिहासाचे पौराणिक, प्राचीन व अर्वाचीन असे तीन कालखड पाडून त्यामधील मुख्य मुख्य गोष्टींचें थोडक्यात वर्णन केले आहे. हे पुस्तक स्वतंत्र रीतीनें लिहिले असले, तरी अगदींच संक्षिप्त असल्यामुळे ऐतिहासिक माहितीच्या दृष्टीने त्याला फारसें महत्त्व नाहीं. यानंतर मरे, एल्फिन्स्टन, मॉरिस वगैरे इतिहासकाराच्या इग्रजी ग्रथांचीं भाषांतरे प्रसिद्ध झालीं. “ Of the fourteen which relate to India, the translations of Elphinstone's andMurray's histories, and of Grant-Duff's Maratha history, are the only ones which possess any literary merit ” ‡ या न्यायमूर्ति रानड्याच्या अभिप्रायावरून मरे व एल्फिन्स्टन यांच्या इतिहास-ग्रंथाची भाषांतरें सरस वठली आहेत हे उघड होतें. इ. स. १८५९–६० मध्ये नरसिंह विनायकशास्त्री ओक यांनीं मरेकृत हिंदुस्थानच्या इतिहासाच्या पहिल्या दोन भागांचें मराठींत भाषां-तर केलें. त्यानंतर इ. स. १८६१ त विष्णुशास्त्री पंडित यांनी या ग्रंथाच्या तिसऱ्या भागाचे भाषांतर प्रसिद्ध केले. ह्याशिवाय या काळात हिंदुस्थानाच्या इतिहासावर आणखीहि अनेक भाषांतरित व आधाररचित ग्रंथ तयार झाले.

---

† हिंदुस्थानांतील इंग्लिशांच्या राज्याचा इतिहास. पृ. ९०–९१

‡ **M. G. Ranade**–‘ *Remarks on the Marathi Catalogue* ’

**विश्वनाथ नारायण मंडलीक (इ. स. १८३३–८९)**

विश्वनाथ नारायण मंडलीक यांनी इ. स. १८६१-६२ त एल्फिन्स्टनच्या इतिहासाचे भाषांतर प्रसिद्ध केलें. हा ग्रंथ विस्तृत आणि माहितीच्या दृष्टीने अत्यत महत्वाचा आहे. विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनीं या ग्रंथांतील भाषेच्या अशुद्धतेबद्दल त्यावर कडक टीका करून त्यांतील दोषस्थळे दाखविलीं आहेत. मंडलिक याचा जन्म इ. स. १८३३ त झाला. नवव्या वर्षी त्यांचे मराठी शिक्षण पुरे झाले. मुंबई येथील एल्फिन्स्टन विद्यालयांत त्यांचे इंग्रजी शिक्षण झाले. “ सुमारें बारा वर्षे अनेक सरकारी हुद्यांवर नोकरी केल्यानंतर वकिलीची परीक्षा देऊन ते हायकोर्टांत वकिली करूं लागले. ” थोड्याच अवधींत या धंद्यात त्यानीं चागला नावलौकिक मिळाविला. वक्तशीरपणाबद्दल त्याची फार प्रसिद्धी होती. त्यानी मराठी भाषेत ‘ सवयी आणि अभ्यास’, ‘ द्यूतवर्जक संवाद ’, ‘ एल्फिन्स्टनच्या इतिहासाचें भाषांतर’, ‘ हिंदू लोकाचा मध्यंतरीय अवस्थेविषयी विचार’,‘हिंदु-धर्मशास्त्र’ इत्यादि ग्रथ लिहिले. त्याचें विस्तृत चरित्र ग. रा. हवालदार यांनी लिहिले आहे.

**इ. स. १८५७ सालच्या बंडाचा इतिहास**

इ. स. १८५७ सालच्या बंडासंबधीं त्याकाळी मराठी भाषेत दोन पुस्तकें प्रसिद्ध झालीं. खंडेराव बाळाजी फडके यांनीं पुस्तकें, वर्तमानपत्रें व इतर माहिती यावरून एक टांचण तयार केले व त्याचे संक्षिप्त सार इ. स. १८६० त पुस्तकरूपाने प्रसिद्ध केलें. यात शेवटीं इंग्रजाना जय देऊन बंडाचा मोड केल्याबद्दल परमेश्वराचें अंतःकरणपूर्वक स्तवन केलें आहे. विनायक कोंड-देव ओक यानी इ. स. १८७४ त ‘ शिपायाच्या बंडाचा इतिहास’ या

नांवाचा ग्रंथ लिहिला. लोकांच्या बंडाविषयींच्या भ्रामक समजुती दूर करण्याच्या उद्देशाने ग्रंथकर्त्याने हे पुस्तक प्रसिद्ध केले आहे. ' हिंदुस्थान कथारस ' हा त्याचा दुसरा स्वतंत्र ग्रंथ त्यानी इ. स. १८७१ तच छापला. खंडेराव बाळाजी फडके यांच्या ' हिंदुस्थातील बड ' पुस्तकांतील एक उतारा सादर करितो

" मध्यहिंदुस्थानांत बंडवाल्यानी सरकाराशी टकरा दिल्या त्यात तात्या टोप्याप्रमाणे शूर दुसरा कोणी नसेल. त्याने सरकारी फौजेशीं पुष्कळ लढाया मारिल्या व पुष्कळ शिपायास जेर करून त्यावरील पुष्कळ आफिसराचे टाके ढिले केले. त्याचे धारिष्ट तर एवढे होते की, जनरल स्मीथ, जनरल मिचल, जनरल व्हाइट लाक, सर ह्यू रोस वगैरे फौजबंद ९ सेनापति पाठीशी लागले असता तो निर्धास्त आपली मंडळी शेदोनशे कोस मागे टाकून एकटाच नर्मदा नदी उतरून थेट दक्षिणेस वळून अशिरगडावर आला. वर्तुळाचा परिघासारिखे इंग्रजी सैन्य त्याचे सभोवार असून तो मध्यबिंदुसारखा आत होता व कधी कधी त्याचे अंतर कोसा दोन कोसाचेही टप्यात येत असे.परंतु कोणास त्यावर चालून जाऊन त्यास पकडण्याचा हिय्या झाला नाही. शेवटी तात्याचा अत्यंत जवळचा मित्र मानशिंग याने विश्वासघाताने तारीख ७ माहे एप्रिल सन १८५९ इसवी रोजी सिरोंग जंगलात त्यास पकडून मिड साहेबाचे स्वाधीन केले; नंतर त्यानी १८ वे तारखेस शिप्री येथें त्यास फाशी दिले."†

ह्याशिवाय शामराव मेरोजी यांची ' श्रीक्षत्रियवंशोद्गममाला ' गोविंद रावजी मांडे यांची 'हिंदुस्थानाची शकावळी' विठोबा सोनजी चव्हाण यांचा

† हिंदुस्थानातील बंड पृ. २७

‘ हिंदुस्थानांतील ऐतिहासिक कालक्रम ’ इत्यादि अनेक महत्वाचीं पुस्तके त्या काळांत प्रसिद्ध झालीं.

**हिंदुस्थानांतील अन्य प्रांत आणि संस्थानें यांचा इतिहास**

ह्या काळांत गुजराथ, मध्यहिंदुस्थान आणि गोमातक या प्रांतांचे इतिहास प्रसिद्ध झाले. क्यापटन आर्चिबाल्ड म्याकडोनल्ड यांनी इ. स. १८५० त जेम्स-बर्ड याच्या अल्ली महमदखान याच्या ग्रंथाच्या इंग्रजी भाषांतरावरून ‘ गुजराथ देशाचा इतिहास ’ लिहिला. विनायक जनार्दन कीर्तने यानी इ. स. १८७१ त मालकमच्या ‘ Central India ’ या ग्रंथाचे मराठांत भाषांतर केलं. इ. स. १८७३ त यशवंत फोंडबा नाईक दणाईत व रामचंद्र गोविंद वागळे यांनी ‘ गोमांतकाचा प्राचीन आणि अर्वाचीन इतिहास ’ लिहिला. याशिवाय अर्काट येथील रामचंद्रराव याचा ‘ टिपूसुलतानपदच्युति ’ ( इ. स. १८५० ) आणि विश्वनाथ कृष्ण याचा ‘ कोल्हापूर प्रांताचे वर्णन ’ ( इ. स. १८५० ) हे दोन ग्रंथहि प्रसिद्ध झाले.

**इंग्लंडचा इतिहास**

इ. स. १८३२-३४ साली मुंबईच्या शिक्षा मंडळीने इंग्लंड देशाची बखर दोन भागांत प्रसिद्ध केली. हा ग्रंथ बहुधा बाळशास्त्री जांभेकर यांनी लिहिला असावा असे वाटते, कारण हरि केशवजींनी आपल्या इंग्लंडाच्या वृत्तांतांत त्याचा उल्लेख * केला आहे. यानंतर नाना नारायण यांनी इ.स.१८३५ त मिस् बर्ड हिच्या इंग्रजी ग्रंथावरून ‘ इंग्लंड देशाचें वर्णन ’ लिहिले. त्यांत या देशांतील लोकांची स्थिति आणि व्यावहारिक नीति याचे कार्यकारणभावासहित विवरण केलं आहे. इ. स. १८३८ त हरि केशवजी यांनीं इंग्लंडाचा वृत्तांत हें

* इंग्लंडाचा वृत्तांत पृ. २७९

भाषांतरात्मक पुस्तक प्रसिद्ध केलें त्यात बापाने मुलांस पत्र-रूपाने इंग्लंडचा इतिहास निवेदन केला आहे, " त्या देशीचे लोक आता येथ राज्य करतात, ते शाहाणे व गुणी आहेत. याज-करितां येथील लोकांनीं त्यांचा वृत्तांत जाणून घ्यावा. ते जेणेंकरून इतक्या चातुर्यास व वैभवास पावले, त्या गोष्टी समजल्या असतां मोठ्या उपयोगी पडतील, याजकरितां तो वृत्तात मी थोडक्यात लिहावयास आरंभिला आहे. " असे हरि केशवजींनी ह्या भाषातराच्या प्रस्तावनेत म्हटलें आहे. या पुस्तकांतील एक परिच्छेद खाली उद्‌धृत करितोः—

"विलियम मोठा धैर्यवान, बुद्धिवान, अभिमानी, मसलती, क्रूर, खुनसी, बलात्कारी असा असे. आपला चहुंकडेस डंका वाजावा असे यास फार आवडे, याणे संग्रह करीत असावा, आणि ते डौल दिमाखाखाली उडवीत असावे. हा एकाएक उतावळीने कामास हात घाली खरा, परंतु संकटसमयी हा शात असे, विचार करी, आणि त्रासत नसे. नार्माडीकराच्या लेखांत असें आहे की, हा आठ फुटीवर उंच, याचे शरीर चांगले सुदृढ व अवयव सुशोभित असत; याचें धनुष्य याच्या दर्बारी लोकातील कोणासही वाकत नसे इतके याचे आगी बळ असे. हा थोडे बोले, आणि लान्‌फ्रयांक म्हणून जो क्यातर्बरीचा मुख्य धर्माध्यक्ष, त्यावाचून कोणाशीही प्रसन्नवदन नसे, हा सर्वास भयरूप व बहुतास त्रासरूप असतांही याने मोठी युक्ति करून आपल्या वंशास राज्य मिळे असें करून ठेविले, त्याप्रमाणें त्याचा वंश त्या राज्याचा उपभोग अजून करीत आहे. या पत्रात जे वर्तमान लिहिले आहे त्याचे चांगले मनन करून पुढे प्रश्न लिहिले आहेत त्यांची उत्तरं सागावीं. लो. हे. आशीर्वाद."‡

† इंग्लंडाचा वृत्तांत पृ. १३–१४

नाशिक येथील मिसेस फरार या ख्रिस्ती धर्मप्रचारिकेने इ.स. १८३५-३६ च्या सुमारास आशूरी ( Assyrians ), बाबेली ( Babylonians ), मेदी (medes ), पार्शी, ( Persians ) आणि ग्रेकी ( Grecians ) ह्या लोकाचे वृत्तात पुस्तकरूपाने वर्णिले. त्यानंतर बाळशास्त्री जाभेकर याच्या 'दिग्दर्शन' मासिकांत 'ग्रीस देशाचा इतिहास' प्रसिद्ध झाला होता. त्रैमासिक 'ज्ञानदर्शनात'हि ( इ. स. १८५४ ) युरोपखंडाच्या अर्वाचीन इतिहासाची देशवार माहिती दिली होती. याशिवाय भाऊशास्त्री पेठकर यानीहि मराठी ज्ञानप्रसारकांत (इ. स. १८५८–५९) 'ग्रीस देशाचा इतिहास' लिहिला होता.

**परराष्ट्रांचा इतिहास**

याखेरीज ग्रीस आणि रोम या देशाच्या इतिहासावर आणखीहि दोनतीन पुस्तके प्रसिद्ध झाली. शिवराम गणपतराव बाब्रस यांनी इ. स. १८७४ त 'फ्रेच आणि जर्मन लोकाच्या लढाईचा इतिहास' लिहिला.

जगाच्या सामान्य इतिहासावर या काळांत पाचसहा पुस्तके प्रसिद्ध झाली हरी रघुनाथ गाडगीळ यानीं मार्शमनच्या " Brief survey of History " या ग्रंथाचे भाषातर केले. हरी बळवंत जोशी याची 'इतिहासरूपदर्शिका' आणि जनार्दन बाळाजी मोडक यांचे 'जगाच्या इतिहासाचे सामान्य निरूपण' ( Outline of Universal History ) ही दोन्हीं पुस्तके बऱ्यापैकी आहेत.

**जगाचा इतिहास**

इंग्रजी भाषेतील इतिहास–ग्रथाची भाषातरे करून या काळातील लेखकांनी आपल्या देशबांधवांना हिंदुस्थानाच्या व जगांतील इतर देशाच्या इतिहासाची माहिती करून दिली. कीर्तने–भिडे–सरंजामे यानीं मात्र स्वतंत्र ग्रंथरचनेचा प्रयत्न करून स्वदेशाच्या इतिहासाविषयीं महाराष्ट्रांत आस्था उत्पन्न केली.

# २

## चरित्रें

**प्राचीन चरित्र ग्रंथ**

प्राचीन मराठी वाङ्मयांतील चरित्र-ग्रंथांची सख्या फार थोडी असून ते ग्रंथहि प्रायः पद्यमयच आहेत. त्यांतहि पराक्रमी पुरुषांच्या जीवनक्रमापेक्षा अद्‌भुत चमत्कारांनी भरलेल्या साधुसंताच्या चरित्राकडेच लेखकाचा जास्त कल दिसून येतो. महानुभावीय वाङ्मयांतील लीलाचरित्रादि ग्रंथ आणि मराठेशाहीतील ऐतिहासिक बखरी एवढेच काय ते मराठी भाषेंतील प्राचीन चरित्रात्मक गद्यग्रंथ होत. एकोणिसाव्या शतकाच्या आरंभीं इंग्रजी वाङ्मयाच्या संसर्गाने मराठी वाङ्मयात विलक्षण स्थित्यतर घडले आणि त्यामुळे लौकिक क्षेत्रातील थोर व्यक्तीची चरित्रे लिहिण्याची प्रवृत्तीहि वाढत चालली. चमत्काराचे प्रस्थ कमी होऊन सत्य आणि सभाव्य गोष्टीवरच भर देण्यांत येऊं लागला; तरीपण अद्‌भुताचा पगडा अजिबात नाहीसा झाला होता असे दिसून येत नाही. मराठी भाषेत सुरवातीला प्रसिद्ध झालेली चरित्रे ही इंग्रजींतील अगदी सामान्य ग्रंथांची भाषातरे होती; त्यामुळें चरित्रलेखन ही एक कला आहे याची आमच्या लेखकाना मुळीच कल्पना आली नाही. अर्थात् त्यावेळचे चरित्रात्मक स्वतंत्र वाङ्मयहि अत्यत निकृष्ट प्रतीचे उतरले असले तर त्यांत काही नवल नाही.

**स्वकीयांचीं चरित्रें**

कलकत्ता येथील फोर्ट विल्यम कॉलेजमधील मराठीचे अध्यापक पंडित वैजनाथ शर्मा यांनीं इ. स. १८१६ सालीं श्रीरामपुर येथे ‘ राजा प्रतापादित्याचें चरित्र ’ मराठी भाषेंत छापिलें. हे पुस्तक प्रथमतः पंडित रामराम बसू यांनीं इ. स. १८०१ मध्ये बंगालींत प्रसिद्ध केलें. त्याचेंच भाषांतर पंडित वैजनाथ यांनीं

केले. अर्वाचीन मराठी वाङ्मयातील हा पहिला चरित्रग्रंथ होय. यानंतर क्यापटन म्याकडोनल्ड यांनी इ. स. १८५२ त खासगी दप्तरावरून व प्रसिद्ध पुस्तकांवरून ' नाना फडनवीस याची बखर ' लिहिली. तिचाच सुबोध सारांश विष्णुशास्त्री पंडित यानी पुढे इ. स. १८५९ त प्रसिद्ध केला. क्यापटन म्याकडोनल्ड यांच्या बखरींतील एक उतारा येथें उद्धृत करितो.

> " माधवराव पेशवे यास नानांनीं दाबात ठेविले होते, त्याविषयीं त्यांस मुळापासूनच त्रास आलेला होता, व त्यांचे चुलत भावाचे त्यांस वारंवार कपटी निरोप येत, तेणेंकरून त्यांस फारच राग येऊन निराशा व दुःख झाले. ते अगदींच आपल्या महालातून बाहेर निघतनासे झाले,व दरबारामध्यें येतनासे झाले, ते तापाचे निमित्त सांगत. अकटोबरचे बाविसाव्या तारिखेस दसरा आला ते दिवशीं पेशवे आपले फौजेसुद्धां मोठ्या डामडौलानें आणि वैभवानें सीमोल्लंघनास निघाले. आणि संध्याकाळीं: सरकार वाड्यात आल्यावर सर्व बडे लोकाचा व मोठाल्या वकीलाचा दरसालाप्रमाणे दरबार झाला परंतु अंतःकरणांत फार दुःख व खेद होऊन ते प्राणावर उदार झाले. मनांमध्ये फारच खेद उत्पन्न होऊन अकटोबरचे पंचविसाव्या तारिखेस प्रातःकाळी त्यानीं समजून उमजून राजवाड्याचे बारा द्वारींवरून खाली उडी टाकिली; तो शरीराचे दोन अवयव तुटले व कारंजाचे नळीवर पडल्यामुळे ते फारच जखमी झाले होते. त्यानंतर पुढे ते दोन दिवसपर्यंत होते. शेवटीं त्यांनी बाजीरावास गादीवर बसवावें असे मोठ्या उत्सुकतेने सागून बाबूराव फडके यांचा त्याजवर फारच लोभ होता, त्यांस त्यानीं कवटाळून धरिले असता प्राण सोडला."†

---

† नाना फडनवीस याची बखर पृ. १२५

भास्कर हरि भागवत यांनीं इ. स. १८५८ त 'कलकत्ता रिव्यू' नामक इंग्रजी त्रैमासिकावरून 'राजा राममोहन राय' यांचें चरित्र लिहिलें. यानंतर जनार्दन रामचंद्रजी यांनी इ. स. १८६० मध्यें 'कविचरित्र' या नावाचा एक ग्रंथ प्रसिद्ध केला. हा ग्रंथ अनेक संस्कृत, प्राकृत व इंग्रजी पुस्तकांच्या आधारें लिहिला आहे. यात हिंदुस्थानांतील प्राचीन व अर्वाचीन कवि आणि ग्रंथकार यांचा इतिहास वर्णिला आहे. त्यांत शुद्ध इतिहासापेक्षां दंतकथातील भारूडच भरपूर आहे. महाराष्ट्रातील प्रमुख विद्वान् म्हणून बाळशास्त्री जांभेकर यांचेंहि चरित्र यात आलें आहे. हनुमंतस्वामी यांनीं लिहिलेल्या श्रीरामदास-चरित्राच्याहि दोन भिन्न प्रती त्या काळीं प्रसिद्ध झाल्या.

**श्रीविष्णुबावा ब्रह्मचारी यांचें चरित्र**

रामचंद्र पांडुरंग आजगांवकर यांनी इ. स. १८७३ त वेदोक्तधर्ममंडळीच्या आज्ञेवरून 'श्रीविष्णुबावा ब्रह्मचारी यांचें चरित्र' लिहिलें. यात बावांनीं स्वमुखानें सांगितलेल्या व ग्रंथकारानें स्वतः अनुभविलेल्या गोष्टी ग्रथित केल्या आहेत. यामधील खालील उताऱ्यावरून या ग्रंथाची धाटणी लक्षात येईल.

"हल्लीं या भूगोलावर जे साधु म्हणविणारे किंवा म्हणून घेणारे असे क्वचित् क्वचित् सत्पुरुष आहेत. परंतु त्यांचें साधुत्व स्वतःपुरतेंच आहे. कारण या साधूंनीं कोणास सदुपदेश केला किंवा वेदप्रतिपाद्य धर्माचा खरेपणा दाखविला असें कोठेंच दिसण्यात आलें नाहीं. कारण त्या साधूनीं कोणाशीं बोलूंच नये आणि जर कदाचित् बोलले तर भ्रमिष्टाप्रमाणें संबंधरहित अनेक भाषांत बडबडावें व मंत्रचळ्याप्रमाणें सोवळेंपणाचा आव घालून कोणाशीं धडपणीं बोलूंच नये, शिवूं नये; आणि जर

क्वचित् बोललेच तर मनुष्य पाहून बोलावे यामुळे अशा भित्र्या साधूंचा लोकास मुळींच उपयोग नाहीं असे स्पष्ट दिसून येते. जो साधु स्वतःचे हित करून दुसऱ्याचेंही हित करील तो मात्र साधु, जगदोद्धारक, परोपकारी, व दयाळु समजावा. पाहा, या बावाजींनी लोकहितार्थ अनेक ग्रंथ करून व बहुत सभा करून वेदोक्तधर्माचा सिद्धात व धर्म म्हणजे काय व त्याचा विचार करण्याची रीत कोणती व तरणोपाय होण्याचा सुलभ मार्ग कोणता हे सर्व जागोजाग दाखविले आहे."†

**परकियांची चरित्रें**

या काळात पाश्चात्य देशातील साक्रेतिस, कोलंबस, कप्तान कुक, मार्तिन ल्यूथर, जॉर्ज वाशिंग्टन, बेंजामिन फ्रांकलीन इत्यादि थोर पुरुषाचीं चरित्रे प्रसिद्ध झाली. महादेवशास्त्री कोल्हटकर यानी इ. स. १८४९ त रॉबर्टसन कृत अमेरिकेच्या इतिहासाच्या द्वितीय पुस्तकावरून 'कोलंबसाचा वृत्तात' लिहिला. कृष्णशास्त्री चिपळूणकर यांनी 'साक्रेतिसाचा इतिहास' ( इ. स. १८५२ ) लिहिला. गणेशशास्त्री लेले यांनी 'कप्तान कुक याच्या जलपर्यटणाचा वृत्तांत' ( इ. स. १८५३ ) प्रसिद्ध केला. विष्णु परशुराम रानडे यांनीं 'जॉर्ज वाशिंग्तन याचा इतिहास' ( इ. स. १८७२ ) निवेदन केला. अशा तऱ्हेचे इंग्रजी पुस्तकाच्या आधारे लिहिलेले अनेक चरित्रग्रंथ प्रसिद्ध झाले. 'बॉंबे ट्राक्ट आणि बुक सोसायटी' या खिस्तीधर्मप्रसारक संस्थेनेहि 'रोम बादशहांचा वृत्तात' (इ. स. १८५१) 'ल्यूथरचा इतिहास' ( इ. स. १८५२ ) 'महंमदाचा वृत्तांत' ( इ. स. १८५३ ) इत्यादि

---

† श्री. विष्णुबावा ब्रह्मचारी याचे चरित्र पृ. ४७

चरित्रें प्रसिद्ध केलीं. महादेवशास्त्री कोल्हटकर याच्या 'कोलंबसाचा वृत्तांत' या ग्रंथातील एक उतारा खाली देत आहे.

> "अशी निराशा होत गेल्यामुळें कोलम्बसास परम दुःख झाले, आणि याने जो आपला भाऊ इंग्लान्दचे दरबारात पाठविला होता त्याजकडील काही वर्तमान न आल्यामुळें तर त्या दुःखात फारच भर पडली. बार्थोलोमेओ हा जलमार्गाने इंग्लान्दास जात असता, दुर्दैवामुळे तो समुद्रांतील चाचे लोकाच्या हातीं सांपडला, त्यानी त्यास सर्वस्वी नागवून किती एक वर्षे बंदिशाळेत अडकवून टाकिला होता. शेवटीं तो तेथून पळून गेला आणि लंडन शहरास जाऊन पोचला. परंतु ते वेळेस त्यास दरिद्राने इतकें पीडिले होते, की दरबारात घालून जाण्याजोगा जामानिमा करण्यापुरता तरी पैसा मिळविण्याकरिता बरेच दिवस त्याला नकाशे काढून विकण्याचे प्राप्त पडले. नंतर कोलम्बसाने इंग्लान्दचा राजापाशीं निवेदन करण्याकरिता ज्या गोष्टी त्यास सागितल्या होत्या, त्या त्याने त्या राजापाशी निवेदन केल्या. हेन्री राजा अतिशय संशयी, आणि कृपण स्वभावाचा होता, त्यामुळें तो नवीन आणि खर्चाचे कामात मन घालीत नसे, तथापि कोलम्बसाचे बोलण्याचा त्याने जसा अधिक खुष मर्जीने स्वीकार केला, तसा ज्या अन्य राजाकडे ते बोलणे लाविले होते त्यानी केला नाही."‡

मराठी ज्ञानप्रसारक मासिकातूनीह शिवाजी महाराज, अहल्याबाई, बुद्ध, महंमद, सर आयझक न्यूटन ग्रीस देशांतील सप्तज्ञानी, विलियम जोन्स इत्यादि अनेक थोर व्यक्तींचीं चरित्रे प्रसिद्ध झालीं होतीं.

---

‡ कोलम्बसाचा वृत्तात पृष्ठ २२–२३.

# परिशिष्ट

## १

## इतिहास

### मराठ्यांचा इतिहास

१ रघूजी भोसल्याची वंशावळी, श्रीरामपुर, इ. स. १८१६

२ मराठ्यांची बखर--ग्राट डफच्या मराठ्यांच्या इतिहासाचे भाषांतर, क्याप्टन डेविड केपन मुंबई, इ. स. १८२९

३. महाराष्ट्र देशाचे वर्णन–दे. अ. इजदेल साहेबाने केलेल्या ग्रांट डफच्या साराशरूप ग्रंथाचे भाषांतर, कुशाबा लिमये पुणें, इ. स. १८४०

४. मराठयाचा संक्षिप्त इतिहास–प्र. गणपत कृष्णाजी मुंबई, इ.स. १८६१(म.वा.)

५. शाळाकरितां महाराष्ट्र देशाचा साक्षिप्त इतिहास बाबा पदमनजी, मुंबई, इ. स. १८६६

६. ग्राट डफकृत मराठयांच्या बखरीवर टीका–पुणे कॉलेजांतील एक विद्यार्थीनी ( ळकंठ जनार्दन कीर्तने ) मुंबई, इ. स. १८६८

## मराठेशाहीतील सरदार घराण्यांचा इतिहास

७. सातारचे श्रीमंत छत्रपति शिवाजीमहाराज यांचे वंशाचा व प्रतिनिधि आणि अष्टप्रधान यांचा इतिहास–विष्णु गोपाळ भिडे. भोर, इ. स. १८६६

८. सातारचे छत्रपति याचे प्रतिनिधि घराण्याचा ईतिहास–गोपाळ बल्लाळ ढापरे, पुणे इ. स. १८६७(इं.ऑ.)

९. शिंदे अलिजाबहादर ह्यांचे घराण्याचा इतिहास. जगन्नाथ प्रभाकर सरंजामे पुणे, इ. स. १८७२

## हिंदुस्थानचा इतिहास

१०. हिंदुस्थानचा इतिहास–एल्फिन्स्टनकृत हिंदुस्थानच्या इतिहासाचा सारांश–बाळशास्त्री जाभेकर, मुंबई, इ. स. १८४६

११. हिंदुस्थानातील इंग्लिशाच्या राज्याचा इतिहास. बाळशास्त्री जांभेकर मुंबई, इ. स. १८४९

१२. भरतखंडपर्व--'शब्दालंकार' नामक ग्रंथाच्या कर्त्यांने रचिले. पुणे, इ. स. १८५१

१३. हिंदुस्थानचा इतिहास–भाग १-२ ( मरेंचे भाषांतर) नरसिंह विनायकशास्त्री ओक, मुंबई, इ. स. १८५९--६०

१४. हिंदुस्थानाचा इतिहास–भाग ३ ( मरेंचे भाषांतर ) विष्णुशास्त्री पंडित मुंबई, इ. स. १८६१

१५. हिंदुस्थानांतील बंड–खंडेराव बाळाजी फडके रत्नागिरी, इ. स. १८६०

१६. हिंदुस्थानचा इतिहास–भाग ३ ( एल्फिन्स्टनचे भाषांतर )
विश्वनाथ नारायण मंडलीक मुंबई, इ. स. १८६१–६२

१७. हिंदुस्थानाचा इतिहास–विश्वनाथ महादेव गोखले
इ. स. १८६३ (ब्रि.म्यु.)

१८. हिंदुस्थानचा इतिहास– मुंबई, इ. स. १८६८

१९. हिंदुस्थानाचा सांक्षिप्त इतिहास–विनायक कोंडदेव ओक
मुंबई, इ. स. १८६८

२०. हिंदुस्थानचा संक्षिप्त इतिहास–शि. भा. काणे,
रा. ह. आगाशे, रत्नागिरी इ. स. १८६९(इ.ऑ.)

२१. हिंदुस्थानाचा इतिहास–कृष्णाजी प्रभाकर काळे
( मॉरिसचा साराश ) ठाणे इ. स. १८६९

२२. हिंदुस्थानाचा संक्षिप्त इतिहास–वासुदेव रामचंद्र मोहोनी
इ. स. १८६९ (म.वा.)

२३. अर्वाचीन बखर–पिनॉकच्या ' Modern History ' या
ग्रंथाचें भाषांतर–सदोबा पवार मुंबई, इ. स. १८७०(इ.ऑ.)

२४. श्रीहरिचरित्रमंजरी–( भरतखंडभूपतिकथातत्त्व )
शामराव मोरोजी, मुंबई, इ. स. १८७०

२५. हिंदुस्थानाचा संक्षिप्त इतिहास–गोविंद रामचंद्र फणसळकर
मुंबई, इ. स. १८७१ (इ.ऑ.)

२६. हिंदुस्थानकथारस–विनायक कोंडदेव ओक,
मुंबई, इ. स. १८७१

२७. इतिहासावर संक्षिप्त टांचण–लक्ष्मण वामन खोत
इ. स. १८७१ ( म.वा.)

२८. इतिहासपत्रक-त्रिविक्रम रामचंद्र आठल्ये इ स. १८७२ (म.वा.)
२९. हिंदुस्थानाचा संक्षिप्त इतिहास-भगवत रावजी बोरामणीकर, भुजंग आबाजी कानडे, सोलापूर इ. स. १८७३ (म.वा.)
३०. हिंदुस्थानाचा इतिहास-भास्कर धोंडदेव गोखले बेळगाव, इ. स. १८७३ (इं.ऑ.)
३१. शिपायांच्या बंडाचा इतिहास-विनायक कोंडदेव ओक, मुंबई, इ. स. १८७४

## किरकोळ ग्रंथ

३२. श्रीक्षत्रियवशोद्गममाला-शामराव मोरोजी- मुंबई, इ. स. १८५५
३३. हिंदुस्थानाची शकावळी-( इंग्रजीवरून भाषांतर ) गोविंद रावजी मांडे, मुंबई, इ. स. १८६०
३४. हिंदुस्थानातील ऐतिहासिक कालक्रम-विठोबा सोनजी चव्हाण, रत्नागिरी इ. स- १८७१ (इं.ऑ.)
३५. सनसमूह-बाळकृष्ण केशव पारखी पुणे इ. स. १८७२ (इं.ऑ.)

## हिंदुस्थानांतील अन्य प्रांत आणि संस्थानें यांचा इतिहास.

३६. गुजराथ देशाचा इतिहास-ए. म्याक्डोनल्ड, मुंबई, इ. स. १८५०
३७. टिपूसुलतानपदच्युति-रामचंद्रराव मद्रास ( मोडींत छापिली ) मद्रास इ. स. १८५० (इं.ऑ.)
३८. कोल्हापूर प्रांताचे वर्णन-विश्वनाथ कृष्ण. कोल्हापूर, इ. स. १८५७ (ग्रां.कॅ.)

...१४

३९. मध्यहिंदुस्थानाचा इतिहास—विनायक जनार्दन कीर्तने, मुंबई, इ. स. १८७१

४०. गोमांतकाचा प्राचीन व अर्वाचीन इतिहास—यशवंत फोंडबा नाईक दणाईत, व रामचंद्र गोविंद वागळे मुंबई, इ. स. १८७३

४१. कोल्हापूर संस्थानाचा प्रश्नोत्तररूप इतिहास (भाग २), बाळाजी प्रभाकर मोडक इ.स.१८७३-७४ (म.वा.)

## इंग्लंडचा इतिहास

४२. इंग्लंड देशाची बखर—भाग २ मुबईचे शिक्षा मडळी-करितां—पुणे इ. स. १८३२—३४

४३. इंग्लंड देशाचे वर्णन—नाना नारायण मुंबई, इ. स. १८३५

४४. इंग्लंडाचा वृत्तात—हरि केशवजी, मुंबई इ. स. १८३८

४५. इंग्लिश इतिहाससार—खंडेराव बाळाजी फडके—रत्नागिरी, इ. स. १८६०

४६. इग्लंड देशाचा इतिहास—भिकाजी कृष्ण. धारवाड इ. स. १८६० (ग्रा.कॅ.)

४७. इंग्लंडाचा प्रश्नोत्तररूप संक्षिप्त इतिहास—रामचंद्र विनायक रणजित. मुंबई, इ. स. १८७०

४८. इंग्लंडचा प्रश्नोत्तररूप इतिहास—गो. रा. वझे आणि श्री. म. शौचे, मुंबई, इ. स. १८७१

## परराष्ट्रांचा इतिहास

४९. आशुरी आणि बावेली लोकाचे वृत्तांतकथन—
मडम् विल्सन, मुंबई, इ. स. १८३५

५०. मेदी आणि पार्शी लोकांचे वृत्तांतकथन—मडम् विल्सन,
मुंबई, इ. स. १८३८

५१. ग्रेकी लोकाचे वृत्तातकथन—मडम् विल्सन,
मुंबई इ. स. १८३८

५२. प्राचीन मिस्त्री लोकाचे वृत्तांतकथन—मडम् विल्सन
मुंबई, इ. स. १८३९

५३. रोम शहराचा संक्षिप्त इतिहास—वासुदेव कृष्ण म्हाले,
मुंबई, इ. स. १८५७

५४. ग्रीस देशाचा संक्षिप्त इतिहास—आसेंब्लीच्या शाळेंतील
एक विद्यार्थी, मुंबई, इ. स. १८६७

५५. फ्रेच आणि जर्मन लोकांच्या लढाईचा इतिहास—
शिवराम गणपतराव बात्रस, पुणे, इ. स. १८७४

## जगाचा इतिहास

५६. जगाच्या इतिहासाचे सक्षिप्त निरीक्षण (भाग २) हरि
रघुनाथ गाडगीळ मुंबई, इ. स. १८५२--५७(ग्रां.कॅ.)

५७. इतिहासरूपदार्शिका—बळवंत हरी जोशी बोरगावकर.
पुणे, इ. स. १८६७ (ब्रि. म्यु.)

५८. जगाचा संक्षिप्त इतिहास—व्यंकोजी गोपाळ बेहेरे
बेळगांव, इ. स. १८७१

५९. जगाचा संक्षिप्त इतिहास—रघुनाथ आबाजी नारूरकर, सातारा, इ. स. १८७२ (इं.ऑ.)

६०. जगाच्या इतिहासाचे सामान्य निरूपण— जनार्दन बाळाजी मोडक मुंबई, इ. स. १८७२

६१. जगाच्या इतिहासावर संक्षिप्त प्रश्नोत्तरें--कुकडे आणि धनेश्वर. अहमदनगर, इ. स. १८७२ (इं.ऑ.)

## चरित्रें

### स्वकीयांचीं चरित्रें—

१ राजाप्रतापादित्याचे चरित्र—(बंगालीवरून) वैजनाथ शर्मा. श्रीरामपुर इ. स. १८१६ (ब्रि.म्यु.)

२ नाना फडनवीस यांची बखर—ए. म्याक्डोनल्ड मुंबई इ. स. १८५२

३ राजाराम मोहनराय यांचे चरित्र—( इंग्रजीवरून ) भास्कर हरी भागवत मुंबई इ. स १८५८

४ नाना फडनवीस ह्याची संक्षिप्त बखर—विष्णुशास्त्री पंडित मुंबई इ. स. १८५९

५ कविचरित्र—जनार्दन रामचंद्रजी, मुंबई इ. स. १८६०

६ श्रीरामदासस्वामींचें चरित्रांची बखर—( हनुमंतस्वामीकृत ) प्र.—वि. रा. बापट आणिना. ल. दिघे मुंबई इ. स. १८७०.

७ श्रीरामदासस्वामींचे चरित्र—( हनुमंतस्वामीकृत ) प्र. महादेव विनायक चौबळ. ठाणें इ. स. १८७१

८ तुकाराम याची गोष्ट—बॉंबे बुक आणि ट्राक्ट सोसैटी. मुंबई
(आवृत्ति ४ थी) इ. स. १८७१

९ विष्णुबावा ब्रह्मचारी याचे चरित्र—रामचंद्र पांडुरंगशास्त्री आजरेकर मुंबई इ. स. १८७३

१० चांदबी इतिहास—सायन्ना सोमण्णा पुणे इ. स. १८७३

परकीयांचीं चरित्रें—

११ कोलंबसाचा वृत्तात–(इग्रजीवरून) महादेव गोविंदशास्त्री कोल्हटकर, मुंबई, इ. स. १८४९.

१२ रोमबादशाहांचा वृत्तात–बॉ. बु. ट्रा. सो. मुंबई,
इ. स. १८५१.

१३ साक्रेतिसाचा इतिहास–(रोलिनच्या ग्रथावरून) कृष्णशास्त्री चिपळूणकर, पुणे, इ. स. १८५२.

१४ लुथराचा इतिहास–बॉ.बु. ट्रा. सो. मुंबई, इ. स. १८५२

१५ खुसरू राजाचा इतिहास–(रोलिनवरून) विष्णु मोरेश्वर भिडे
पुणे इ. स. १८५२

१६ कप्तान कुक साहेब त्याचे जल पर्यटणाचा वृत्तात–(रेव्हरंड बिंगलेच्या ग्रंथावरून) गणेश सदाशिवशास्त्री लेले, पुणे इ. स. १८५३

१७ तेलेमेकस ह्याचा वृत्तांत–गणेश सदाशिवशास्त्री लेले

१८ महंमदाचा वृत्तांत–बॉ. बु. ट्रा. सो. मुंबई इ. स. १८५३

१९ कॅथेरिनचा इतिहास–( The story of Catherine of Russia )
(भाषांतर) कृष्णाजीपंत जोगळेकर मुंबई इ. स.१८६०(ग्रां.कॅ.)

२० बेंजामिन फ्रांकलिन याचें चरित्र—रामचंद्र गोविंद करंदीकर
मुंबई इ. स. १८७१

२१ जार्ज वाशिंग्तन याचा इतिहास—( इंग्रेजीवरून ) विष्णु परशुराम रानडे
मुंबई इ. स. १८७२

२२ राबर्त क्लैव याचा वृत्तात—( मेकॉलेच्या निबंधावरून ) विनायक नारायण भागवत मुंबई इ. स. १८७३

२३ पीतर धि ग्रेत ह्याचें चरित्र ( इंग्रेजीवरून )—विनायक कोंडदेव ओक मुंबई इ. स. १८७४

---

# ७ व्याकरण–कोश–भाषा इत्यादि

१

## व्याकरण–भाषाशास्त्र

बाराव्या शतकापासून मराठी भाषेमध्ये उत्तमोत्तम ग्रंथ निर्माण होत असताहि आमच्यांतील शास्त्री–पंडितांना आपल्या मातृभाषेचें व्याकरण रचण्याची इच्छा झाली नाहीं. महानुभावी पंडितानी काहीं व्याकरण–ग्रंथ लिहिले; परंतु ते सांकेतिक लिपींत असल्यामुळें त्या विशिष्ट पंथातील लोकांनाच त्यांचा उपयोग झाला. हिंदुस्थानात खिस्ती धर्माचा प्रसार करीत असतां मिशनरी लोकांना देशभाषा शिकण्याची आवश्यकता वाटूं लागली, आणि त्यासाठी त्यानीं निरनिराळया प्रांतिक भाषांची व्याकरणे तयार करण्याचा उपक्रम केला. इंग्रजी राज्य स्थापन होण्यापूर्वींच मराठीचीं व्याकरणें पोर्तुगीज भाषेंत लिहिलीं गेलीं होतीं. परंतु महाराष्ट्रातील लोकांसाठी मराठी भाषेचे व्याकरण इ. स. १८३६ सालींच प्रथम प्रसिद्ध झालें.

**मराठीचे व्याकरण (मराठी)**

इ. स. १८२४ पर्यंत मराठी भाषेच्या व्याकरणाचा महाराष्ट्रांत मागमूसहि नव्हता. बॉम्बे नेटिव्ह एज्युकेशन सोसायटीचे सेक्रेटरी जॉर्ज जर्व्हिस यांनीं आपल्या हाताखालील तिघां पंडितांना मराठी भाषेचे व्याकरण करण्याविषयीं आज्ञा केली. त्यांनीं संस्कृत व्याकरणाच्या धर्तीवर एक वर्षांत मराठीचें

व्याकरण तयार केले. त्यानंतर रामचंद्रशास्त्री जान्हवेकर यांनीं त्याचाच सारांश प्रश्नोत्तररूपाने लिहून काढिला. या दोन्ही व्याकरणाच्या हस्तलिखित प्रतीवरूनच बारा वर्षेपर्यंत व्याकरण शिकविण्याचे काम चाललें होते. इ. स. १८३१ सालीं प्रसिद्ध झालेल्या 'सारसंग्रह' पुस्तकात व्याकरणविषयक एक प्रकरण आहे. त्यातील कांही ओळी खालीं देत आहे.

"प्र० व्याकरण म्हणजे काय?

उ० व्याकरण म्हणजे अर्थानुसंधानाने शुद्ध आणि चांगले बोलायाची विद्या.

प्र० व्याकरणाचे भाग किती?

उ० शब्दशुद्धि आणि वाक्ययोजना

प्र० शब्दशुद्धि म्हणजे काय?

उ० शब्दाचे स्वरूपाचा शोध, त्याचे प्रकार आणि त्याचा अनेक जातीची रूपे ही जा भागांत सांगितली आहेत त्याचे नाव शब्दशुद्धि.

प्र० वाक्ययोजना म्हणजे काय?

उ० वाक्यात शब्द कसे योजावे, व कोणता शब्द कोठें लिहावा हा विचार जा भागांत आहे त्याचें नाव वाक्ययोजना.

प्र० महाराष्ट्रभाषेंत शब्दाचा जाती किती?

उ० पाच. नाम, सर्वनाम, क्रियापद, विशेषण आणि अव्यय

प्र० नाम म्हणजे काय ?

उ० दृश्य किंवा अदृश्य वस्तूंची जी नांवे ती या जातीची आहेत जसे–मुंबई, घोडा, ज्ञान इत्यादिक." †

---

† सारसंग्रह (प्र. २९) पृ. १००–१-४

**बालबोध व्याकरणग्रंथ**

इ. स. १८३६ त बाळशास्त्री जांभेकर आणि गंगाधरशास्त्री फडके, यांनीं आपलीं मराठीं व्याकरणें प्रसिद्ध केली. या दोन्ही व्याकरणाच्या प्रथमावृत्तीच्या प्रती उपलब्ध नसल्यामुळें यापैकी कोणते आधी छापले गेले हे सागणे कठीण आहे. ठाणे मराठी ग्रथसंग्रहालयात इ. स. १८३८ सालीं छापलेली बालव्याकरणाची एक प्रत आहे. ही जाभेकरांच्या व्याकरणाचीच दुसरी आवृत्ति असावी असे वाटते. गंगाधरशास्त्री यानी आपल्या "ग्रथात पुणे प्रांतीची भाषा मुख्य धरून तदनुसार प्रकृतिप्रत्ययभावविचार केला आहे....हा ग्रथ फार संक्षिप्त झाला आहे. यामुळे बारीक विषय तसेच राहिले आहेत." मुंबईच्या शिक्षामंडळीने 'महाराष्ट्र भाषेचा कोश' तयार करण्यासाठीं जे शास्त्रीपंचक नेमले होते, त्यांत गंगाधरशास्त्री हे एक होते. त्यानी बाळशास्त्री जाभेकर याच्या सांगण्यावरून विधवाविवाहावर एक अनुकूल ग्रथ लिहिल्याचा उल्लेख जाभेकरांच्या चरित्रांत आढळतो. त्यांचे 'हिंदुधर्मतत्व' (इ. स. १८५२) हें पुस्तकहि चांगलें प्रसिद्ध होते.

**दादोबा पांडुरंग (इ. स. १८१४–८२)**

याच वर्षी (इ. स. १८३६) दादोबा पाडुरंग यांनी आपले 'मराठी भाषेचें व्याकरण' प्रसिद्ध केलें. त्याच्या प्रस्तावनेंत आपल्या अंगीं पुरेशी पात्रता नसतांहि आपण या कामाला का प्रवृत्त झालो त्याबद्दल दादोबा पाडुरंग यांनीं खालीलप्रमाणे खुलासा केला आहे. "कोश, व्याकरणादि ग्रंथ जांस चौघाचे अनुमत अवश्य असले पाहिजे, असे ग्रथ सिद्ध करणें ही आश्रयांची कामे पंडिताकरवी चालविली पाहिजेत. तेव्हा त्याजपासून जे निष्पन्न होईल ते जगमान्य पडेल. जा समयीं कोश झाला, ती एक विस्ताररूपानें व्याकरण करण्याची उत्कृष्ट संधि होती...........आतां ती अमोलिक संधि गेली म्हणोन शोक

मानीतच हातपाय आटोपून निराश बसणें हेंही विचार करून पाहिलें असतां नीट नव्हे, यथासामर्थ्य आपणही आपले हातपाय हालवून पहावे, मग जितके व जसें साध्य होईल तसें होऊ असा निश्चय करून हा पुढील लहानसा ग्रंथ लिहिण्याकरिता मी लेखणी उचलली."* दादोबांनी इंग्रजी व्याकरणाचा सूक्ष्म व मार्मिक दृष्टीने अभ्यास केला असल्यामुळे त्यावर्षी प्रसिद्ध झालेल्या तिन्ही व्याकरणांत त्याचें व्याकरण उत्कृष्ट उतरलें आहे. अवघे बावीस वर्षांचें वय असतानाच त्यांनी हा ग्रंथ प्रसिद्ध केला; तेव्हां त्यांत कांहीं उणेपणा राहणें स्वाभाविकच होतें. इ. स. १८५० त त्यांनीं या ग्रंथाची दुसरी आवृत्ति काढली, त्यावेळी त्यांनीं पहिल्या आवृत्तींतील दोष काढून टाकून हा ग्रंथ शक्य तितक्या पूर्णतेस नेण्याचा प्रयत्न केला. या व्याकरणानें त्या काळी कित्येक वर्षेपर्यंत आपली लोकप्रियता अबाधित राखली होती. दादोबांचा जन्म मुंबईस इ. स. १८१४ मध्ये झाला त्यांचे सर्व शिक्षण शिक्षामंडळीच्याच शाळेत झाले. बापूशास्त्री शुक्ल हे त्याना लेखन व व्याकरण शिकवीत असत. त्यांची शिकविण्याची हातोटी अप्रतिम होती. त्यामुळेच दादोबाना लहानपणापासून मराठी व्याकरणाची गोडी लागली. त्यांनीं आपले वडील व मातोश्री यांच्या स्मरणार्थ मोरोपंतांच्या केकावलीवर 'यशोदापांडुरंगीं' या नांवाची एक विस्तृत टीका (इ. स १८६५) प्रसिद्ध केली. याशिवाय त्यानी 'विधवाश्रुमार्जन,' 'लघुव्याकरण,' 'इंग्लिश व्याकरणाची मूळपीठिका' इत्यादि गद्यग्रंथ लिहिले. त्याच्या भाषानैपुण्याबद्दल बाळशास्त्री जांभेकर यांनीं खालील अभिप्राय व्यक्त केला आहे.

"I have known Dadoba Pandurang for many years. n the knowledge of the English Language, general literature,

* प्रस्तावना—महाराष्ट्र भाषेचें व्याकरण—(आवृत्ति—पहिली)

and science, I consider him equal to the best educated natives of Bombay, while no one among them that I know of, is so well acquainted with the grammatical structure of the Marathi language. He is the author of a grammar of that language, which is deservedly esteemed as the best work on the subject. His writing is correct and idiomatic, and is such as has not been acquired by any translator of English works, perhaps with one or two exceptions."

30th April 1840. BAL. G SHASTRI." †

त्यांच्या 'मराठी भाषेचें व्याकरण' (इ. स. १८३६) या ग्रंथाच्या प्रस्तावनेंतील एक लहानसा उतारा येथें उध्दृत करितो.

> " या देशात अद्यापि व्याकरण म्हणजे काय वस्तु आहे हें बहुत जनांस माहीत नाही, व त्यांत आणखी आश्चर्य हे आहे की, त्यांत थोर थोर व्युत्पन्न व पुराणिक असतात तेही ते समजून घेण्याविषयी तादृश श्रम घेत नाहीत;म्हणून त्यांची व्युत्पत्ति काही कच्ची असते;कारण, व्याकरण हे व्युत्पत्तीस नेत्र होत.ते म्हणतात की व्याकरण हा विषयच निराळा, तो आम्हा पुराणिकांस कशास पाहिजे, तर हे त्याचें म्हणणे नीट नव्हे, त्याचे ज्ञाना· शिवाय जी व्युत्पत्ति ती पोपटाची लटपटंपची जाणावी; आता केवळ वादाकरितां व्याकरणाचा अभ्यास करणे, हा विषय पुराणिकाचा नव्हे, ही गोष्ट खरी आहे, आणि त्याचा विचार करून पाहिलें असतां तादृश उपयोगही नाही, परंतु उपयोगी शब्दज्ञान म्हणून पुराणिकांसच काय, सर्वांस अवश्य असले पाहिजे, मग त्याचा उपयोग किती आहे हे लागलेच अनुभवास येईल.

† प्रस्तावना—मराठी भाषेचें व्याकरण ( आवृत्ति सातवी )

आता हे शब्दज्ञान जसे आपल्या भाषेचे द्वाराने त्वरित सुलभ होईल तसें इतराचे योगाने होणार नाहीं; म्हणोन आपण जी भाषा बोलता तिचें शब्दज्ञान मुळीं झाले पाहिजे, म्हणजे पुढे त्याचा आधाराने परभाषा त्वरित व शुद्ध रितीनें ग्रहण करावयास येईल. यास्तव मुलास स्वभाषेचे ज्ञान मुळीं झाले पाहिजे "*

**अमेरिकन मिशन मराठी भाषेचें व्याकरण**

इ. स. १८४८ त अमेरिकन मिशनच्या विद्यमाने अहमदनगर येथे 'मराठी भाषेचे व्याकरण' प्रसिद्ध झालें. "या ग्रंथांतील अभिप्राय असा आहे की, मराठी भाषेचीं मूळतत्वे संक्षेपाने स्पष्ट करून दाखवावी. शब्द व तत्वे याचा वर्ग करण्याविषयी हा ग्रंथ पूर्वी केलेल्या व्याकरणापेक्षा पूर्ण आहे, असे वाटते. काहीं काही गोष्टींविषयी महाराष्ट्र देशांतील मोठमोठे शास्त्री व पंडित याची मते घेतली आहेत." †

**गंगाधर रामचंद्र टिळक**

गंगाधर रामचंद्र टिळक याच्या 'लघुव्याकरणा' ची दुसरी आवृत्ति इ. स. १८५९ त निघाली. ह्यानीं स्वतःच्या प्रयत्नानें संस्कृत व गणित या दोन विषयात प्रावीण्य मिळविलें होते, परंतु इग्रजी शिक्षण न मिळाल्यामुळे ते मागे पडले व शालोपयोगी पुस्तकें लिहूनच त्याना आपला उदरनिर्वाह चालवावा लागला.

**कृष्णशास्त्री गोडबोले (इ. स. १८३१–८६.)**

इ. स. १८६७ त कृष्णशास्त्री गोडबोले यांनी 'मराठी भाषेचे नवीन व्याकरण' प्रसिद्ध केले. यात संस्कृत आणि प्राकृत भाषाशीं मराठीचा किती निकट संबंध आहे ते दाखवून शेवटी प्राकृत भाषेचें संक्षिप्त व्याकरण आणि

* मराठी भाषेचे व्याकरण (आवृत्ति पहिली) प्रस्तावना. पृ. ७–८

† प्रस्तावना–मराठी भाषेचें व्याकरण( अहमदनगर–१८४८. )

संस्कृत प्राकृत शब्दकोश दिला आहे. याचा जन्म वाई येथे इ. स. १८३१ त झाला. त्याचें सगळे शिक्षण पुण्यास झालें. त्यांना लहानपणापासून गणिताचा नाद असल्यामुळे त्यांनी ज्योतिःशास्त्राचा सखोल अभ्यास केला. ते अखेरपर्यंत सरकारी शिक्षणखात्यांत नोकरीस होते. त्यांचे 'ग्रहलाघव' आणि 'ज्योतिःशास्त्र' हे ग्रंथ प्रसिद्ध आहेत. भाषाशास्त्रांतील त्याचे नैपुण्य त्यांच्या वरील व्याकरणांत फार चांगले दृष्टीस पडतें. या काळात दादोबा पांडुरंग, कृष्णशास्त्री गोडबोले आणि कृष्णशास्त्री चिपळूणकर या तीन लेखकांनींच मराठी गद्याच्या व्याकरण-विभागांत महत्वाची भर घातली. 'शाला-पत्रक' मासिकांत प्रसिद्ध झालेले कृष्णशास्त्री चिपळूणकराचे व्याकरणांवरील निबंध फारच मार्मिक व उद्बोधक आहेत.

मराठी शुद्धलेखनाविषयीं 'महाराष्ट्र भाषेची लेखनशुद्धि', 'मराठी लेखनशुद्धि', 'मराठी शुद्ध लिहिण्याविषयी अनुगम' इत्यादिं सातआठ पुस्तकें या काळी प्रसिद्ध झाली. त्याप्रमाणेंच व्युत्पत्तिविषयकहि दोनतीन ग्रंथ तयार झाले.

**मराठीचीं व्याकरणें ( इंग्रजी )**

ख्रिस्ती धर्मप्रचारक व परकीय अधिकारी वर्ग यांना मराठी भाषा शिकतां यावी म्हणून मराठी भाषेचीं व्याकरणें इंग्रजींत तयार होऊं लागलीं. प्रथमतः इ. स. १८०५ मध्यें डॉ. केरी यानी मराठी भाषेचे इंग्रजी व्याकरण लिहिले. त्यानंतर ड्रमंडचें गुजराथी व मराठी भाषाचे व्याकरण प्रसिद्ध झाले. इ. स. १८२६ त कर्नल व्हान्स केनेडी यानी महंमद इब्राहिम मखबा यानीं लिहिलेले मराठीचे व्याकरण सुधारून छापलें. यानंतर रेव्हरंड स्टिव्हन्सन यानीं इ. स. १८३३ मध्ये कलकत्यास "मराठी व्याकरणाची मूळपीठिका" हे पुस्तक प्रसिद्ध

केलें. रेव्हरंड बर्जेस यांनी आपले व्याकरण इ. स. १८५४ त लिहिले. त्याच्या प्रस्तावनेंत त्यांनीं आपल्या आधींचे मराठी भाषेचे व्याकरणकार म्हणून केरी, केनेडी, स्टिव्हेन्सन, ब्यालंटिन, जांभेकर, फडके आणि दादोबा यांचा उल्लेख करून त्या सर्वांच्या व्याकरणग्रंथांत स्टिव्हेन्सनचें व्याकरण उत्कृष्ट आहे असा अभिप्राय दिला आहे * याशिवाय आणखीहि कांहीं मराठीचीं व्याकरणे इंग्रजींत प्रसिद्ध झाली.

**इतर भाषांची व्याकरणें**

रेव्हरंड जे. स्टिव्हेन्सन यानी "इंग्लिश भाषेचा व्याकरणाची मूळपीठिका" ( आवृत्ति २ री–इ. स. १८३३ ) लिहिली. राघोबा जनार्दन वसईकर यांनी जांभेकराच्या साह्याने 'मरेच्या इंग्रजी व्याकरणाचा सारांश' ( इ. स. १८३७ ) प्रसिद्ध केला. इ. स. १८३९ त जॉन विल्सनच्या 'वाक्यावळि'ची दुसरी आवृत्ति निघाली. याखेरीज इंग्रजी व्याकरणासंबंधीं आणखीहि चारपांच पुस्तके प्रसिद्ध झाली. सदाशिव अनंतशास्त्री लेले यानी इ. स. १८४५ त 'संस्कृत वाक्यरत्नावलि' तयार केली. त्यानतर इ. स. १८५९ त कृष्णशास्त्री चिपळूणकराचे संक्षिप्त संस्कृत व्याकरण प्रसिद्ध झाले. श्रीकृष्णशास्त्री तळेकर यानी इ. स. १८६६ त संस्कृत भाषेचें विस्तृत व्याकरण रचिले. याशिवाय संस्कृत व्याकरणासंबंधी आणखीहि दोनतीन पुस्तकें प्रसिद्ध झालीं; त्या सर्वांत कृष्णशास्त्री भाटवडेकर याचा 'सुबंतप्रकाश' (इ.स.१८६७ ) अत्यंत महत्वाचा आहे. जॉन विल्सन यांनी इ. स. १८३२ त "इब्री भाषेचे व्याकरण" ( Rudiments of Hebrew grammar ) प्रसिद्ध केलें.

* E. Burgess—"Dr. Stevenson's grammar is decidedly the best that has appeared "

## २

# कोश

भाषेच्या वाढीला व्याकरणाप्रमाणेच कोशग्रंथहि अत्यंत आवश्यक असतात. मराठी भाषेचा पहिला कोश इ. स. १८१० मध्ये डॉ. केरी यानी तयार केला. त्यानंतर बॉम्बे नेटिव एज्युकेशन सोसायटीनें महाराष्ट्र भाषेच्या कोशाची रचना करण्यासाठी बाळशास्त्री घगवे, गंगाधरशास्त्री फडके, सखाराम जोशी, दाजीशास्त्री शुक्ल आणि परशुरामपंत गोडबोले असे पांच पंडित नेमिले. त्यानी महत्प्रयासाने इ. स. १८२९ त "महाराष्ट्र भाषेचा कोश" प्रसिद्ध केला. इ. स. १८३१ त त्याला पुरवणीखंड जोडण्यांत आला. हा कोश अत्यंत विस्तृत असून त्यांत महाराष्ट्राच्या सर्व भागात प्रचलित असलेले अधिकात अधिक शब्द समाविष्ट करण्याचा प्रयत्न केला आहे. या कोशासंबंधीं तत्कालीन वाङ्मयांत अनेक गौरवपर उल्लेख आढळतात. याची प्रस्तावना प्रौढ, भारदस्त व मार्मिक आहे. त्यांतील लहानसा उतारा येथे सादर करितो.

> "या भाषेवर आजपर्यंत कोशव्याकरणादि व्यवस्थापक काहीच झाले नाहीं. हा प्रथमच संस्कार आहे. हा ग्रंथ करण्याविषयीं बुद्धीस आधार मिळून लोकाचा वाग्व्यवहार तो तरी एकरूप आहे असे नाहीं. देशपरत्वें जातिपरत्वें किंबहुना व्यक्तिपरत्वेंही भिन्न भिन्न आहे. अशा आधाराचें बलाने जी रचना करायाची ती निर्दोष आणि सर्वांस आनंदजनक कशानें होणार ? परंतु जसा जितका लोकांचा व्यवहार आढळात आला तितक्याचें बुद्धीनें आकलन करून यथामति हा ग्रंथ केला आहे हे मनात आणून

सज्जनांनी दोषदर्शनानें विरस न होता यातील गुणलेश असतील ते आकर्षावे.
या ग्रंथाने भाषागत सर्व अज्ञानाचा नाश होईल असे नाही. जसें अरुणोदयानें सर्व अंधकाराचा नाश होतो असे नाही. यत्किंचित् मात्र होतो. परंतु तेणेंकरून सकलाधकारनाशकर्ता जो सूर्य त्याला उदय पावायास योग्यता होत्ये, तसें या ग्रंथाने बुद्धिमान् विद्वान असे थोर लोक त्यास भाषागत अज्ञानाचा नाश व्हावया-जोगा ग्रंथ करण्याविषयी योग्यता येईल. "†

**मोलस्वर्थ-क्यांडी**

जे. टी. मोलस्वर्थ यांनी इ. स. १८३१ त मराठी-इंग्रजी कोश प्रसिद्ध केला. त्याच्या रचनेसबधीं त्यानी प्रस्तावनेंत खालील उद्गार काढले आहेत. "This work is the product of unremitted labor through six years. It was undertaken from a desire to promote the propagation of the glorious gospel" यानंतर मेजर क्यांडी यानीं मोलस्वर्थ साहेबाने आरं-भिलेल्या इंग्रजी—मराठी कोशाचें काम इ. स. १८४७ त पुरे केले. मेजर क्याडी याचा जन्म इ. स. १८०६ त झाला. इ. स. १८२२ त ते हिंदु-स्थानांत आले. आरंभी कांहीं दिवस त्यांनीं कंपनी सरकारच्या लष्करांत नोकरी केली. पुढें मोलस्वर्थ याना मराठी-इंग्रजी कोशाच्या कामीं त्यानीं भरपूर साह्य केले. इ. स. १८३७मध्ये पुणें पाठशाळेच्या व्यवस्थापकाच्या जागीं त्यांची योजना झाली. त्या काळीं सरकारी शाळांतून चालूं असणारीं बहुतेक सर्व क्रमिक पुस्तकें त्यांच्या हातचीं आहेत. याशिवाय त्यांनीं नीति-ज्ञानपरिभाषा,

† प्रस्तावना —महाराष्ट्र भाषेचा कोश (इ. स. १८२९.)

विरामचिन्हपरिभाषा, वाचनपाठमाला, भूगोलाचे वर्णन ( भाग. १।२ ) इत्यादि वरींच पुस्तकें प्रसिद्ध केलीं. इ. स. १८७७ त ते महाबळेश्वरी दिवंगत झाले. क्याडी व मोलस्वर्थ यांच्या कोशाखेरीज मराठी-मराठी, इंग्रजी-मराठी, मराठी–इंग्रजी संस्कृत–प्राकृत असे अनेकविध कोश त्या काळीं रचले गेले.

## ३

## म्हणी–पत्रलेखन

**म्हणी**

मराठी भाषेत म्हणींचा संग्रह भरपूर आहे. मोलस्वर्थ–कोशाला जोडलेल्या निबंधात विल्सन साहेब म्हणतात " The proverbs of the Maratha amount to about three thousand, and they form most valuable illustrations of the sentiments and customs of those who use them, as well as striking exemplification of native idiom " मराठी भाषेतील म्हणींच्या संग्रहाचीं तीनचार पुस्तकें या काळात प्रसिद्ध झालीं. इतर देशातीलहि निवडक म्हणींचा संग्रह कांहीं पुस्तकात भाषांतरासह छापला आहे. मोलस्वर्थकृत मराठी–इंग्रजी कोशांतहि मराठी म्हणींचा समावेश केला आहे.

**पत्रलेखन**

पत्रलेखनाची कला मराठेशाहीच्या काळात फार उच्च दशेला जाऊन पोहोचली होती. याविषयासंबंधीहि लेखन-पद्धतीचे बुक, लेखनकल्पतरु वगैरे तीनचार पुस्तकें या काळात छापलीं गेलीं.

१५

## ४

## अलंकार–साहित्य–पद्यरचना

इ. स. १८५१ त पुणें येथे शब्दालंकार नामक पुस्तक प्रसिद्ध झालें.

**अलंकारविवेक**

यानंतर कृष्णशास्त्री राजवाडे यानी 'अलंकार विवेक' या नांवाचा ग्रथ (इ. स. १८५३) मराठीत लिहिला, यांत मुख्यतः अर्थालंकाराचे सोदाहरण निरूपण केले आहे. ग्रंथ लहानच पण उपयुक्त व मार्मिक आहे. कृष्णशास्त्री आपल्या प्रस्तावनेत म्हणतात.

"अलंकारशास्त्र म्हणून एक स्वतंत्र शास्त्र आहे, न्यायव्याकरणादिक अनेक शास्त्रे आहेत. त्याचा जसा निरनिराळा उपयोग आहे तसा ह्या अलंकारशास्त्राचाही फार उपयोग आहे. जसे देहास शोभादायक जी वस्त्रेंभूषणे त्यास अलंकार नाव आहे, तसे भाषणास शोभा आणणारे उपमारूपक इत्यादि जे अर्थाचे प्रकार त्यास अलंकार हें नाव योग्य आहे. त्या अलंकाराचे शास्त्र म्हणून ह्यास अलंकारशास्त्र असे नाव ठेविलें आहे. पूर्वी भोजराजा होता. त्याचे वेळेस अलंकारशास्त्राची प्रवृत्ति फार होती. सांप्रत काळीं करनाटक देशात व द्रविड देशात ह्या शास्त्राची प्रवृत्ति फार आहे. अलंकारशास्त्राच्या योगाने भाषणाचे चातुर्य विशेष येते व ग्रंथास चमत्कारिक मनोरंजकता येते. ज्या वाक्यांत किंवा काव्यांत अलंकार नाहीत त्याचा रस सपक लागतो. अन्न हे सामान्यतः गोड खरें, परंतु त्याला मिठाने किंवा साखरेने जशी विशेष गोडी येती, तसा अलंकाराच्या योगाने भाषणास विशेष चमत्कारिक रस येतो."

* प्रस्तावना—अलंकारविवेक.

दाजी शिवाजी प्रधान यांनी इ. स. १८६८ त 'रसमाधव' या नांवाचा ग्रंथ रचिला. "पूर्वी रसज्ञ पंडितांनी रस कसे निर्माण करावे आणि त्याची पद्धति

**रसमाधव**

कशी असावी, हे सर्वांस कळावे, म्हणून संस्कृत भाषेने नियम करून ग्रंथ बांधिले, ते संस्कृतांत प्रसिद्ध झाले आहेत......परंतु प्राकृत जनाचे उपयोगी काही प्राकृत ग्रंथ असावा आणि तेणेकरून संस्कृत ग्रंथाचा आशय लोकास कळावा...या करिता उद्योग करून, श्रमाने हा लहानसा ग्रंथ केला आहे." यातील एक छोटासा उतारा खाली देत आहे.

"अनेक चातुर्य चमत्कार व शास्त्रार्थ वाक्ये करून युक्त, असे सुभाषित अथवा गायन किंवा स्त्रीलीला, शृंगाररसादि येणेकरून ज्याचे चित्त द्रवत नाही; तो जीवनमुक्त, देही असून विदेही किंवा पशु या शिवाय कोणाचे चित्त रममाण होणार नाही, असें नाही. पाषाण पाण्याचे डोहांत भिजत घातला, तरी तो अंतरी भिजतच नाही. किंवा मलयादि पर्वतावर चंदनाच्या सुगंधी करून खैर, बाबुळी, बोरी इत्यादि सर्व झाडे चंदन होतात. परंतु वेळू तेथेच असता, तो जशाचा तसाच रहातो. त्याला सौगंध्य येत नाही. कारण तो अंतरी पोकळ, निःसार; तसे जे शून्यहृदय त्याला रसानी काय करावे अंधास दीपाने काय दाखवावे; बधिराला ऐकावयास येतच नाही. त्याला गायन काय संतुष्ट कराल; तसे जे अरसिक त्यांच्या मनाला रसाने विश्राम कसा होईल." †

† रसमाधव पृ. ५

**साहित्यशास्त्र**

गणेश सदाशिवशास्त्री लेले यांनी १८७२ त कित्येक संस्कृत ग्रंथाच्या आधाराने 'साहित्यशास्त्र' नामक ग्रंथ लिहिला. "त्यात एकंदर आठ प्रकरणे आहेत, व प्रत्येकात या शास्त्राच्या एकेक विभागाविषयी संक्षेपाने माहिती दिली आहे. विषय सुलभ रीतीनें समजण्याकरितां बहुतेक ठिकाणी प्रश्नोत्तराची योजना केली आहे."*

**पद्यरचना**

पद्यरचना व वृत्तदर्पण या दोन पुस्तकात मराठी भाषेतील वृत्ताची लक्षणं उदाहरणासह दिली आहेत.

---

* विष्णुशास्त्री चिपळूणकर--- किरकोळ लेखांचा संग्रह (भाग १ ला.) पृ. १८७

## परिशिष्ट

### १

### व्याकरण–भाषाशास्त्र

**मराठीचें व्याकरण ( मराठी )**

१ बालव्याकरण–बाळशास्त्री जांभेकर. इ. स. १८३६.

२ महाराष्ट्र भाषेचे व्याकरण–गंगाधरशास्त्री फडके,
( द्वितीयावृत्ति–इ. स. १८३८ ) प्रथमावृत्ति, पुणे,
इ. स. १८३६.

३ मराठी भाषेचे व्याकरण—दादोबा पांडुरंग तर्खडकर,
( आवृत्ति २-३; इ. स. १८५०-५७ ) मुंबई,
इ. स. १८३६.

४ मराठी आणि इंग्रेजी क्रियापदाच्या काळाचा परिपाठ,
मुंबई, इ. स. १८४०.

५ मराठी भाषेचें व्याकरण–अमेरिकन मिशन, अहमदनगर,
इ. स. १८४८.

६ लघुव्याकरण–गंगाधर रामचंद्र टिळक,
( द्वितीयावृत्ति ) इ. स. १८५९.

७ मराठी लघुव्याकरण—दादोबा पांडुरंग इ. स. १८६५.
८ मराठी भाषेचें नवीन व्याकरण—कृष्णशास्त्री गोडबोले,
इ. स. १८६७.
९ व्याकरणसंबंधी उपयुक्त संग्रह—भास्कर बापूजी आठल्ये,
मुंबई, इ. स. १८६७.
१० व्याकरणसार—सखाराम बापूशेट दाडेकर, मुंबई,
इ. स. १८७०.(इ.ऑ.)
११ व्याकरणसाह्य—विनायक गोपाळ कयाळ, रत्नागिरी,
इ. स. १८७१.
१२ व्याकरणसंबंधी सोपे धडे ( भाग १ ला )-मुंबई,
इ. स. १८७३.

## व्युत्पत्ति—

१३ शब्दसिद्धिनिबंध—विनायकशास्त्री दिवेकर आणि गोविंद
विठ्ठल महाजन, ( पृ. ६४ ) मुंबई, इ. स, १८४३.
(compiled with the assistance of) बाळशास्त्री जांभेकर
( ब्रि. म्यु. )
१४ शब्दसिद्धिनिबंध—विनायक वासुदेव गडबोले आणि भास्कर
अनंतशास्त्री ताम्हनकर, पुणें, इ. स. १८७८.
१५ शब्दसिद्धिनिबंध—जनार्दन हरी आठल्ये आणि विनायकशास्त्री
आगाशे, मुंबई, इ. स. १८६८.

## शुद्धलेखन—

१६ शुद्ध लिहिण्याचा अनुक्रम—रामचंद्र विनायक ओक, पुणें,
इ. स. १८६०.(ग्रां.कॅ.)

१७ महाराष्ट्रभाषेची लेखनशुद्धि–रामचंद्र भिकाजी गुंजीकर,
मुंबई, इ. स. १८६९.

१८ मराठी शुद्ध लिहिण्याचे नियम—गोविंद बल्लाळ बापट,
इ. स. १८६९.

१९ मराठी लेखनशुद्धि—नारो रामचंद्र महाडेश्वर, मुंबई,
इ. स. १८७०.

२० शुद्ध लिहिण्याविषयी अनुगम—रामचंद्र आपाजी चितळे
सातारा इ. स. १८७३. ( इं. ऑ. )

२१ मराठी शुद्धलेखनाचे नियम–नारायण दामोदर छत्रे, पुणें,
इ. स. १८७४

## इतर भाषाविषयक ग्रंथ

२२ सुलेखनविद्या—गोविंद नारायण, मुंबई इ. स. १८६०.

२३ लिपिप्रकाश— इ. स. १८६०.(म.वा.)

## मराठीचें व्याकरण ( इंग्रजी )

२४ Grammar of the Mahratta Language. W Carey,
Serampore 1805

२५ Illustrations of the grammatical parts of the Guzerattee, Mahratta and English Languages—
Dr. Drummond Bomb. 1808.

२६ A Grammer of the Mahratta Language—Mahomed Ibrahim Makba. (Revised by Vans Kennedy)
Bomb. 1826.

२७ The Principles of Murathee Grammar. Rev
J Stevenson—Calcutta 1833.

२८ Mahratta Grammar—Ballantyne
Edinburgh 1839

२९ Grammar of the Marathi Language E Burgess
Bomb. 1854

३० Grammar of the Marathi Language. Bellairs,
Askedkar Bomb. 1868

३१ Hand Book of the Marathi Grammar
[ For Matriculation Students ] Poona 1872

## इंग्रजी भाषेचें व्याकरण

३२ साह्यकारि—( इंग्रजी भाषणाचे ज्ञान मिळवायासाठी )
मुंबई, इ. स. १८३१.

३३ इंग्लिश भाषेचा व्याकरणाची मूळ पीठिका--
( आवृत्ति २ री ) रे. जे. स्टिव्हेन्सन, मुंबई,
इ. स. १८३३.

३४ मरे याच्या इंग्रेजी व्याकरणाचा संक्षेप—राघोबा जनार्दन
वसईकर ( तपासनीस—बाळशास्त्री जांभेकर )
मुंबई. इ. स. १८३७.

३५ वाक्यावलि—जॉन विल्सन ( आवृत्ति २ री ) मुंबई,
इ. स. १८३९.(ब्रि.म्यु.)

३६ इंग्लिश व्याकरण आणि भाषण सांप्रदायिक वाक्ये—
मुंबई, इ. स. १८५१ (ब्रि.म्यु.)

३७ इंग्लिश व्याकरणाची मूळपीटिका—दादोबा पांडुरंग, पुणे,
इ. स. १८६३(ब्रि.म्यु.)

३८ संभाषणांतील वाक्ये—( इग्रजी–मराठी ) वामन
कृष्णशास्त्री गद्रे, मुबई, इ. स. १८७२.

३९ इग्रजी भाषांतर करण्याचे नियम—खंडो कृष्ण गर्दे,
इ. स. १८७३.

## संस्कृत भाषेचें व्याकरण

४० भाषामजरी—( सस्कृत शब्द व वाक्ये–मराठी अर्थासह )
मुबई, इ. स. १८८०.

४१ सस्कृत वाक्यरत्नावलि—सदाशिव अनंतशास्त्री लेले,
मुंबई, इ. स. १८४५.(इ.ऑ.)

४२ सस्कृत भाषेचे लहान व्याकरणाचे पुस्तक—
कृष्णशास्त्री चिपळूणकर, मुंबई, इ. स. १८५९.

४३ पाठावलि—संस्कृत भाषेचे प्रथम पुस्तक, पुणें,
इ. स. १८६३.(ब्रि.म्यु.)

४४ सस्कृत व्याकरण—श्रीकृष्ण रघुनाथशास्त्री तळेकर,
मुंबई, इ. स. १८६६

४५ सुबंतप्रकाश—कृष्णशास्त्री भाटवडेकर, इ. स. १८६७.(ब्रि.म्यु.)

४६ संस्कृत प्रथम पुस्तक ( भांडारकरकृत ) मराठी भाषांतर—
भा. क. विनायकशास्त्री, इ. स. १८७३.

## हिब्रू व्याकरण

४७ इब्री भाषेचे व्याकरण ( Rudiments of Hebrew Grammar )
जॉन विल्सन, मुंबई, इ. स. १८३२. ( इं. ऑ. )

# २

## कोश

### मराठी–मराठी

४८ महाराष्ट्र भाषेचा कोश—बाळशास्त्री घगवे, गंगाधरशास्त्री फडके, सखाराम जोशी, दाजीशास्त्री शुक्ल, परशुरामपंत गोडबोले, मुंबई, इ. स. १८२९.

४९ महाराष्ट्र भाषेचा कोश—पुरवणी खंड इ. स. १८३१.

५० हंसकोश—रघुनाथ भास्कर गोडबोले, पुणे, इ. स. १८६३.

५१ रत्नकोश--बाळकृष्ण मल्हार बीडकर, मुंबई, इ. स. १८६९.

५२ मराठी भाषेचा नवीन कोश--रघुनाथ भास्कर गोडबोले, मुंबई इ. स. १८७०

### मराठी–इंग्रजी कोश

५३ मराठी--इंग्रजी कोश. डॉ. केरी श्रीरामपुर इ. स. १८१०

५४ मराठी--इंग्रजी कोश--व्हान्स केनेडी--मुंबई इ. स. १८२४

५५ मराठी- इंग्रजी कोश--जे. टी. मोल्स्वर्थ—( द्वितीयावृत्ति इ. स. १८५७ ) मुंबई, इ. स. १८३१.

५६ मराठी—इंग्रजी कोश ( संक्षिप्त—केनेडी व मोल्स्वर्थवरून ) मुंबई इ. स. १८५१.

५७ मराठी—इंग्रजी कोश—बाबा पदमनजी, मुंबई, इ. स. १८६३.

५८ मराठी—इंग्रजी लघुकोश—भिकाजी वासुदेव आठल्ये,
इ. स. १८७१.

## इंग्रजी–मराठी कोश

५९ इंग्रजी--मराठी कोश—व्हान्स केनेडी, मुंबई,
इ. स. १८२४.

६० इंग्रजी--मराठी कोश—क्याडी-मोलस्वर्थ, इ. स. १८४७.
( आवृत्ति २ री इ. स. १८७३. )

६१ शब्दरत्नावलि—बाबा पदमनजी, मुंबई, इ. स. १८६०.

६२ इंग्लिश आणि मराठी कोश—श्रीकृष्ण रघुनाथशास्त्री तळेकर,
मुंबई. इ. स. १८६१.

६३ इंग्रजी--मराठी कोश—विष्णुशास्त्री पंडित,
मुंबई, इ. स. १८६४.

६४ शब्दसंग्रह—विठ्ठल गोपाळ करदीकर, पुणे, इ. स. १८६४.

६५ इंग्रजी मराठी कोश—भगवंत वासुदेव बुमरे,
इ. स. १८७२.

## संस्कृत–मराठी

६६ संस्कृत--प्राकृत शब्दकोश—अनंतशास्त्री तळेकर,
पुणे इ. स. १८५३.

६७ संस्कृत आणि महाराष्ट्र धातुकोश–विष्णुशास्त्री पंडित,
मुंबई इ. स. १८६५.

६८ शब्दरत्नाकर–माधवचंद्रोबा, मुंबई, इ. स. १८७०.

६९ संस्कृत--प्राकृत कोश—नारो आपाजी गोडबोले,
गोपाळ जिवाजी केळकर, पुणे, इ. स. १८७२.

## संकीर्ण

७० राजव्यवहारकोश—काशिनाथ गगाधर, मुंबई,
इ. स. १८५०.(ग्रा.कॅ.)

७१ दासबोधशब्दपरिभाषा—सदाशिवराव गोडबोले,
सातारा इ; स. १८६२,(ग्रा.कॅ.)

७२ हिंदुशास्त्रातील संख्यावाचक दुर्बोधशब्दार्थकोश—
रखमाजी देवजी मुळे, मुंबई इ. स. १८६७.

७३ विग्रहकोश—गोपाळशास्त्री घाटे, मुंबई, इ. स. १८६७.

७४ विद्याकल्पतरु—रावजी केशवराव सावारे, ठाणे,
इ. स. १८६८.

# ३

# म्हणी—पत्रलेखन

## म्हणी—

७५ फर्दुकवही— पुणे, इ. स. १८४२.(ग्रा.कॅ.)

७६ सर्व देशातील निवडक म्हणी—सदाशिव विश्वनाथ,
मुबई, इ. स. १८५८.

७७ म्हणीरत्नमाला—कृष्णशास्त्री भाटवडेकर, (ग्रा.कॅ.)

७८ मराठी व्यवहारातील म्हणी—नारायण दामोदर छत्रे.
( इंग्रजी भाषांतरासह ) पुणे, इ. स. १८७०.(ग्रा. क.)

७९ मराठी प्रचारांतील म्हणी—गंगाधर गोविंद सापकर,
पुणें, इ. स. १८७२.

### पत्रलेखन

८० लेखनपद्धतीचें बुक—पुणें, इ. स. १८५०.

८१ हेमाद्रीकृत लेखनकल्पतरु—मुनशी गणपतराव सातारकर, मुंबई, इ. स. १८५३.

८२ लेखनपद्धती ( मोडी )—बेळगाव, इ. स. १८६३.

८३ लेखनपद्धती—पुणें, इ. स. १८७१.

## ४
## साहित्य-अलंकार-पद्यरचना

### साहित्यशास्त्र

८४ रसमाधव—दाजी शिवाजी प्रधान, रत्नागिरी. इ. स. १८६८.

८५ साहित्यशास्त्र—गणेश सदाशिवशास्त्री लेले, मुंबई, इ. स. १८७२.

### अलंकारशास्त्र

८६ शब्दालंकार—पुणें, इ. स. १८५१.(ग्रा.कॅ.)

८७ अलंकारविवेक—कृष्णशास्त्री राजवाडे, पुणें, इ. स. १८५३.

### पद्यरचना

८८ पद्यरचना ( निबंध )—भास्कर दामोदर पाळंदे

८९ वृत्तदर्पण—परशुरामपंत गोडबोले, पुणें, इ. स. १८६०.(ग्रा.कॅ.)

---

# ८ धर्म–नीति तत्त्वज्ञान

## १

## धर्म

हिंदु लोक स्वभावतःच धर्मशील असल्यामुळे मराठी वाङ्मयात धार्मिक ग्रंथ मुबलक झाले, परंतु नित्यपठणाच्या सोयीसाठी त्यांतील पुष्कळसा भाग पद्यामध्यें ग्रथित केला आहे. मराठी भाषेतील धार्मिक गद्यग्रंथांत संस्कृत धर्मग्रंथांवरील प्राकृत टीकाचाच भरणा जास्त आहे. स्वतंत्र रीतीने लिहिलेले धर्मविषयक वाङ्मय फारच थोडे आहे.

### श्रुतिविषयक ग्रंथ

मराठी भाषेंत वेदविषयक ग्रंथ छापण्याचा उपक्रम प्रथम रेव्हरंड जे. स्टिव्हेन्सन यांनीं केला. त्यांनी इ. स. १८३३ त 'त्रिविद्या त्रिगुणात्मिका' या नांवाचे एक लहानसे पुस्तक प्रसिद्ध केले. त्यात त्यांनीं ऋग्वेदाच्या काही सूक्तांचें भाषांतर (मूळ संहितेसह) दिले आहे. भाषांतर शब्दशः केलें असून नेहमीच्या प्रचारांतील शब्दयोजना करण्याकडे विशेष लक्ष पुरविलें आहे. यांतील एका सूक्ताचें भाषांतर येथे सादर करितोः—

"(१) हे इच्छित पदार्थ देणाऱ्या इंद्रा तुझे हरी नामक घोडे तुला सोमपानार्थ आणोत आणि सूर्यासारखे प्रकाशमान् ऋत्विज जे ते तुजप्रत विख्यात करोत.

(२) अहो इंद्राचे दोघे हरी नामक अश्वानो यज्ञार्थ पुढें चालणारे असे जे तुम्ही ते आमचें घृतयुक्त धान्यातें पाहून सुखरूप रथाचे ठायी इंद्राला बसवून या वेदीचे समीप आणा ॥

(३) अम्ही प्रातःकाळचे यज्ञाविषयीं इंद्राप्रत बोलावितो तसेच मध्यानकाळच्या यज्ञाचा आरंभ झाला असतां इंद्राप्रत बोलावितो तसेच संध्याकाळी सोमपानार्थ इंद्राप्रत बोलावितो ॥

(४) हे इंद्र लांब केशांहीं युक्त हरी नामक अश्वासह वर्तमान तूं अमच्या सिद्ध केलेल्या सोमाप्रत अमचे समीप ये कारण की सिद्ध झालेल्या सोमाविषयी तुला अम्ही बोलविताहो ॥

(५) हे इंद्रा तो तूं अमच्या ह्या स्तुतिप्रत ये कारण की देवाचे यज्ञाजवळ प्रसिद्ध झालेल्या सोमयुक्त प्रातःकाळचे कर्म होत आहे म्हणून गौर मृगाचे परितृषित होत्साता त्या सोमातें प्राशन कर ॥

(६) हे रसवंत उत्तम प्रकारे सिद्ध केले सोम जे ते यज्ञाचे ठायी दर्भावर पात्रात ठेविले आहेत हे इंद्रा बळ प्राप्त व्हावया-कारणे तूं त्याते प्राशन कर ॥

(७) हे इंद्रा अम्ही केलेल्या श्रेष्ठ स्तोत्रविशेष तुझ्या मनामध्ये आला असता अत्यंत सुखकारक असो त्यानंतर सिद्ध केलेल्या सोमाप्रत प्राशन कर ॥

(८) शत्रु मारणारा जो इंद्र तो सोमपानार्थ त्या पानाच्या हर्षा कारणे संपूर्ण सिद्ध केलेल्या सोमयुक्त प्रातःकाळचे यज्ञाप्रत जात आहे ॥

(९) बहुकर्मन् इंद्रा तो तूं अमच्या ह्या इच्छित फळातें गाया घोड्यासह वर्तमान सर्वकाळ पूर्ण कर मग अम्हींहि उत्तम ध्यानयुक्त होत्साते तुजप्रत स्तवन करूं ॥''*

**डाक्तर मार्तिन हौग (इ. स. १८२५-७१)**

पुणे पाठशाळेतील संस्कृत भाषेचे मुख्य गुरू डाक्तर मार्तिन हौग यांनी वेदावर इंग्रजीत दोन व्याख्याने दिली. पहिलें व्याख्यान 'यंग मेन्स असोसिएशन पुढें' झालें. त्यातील काही भागाचें भाषांतर इ. स. १८६३ त प्रसिद्ध झालें. हौग साहेबाचें दुसरें व्याख्यान 'युनैटेड सर्व्हिस इन्स्टिटयूशन' या सभेपुढें झालें. त्याचें मराठी भाषांतर 'ब्राह्मणवर्णाचें मूळ' या नावानें इ. स. १८६४ त छापलें गेलें. त्या काळातील या दोन पुस्तकातच हिंदु धर्मग्रंथाची चिकित्सक दृष्टीनें माहिती दिली आहे. याशिवाय काशिनाथ बाळकृष्ण मराठे यांनी आपलें वेदावरील व्याख्यान इ. स. १८६९ त पुस्तकरूपानें प्रसिद्ध केलें.

**विष्णुबावा ब्रह्मचारी (इ. स १८२५-७१)**

विष्णुबावा ब्रह्मचारी यांनी इ. स. १८५९त आपला 'वेदोक्तधर्मप्रकाश' हा प्रख्यात ग्रंथ लोकहितार्थ प्रसिद्ध केला. 'वेदप्रतिपाद्य धर्म आबालवृद्धास कळावा अशा हेतूनें' ह्या ग्रंथात धर्मविषयक अनेक गोष्टींची प्रश्नोत्तर पद्धतीनें चर्चा केली आहे. विष्णुबावांची विचारसरणी स्वतंत्र पण अशास्त्रीय आणि विक्षिप्त आहे. त्यांचा धर्मग्रंथाचा अभ्यासहि बेताचाच असावा असें दिसतें. ईश्वरी साक्षात्कार झाल्यामुळें त्यांनी खऱ्या खऱ्या वेदप्रणीत धर्माचा प्रसार करण्याचें कंकण बांधलें होतें. त्यांचें संपूर्ण नाव विष्णु भिकाजी गोखले. त्यांचा जन्म कुलाबा जिल्ह्यात शिरवली गावीं इ. स. १८२५त झाला. घरच्या गरिबीमुळें यांना आरंभीं

* त्रिविद्या त्रिगुणात्मिका (भाग १) पृ० २४-२५.

काहीं दिवस शेतकी व नंतर कस्टम खात्यांत नोकरी केली. लहाणपणापासूनच त्यांची मनःप्रवृत्ति अंतर्मुख होती. कामधंद्याव्यतिरिक्त त्यांचा सारा काळ आत्मचिंतनांत जाई. वयाच्या विसाव्या वर्षी त्यांना साक्षात्कार झाला आणि पुढे तीन वर्षातच त्यांनीं भगवीं वस्त्रें धारण करून एकांतवास पतकरला. इ. स. १८६५ पासून त्यांच्या सार्वजनिक कार्याला आरंभ झाला. ते नामांकित वक्ते होते. त्यांनीं मिशनरी लोकांशीं वेळोवेळीं वाद करून त्यांच्या धर्मप्रसाराच्या चळवळीला अंशतः आळा घातला. इ. स. १८७१त ते काळपुळीच्या रोगानें दिवंगत झाले. त्यानीं ‘ वेदोक्तधर्मप्रकाश, ’ ‘ सेतुबंधनी टीका, ’ ‘ सुखदायक राज्यप्रकरणीं निबंध, ’ ‘ सहजस्थितीचा निबंध, ’ ‘ भावार्थसिंधु ’ इत्यादि दहाबारा लहानमोठे ग्रंथ प्रसिद्ध केले. त्यांच्या बहुमोल उपदेशाचा सुबोध सारांश मंगेश हरी नेरूरकर यांनीं इ. स. १८७४त प्रसिद्ध केला. बावांच्या विचारांची ठेवण लक्षात यावी म्हणून ‘ वेदोक्तधर्मप्रकाश ’ ग्रथांतील एक लहानसा उतारा उद्धृत करितोः—

> “ गणेशचतुर्थीस चंद्र पाहूं नये हा अर्थ वेदांतशास्त्रपर आहे. म्हणजे इंद्रिय गणाचा पती ( म्हणजे धनी ) जो आत्मा, त्याची जी शिवस्वरूपीं म्हणजे स्वस्वरूपीं रमण्याची तूर्या नांवाची चतूर्थ अवस्था आहे, तीच वरदचतुर्थी समजावी. अशा त्या अवस्थेत जाताना मनापासून पुरुषसूक्तात कथिल्याप्रमाणे झालेले मनाचे संकल्प जे चंद्ररूपी आहेत, त्याजकडे जो पाहील, तो जन्ममरणाच्या अपजाळांत पडेल. यास्तव तीन अवस्थारूपी सर्वकाळात मनाचे संकल्परूपी चंद्राकडे पाहणे तर पहा, कारण हा व्यवहारच आहे. परंतु जीवात्म्याची चवथी जी वरद अवस्था, ( म्हणजे चतुर्थी अवस्था ) तिच्या कालात आत्मा जो गणपती, त्याजकडेच सर्वानी लक्ष द्यावे, मनाचे संकल्परूपी चंद्राकडे पाहूं नये.या आत्मज्ञानाच्या स्मरणार्थ

.. १६

भाद्रपद शुद्ध चतुर्थीस बाह्य क्रिया स्मारक आहेत, व अवतार-पूजा आहे. यास्तव शाहणे लोकहो, वेदांतील वेदांतशास्त्राचा वेदोक्तधर्माच्या ग्रंथाना आधार आहे, म्हणूनच या वेदोक्त-धर्माच्या सर्व ग्रंथातील कल्पनांची एकवाक्यता करणे हें तर सहज आहे. पहा, कीं उन्मत्तपणाने बडबड करणाराच्याही शब्द चा वेदांततर अर्थ होतो, यास्तव वेदांताचा आधार धरा, आणि संशय-ज्याल जाळून तरा."†

## पुराणें

आबालवृद्ध हिंदुधर्मीयांच्या अंतःकरणावर पुराणग्रंथांचा विलक्षण पगडा असल्यामुळे त्यांचीं मराठींत भाषांतरें होणें क्रमप्राप्तच होते. गोविंद रघुनाथ केतकर यांनीं कृष्णशास्त्री साठे याच्या साह्याने इ. स. १८४५-४६ त स्कंदपुराणांतर्गत काशीखंडाचे गद्यात्मक भाषांतर प्रसिद्ध केलें. विष्णुबावा ब्रह्मचारी यांनीं 'चतुःश्लोकी भागवताचा अर्थ' ( इ. स. १८६७ ) मराठी भाषेंत लिहिला. जनार्दनाचार्य वळे, अनंताचार्य अष्टपुत्रे वगैरे मंडळींनीं प्राकृत गद्य—टीकेसहित मत्स्यपुराण ( भाग १-२; इ. स. १८७०-७४ ) छापण्याचा उपक्रम केला. निर्णयसागर छापखान्यांत 'वाल्मीकिरामकथा महोदया'चा पहिला खंड ( इ. स. १८७४ ) प्रसिद्ध झाला. रावजी श्रीधर गोंधळेकर यांनीं विद्वान् मंडळींच्या साह्यानें श्रीमन्महाभारतसाराचे दोन भाग ( इ. स. १८७३ ) प्रकाशित केले. याशिवाय ह्या काळात प्रसिद्ध झालेल्या पौराणिक बखरींची माहिती कथावाङ्मयाच्या प्रकरणात दिलेलीच आहे.

† वेदोक्तधर्मप्रकाश पृ. ७०४-७०५

धर्माच्या विविध अंगावर प्रकाश पाडणारीं अनेक पुस्तकें त्या काळीं प्रसिद्ध झालीं. 'आशौचविचार' या नांवाचें

**धर्मविषयक सामान्य ग्रंथ**

एक पुस्तक बाळकृष्ण भिकाजी राजवाडे यांनीं इ. स. १८४१ त लिहिले. त्यानंतर गंगाधरशास्त्री फडके याचा 'हिंदुधर्मतत्व' ( इ. स. १८५२ ) हा ग्रंथ प्रसिद्ध झाला. त्या काळांतील हा अत्यंत प्रख्यात आणि महत्त्वाचा धर्मग्रंथ आहे. इ. स. १८५८ त भर्तृहरीचे वैराग्यशतक आणि नीतिशतक प्राकृत टीकेसहित छापलें गेलें. सिताराम रावजी जुन्नरकर यांनी इ. स. १८६२ त 'परमधर्मतत्व' या नावाचा एक ग्रथ लिहिला. याचीं चार प्रकरणे असून त्यात 'हिंसानिषेध,' 'विपरीत-वाममार्ग-विडंबन' वगैरे विषयांचे विवेचन केले आहे. इ. स. १८७४ त बापूशास्त्री मोघे यानीं धर्मसिंधूचा साराश मराठीत लिहिला. याशिवाय 'प्रश्नोत्तरमालिका'( इ. स. १८६० ),'मुलांस उपदेश'( इ. स.१८६२ ), 'गुणसागर' ( इ. स.१८६८) इत्यादि धर्मपर ग्रंथ त्या काळांत प्रकाशित झाले. सृष्टिजन्य ईश्वरज्ञानाविषयींहि (Natural Theology), दोन पुस्तकें प्रसिद्ध झाली होतीं. न्यायमूर्ति रानडे यानीं आपल्या खालील अभिप्रायांत या काळातील उत्कृष्ट धर्मग्रंथाचा उल्लेख केला आहे. "The principles of the Hindu religion ( हिंदुधर्मतत्व ), the pleasures of the self-enjoying soul, and the Vedokta Dharma Prakas, represent the best portion of orthodox thought stated so as to be generally acceptable to all parties"*

ब्राह्मसमाजाच्या तत्वांचे प्रतिपादन करण्यासाठीं या काळीं दोन पुस्तकें लिहिलीं गेलीं. 'ब्राह्मधर्मप्रतिपादकवाक्यसंग्रह'

**ब्राह्मसमाज**

या नांवाचा एक ग्रंथ इ. स. १८७० त प्रसिद्ध झाला. यांत ब्राह्मसमाजाच्या तत्त्वाना पोषक अशा सर्व धर्मग्रंथांतील वाक्यांचा

* **M. G. Ranade**–*Remarks on the Marathi Catalogue.*

मराठींत संग्रह केला आहे. इ. स. १८७३ त विठ्ठल कृष्णाजी खेडकर यांनीं ' धर्मशिक्षा अथवा ब्राह्मधर्माची मूलतत्त्वें ' हें पुस्तक लिहिलें. त्यात १ ईश्वर एक व तोच पूज्य. २ नीतिपूर्वक सप्रेम ईश्वरभक्ति हाच धर्म. ३ मनुष्यमात्राचा पारमार्थिक धर्म एक होय. ४ प्रत्येक मनुष्यास विचार करण्याचं स्वातंत्र्य आहे. ५ नित्यनैमित्तिक कर्मे विवेकास अनुसरून असावी. ६ मनुष्यमात्राची एक ज्ञाति. ७ सर्वांस ज्ञानशिक्षा असावी अशा सात तत्त्वांचे प्रामुख्याने विवरण केले आहे.

## २

## नीति

**विदुर–नीति**

हिंदु संस्कृतीच्या दृष्टीने धर्म आणि नीति या एकाच नाण्याच्या दोन बाजू आहेत; त्यामुळे आमच्या नीतिविषयक कल्पना आमच्या धर्म–ग्रथांतूनच प्रगट झाल्या आहेत. इ. स. १८२३ साली मुंबई येथे कुरियर छापखान्यात विदुरनीति ' मूळ संस्कृतावरून महाराष्ट्र भाषेत गद्यरूप करून छापिली. ' 'नारदनीति' मुंबईसच मराठी भाषांतरासह इ. स. १८५८ त प्रसिद्ध झाली. " They ( विदुरनीति--नारदनीति ) represnt the highest moral and economical notions of the people on these subjcets, and serve the place of more systematic works " †

विदुरनीतीतील एक उतारा येथे सादर करितों—

" जसा सहवास करावा तसा गुण प्राप्त होतो. साधूचे संगाने साधु होतो. मूर्खाचे संगाने मूर्ख होतो. चोराचे संगाने चोर होतो.

† **M. G. Ranade** -*Remarks on the Marathi Cotalogue*

जसे शुभ्र धुतलेले वस्त्र ज्या रंगात घालावे तो रंग घेऊन उठते. स्वये कोणास छळित नाही व दुसऱ्याचे हातून छळवित नाही. आपल्यास उपद्रव आला असतांही जो दुसऱ्यास नडायाची इच्छा करित नाही. मग न झाल्यास नडत नाही म्हणून काय सांगावें. असा जो पुरुष त्याचे संगतीची देवही वाञ्छा करितात. मुके राहोंव त्यापेक्षा सत्य बोलावे हे बरं. सत्य असून प्रिय बोलावे हे त्याहून अधिक. सत्य प्रिय असून धर्मयुक्त बोलावे ते सर्वोत्कृष्ट. जश्या पुरुषाबरोबर बसतो. जशा पुरुषाची संगत करितो जशी स्थिति धरावयास इच्छितो तसा तसा पुरुष होतो. ज्या ज्या दुःखदायक गोष्टीपासून सुटायास इच्छील त्या त्या पासून सुटेल. जो सर्व प्रपंच सोडील त्याला काडिमात्रही दुःख होणार नाही. जे जे साधील ते ते साधेल. पुरुषास असाध्य काहीच नाही. या प्रकारें आत्रेय-ऋषि साध्य देवाशी बोलून तपोवनास जाता जाहाला."‡

मुंबईच्या शिक्षामंडळीने इ. स. १८३१ त ( आवृत्ति ३ री ) 'मराठी बोधवचनें' प्रसिद्ध केलीं; त्यांत 'मोठे पहाटेस उठून ईश्वराचे स्मरण करावे,' 'द्रव्याचे सार्थक हेच कीं, परोपकार घडावा' अशा तऱ्हेची बोधपर वाक्ये आहेत, दे. अ. इजदेल साहेबाच्या ग्रंथावरून मेजर क्याडी यांनीं 'नीतिज्ञान-परिभाषा' ( इ. स. १८३१ ) हा ग्रंथ लिहिला, याशिवाय 'नीतिशतक' ( इ. स. १८५३ ), 'नवीन लघुहितोपदेश' ( इ; स; १८५४ ), 'पन्दनामा' ( इ. स; १८५८ ) इत्यादि पुस्तकें प्रसिद्ध झालीं.

**राजनीति**

राजनीतिसंबंधींहि त्या काळी तीनचार पुस्तके प्रसिद्ध झाली. इ. स. १८४७ त रानडये, माळवकर आणि सबनीस या त्रिवर्गानें बाळकृष्णशास्त्री यांचे सहाय्यतेनें गद्यात्मक प्राकृत टीकेसह वृद्धचाणाख्यग्रंथ प्रसिद्ध केला; यानंतर धार येथें

‡ विदुरनीति पृ. ५४-५५

इ. स. १८६७ त गणपत गंगाधर यांनी शार्ङ्गधरपंडितविरचित नीतिपद्धति नामक ग्रंथाचें मराठींत भाषांतर केलें. सरदार रघुनाथराव विठ्ठल विंचूरकर यानीं इ. स. १८६९ त 'महाभारत ग्रंथांतील राजधर्म' प्रकरणाचें मराठी भाषांतर प्रसिद्ध केलें. यांतील एक उतारा खालीं सादर करितो---

> भीष्म म्हणतात हे राजा, धनुष्याचे धारण, शत्रूचा नाश, कृषिकर्म, वाणिज्य, पशूंचे पालन, द्रव्याकरितां इतर वर्णांची सेवा, राजाची चाकरी, कपटवंचना इत्यादिक, परस्त्रीगमन, धान्याच्या वाढीने जीवन, हीं कर्मे ब्राह्मणास अति निंद्य आहेत; यास्तव अशी कर्मे करणारा, वृषलीपति, चाहाडी करणारा, नृत्य करणारा, निर्मर्याद असा ब्राम्हण वेदाभ्यास करो किंवा न करो तो केवळ शूद्रच असे मानून दासादिकांस पंक्तिबाहेर बसवून भोजनास घालितात त्यासारखे त्या ब्राम्हणांस पंक्तिबाहेर भोजन घालावे आणि श्राद्धहोमादि कृत्यात सर्वदा वर्जावा व दानादिकहि त्यास देऊं नयेत. तस्मात् ब्राम्हणाला बाह्याभ्यंतर शुद्धि व इंद्रियनिग्रह असून ब्रम्हचर्यादि आश्रमधर्मांचें यथार्थ पालन हे मुख्य धर्म आहेत. यास्तव जो जितेंद्रिय, यज्ञ करून सोमपान करणारा, सुशील, दयावान्, शीतोष्णादि: सहन करणारा, आशारहित, दुसऱ्याचा घात न करणारा, असा जो त्यासच ब्राह्मण असें म्हणावें."†

श्रीमत्भगवद्गीतेवर या काळांत तीन चार गद्यात्मक प्राकृत टीका प्रसिद्ध

**श्रीमत्भगवद्गीता**

झाल्या. इ. स. १८३९ त 'भावचंद्रिका--श्रीकृष्णार्जुन संवाद' या नांवाने बाळजी सुंदरजी यांनीं रामचद्रशास्त्री मुंडले यांचें सहाय्यानें भगवद्गीतेचें मराठीत शब्दशः भाषांतर प्रसिद्ध केले. त्यांतील एक उतारा खालीं देत आहे.

---

† महाभारस ग्रंथांतील राजधर्म पृ. ४६

" अल्पमति पुरुष वेदवादी रत होत्साते, क्षणभंगुर स्वर्गसुखाला, आत्मज्ञान आणि तत्फल मोक्ष यांहून अधिक मानून त्यापरतें दुसरे कांहीं नाहीं असें म्हणतात; आणि अमृतपान पावूं, अजरामर होऊं, इत्यादिक जीं पुष्पित वाक्ये त्यांहीकरून भूलूं जन्मकर्म देणारी आणि नानाप्रकारचा कर्मानीं व्याप्त अशा भोगैश्वर्य प्राप्तीची इच्छा करितात. परंतु हा त्यांचा निश्चय अविचार सिद्ध आहे. अशा पुरुषांची चित्तवृत्ति एकाग्र होत नाही. ४४ वेद तीन गुणाचा कार्याचें प्रतिपादन करितात. तूं त्रैगुण्यातीत हो. आणि द्वंद्वरहित तसाच निरंतर सत्वस्त राहा. श्रम आणि काळजी याते टाक आणि जितचित्त हो. ४५ भरपूर जलाशयांत जितुकें स्नानादिक प्रयोजन घटमात्र जलानें होतें, तितुके जाणत्या जिज्ञासूला सर्व वेदीं, उपनिषद्भागानें होते."४६*

त्यानंतर बापसोबा श्रीकृष्णजी क्षत्री यांनी सदाशिवशास्त्री फाळके त्र्यंबककर यांच्या सहाय्यानें 'पदबोधिनी गीता' (इ. स. १८५३) हें पुस्तक प्रसिद्ध केलें. त्यांत गीतेचा अन्वय लावून मराठी भाषेंत पदशः अर्थ दिला आहे.

**रघुनाथशास्त्री पर्वते**

रघुनाथशास्त्री पर्वते यानी 'भाषाविवृतिसहितगीता' हा ग्रंथ इ. स. १८६० त छापला त्यांत गीताशास्त्रावर श्लोकवार मार्मिक टीका केली आहे. यांतील एका श्लोकावरील टीका खालीं देत आहे:—

"विषयांचे ठायीं ज्ञान्याची दृष्टि नाही तर त्यास विषयभोग कसा होतो अशी शंका होईल तर त्याविषयीं सांगतात।। अनंत

---

* भावचंद्रिका--श्रीकृष्णार्जुनसंवाद पृ० १५--१६

नद्यांनी पूर्ण झाला तरीं ज्याची मर्यादा चंचल होत नाहीं अशा समुद्रात दुसरीं उदकें जशीं प्रवेश करितात तसे अंतर्दृष्टि जो ज्ञानी त्याप्रत प्रारब्धकर्माने अवश्य प्राप्त होणारे सर्व काम म्हणजे सर्व विषय किंवा त्यांचे भोग किंवा त्यांविषयींच्या इच्छा ह्या प्राप्त होतात ॥ तो ज्ञानी समुद्र जसा नद्यादिकांचे दुसरें उदकानें चंचल न होतां पूर्वीची अवस्था सोडीत नाहीं तसा प्रारब्धकर्माने विषयभोग करीत असताही ब्रह्मनिष्ठेपासून चंचल न होता प्रारब्ध कर्म–भोग देऊन–समाप्त झाल्यानंतर शांतीप्रत म्हणजे विदेह कैवल्याप्रत पावतो ॥ विषयांची इच्छा करणारा शांती पावत नाहीं ॥ ७० ॥"†

याशिवाय शिवराम भास्कर काणे यानींहि इ. स. १८६८ त 'गीतार्थमंजरी' हा ग्रंथ लिहिला.

**इतर ग्रंथ**

रेव्हरंड जे. स्टिव्हेन्सन यानी इ. स. १८५२ त 'काल्पनिक विज्ञानाविषयीचें संक्षेपेंकरून कथन' हे पुस्तक प्रसिद्ध केले. यात जगांतील अनेक तत्त्ववेत्यांची मते व सिद्धांत सकलित केले आहेत. ग्रंथकर्त्याने आपला उद्देश खालील वाक्यांत व्यक्त केला आहे.

"In the present day it is necessary that all well educated persons should have a general idea of the different systems of speculative philosophy that prevail, and have prevailed in the world. such a general idea it is our wish to present, divesting the subject as far as possible of technicalities ,and using the plain and simple language of ordinary intercourse"

---

† भाषाविवृतिसहित गीता (अ. २ श्लो. ७०) पृ० ३९

यानंतर जनार्दन रामचंद्रजी यांनी इ. स. १८६७ त सदानंदस्वामीकृत 'वेदांतसार' या संस्कृत ग्रंथाचें मराठींत भाषांतर केलें. ह्यांत वेदांतशास्त्राची मूळ तत्त्वें संक्षेपरीतीनें वर्णिली आहेत. हा ग्रंथ सर्व वेदांतविषयाच्या ग्रंथामध्यें 'लघु असून प्रधान व व्यापक' आहे. रघुनाथशास्त्री अभ्यंकर यांनी 'श्रीमद् विद्यारण्यविरचित पंचदशी' या ग्रंथाची महाराष्ट्र व्याख्या इ. स. १८७३ त प्रसिद्ध केली. ही टीका मुख्यतः रामकृष्ण पंडिताच्या संस्कृत टीकेच्या आधारानें केली आहे. याशिवाय ह्या काळांत 'आत्म्याचे अमरत्वाविषयीं' (इ. स. १८५५), आणि 'ब्रह्मविचार' (इ. स. १८७०) हे दोन तत्त्वज्ञानविषयक ग्रंथहि प्रसिद्ध झाले.

---

# परिशिष्ट

## धर्म

### श्रुतिविषयक—

१. त्रिविद्या त्रिगुणात्मिका–( ऋग्वेदाचें भाषांतर ) रेव्हरंड जे. स्टिव्हेन्सन मुंबई, इ. स. १८३२

२. वेदोक्तधर्मप्रकाश–( स्वतंत्र ग्रंथ ) विष्णुबावा ब्रह्मचारी मुंबई, इ. स. १८५९

३. वेदाविषयीं–( मार्तिन हौग यांच्या व्याख्यानाचें व निबंधाचें भाषांतर ) एक स्वदेशहितेच्छु मुंबई, इ. स. १८६३

४. ब्राह्मणवर्णाचे मूळ—( मार्तिन हौग यांच्या व्याख्यानाचें भाषांतर ) एक स्वदेशहितेच्छु, मुंबई, इ. स. १८६४ (ब्रि.म्यु.)

५ पुरुषसूक्तव्याख्या—स्वधर्महितेच्छु मुंबई, इ. स. १८६४(ब्रि.म्यु.)

६. वेदाविषयीं निबंध—( व्याख्यान ) काशिनाथ बाळकृष्ण मराठे, नागपूर, इ. स. १८६९ (इं. ऑ.)

७. वेदोक्तधर्माचा विचार—मंगेश हरी नेरुरकर, मुंबई, इ. स. १८७४ (इं.ऑ)

## पुराणें—

८. काशीखड ( स्कंद पुराणांतर्गत ) गोविंद हरी केतकर,
( सहाय्यक–कृष्णशास्त्री साठे ) मुंबई, इ. स. १८४५–४६(ग्रां.कॅ.)

९. व्रतप्रकाश—प्र.–नारायण मोरेश्वर केळकर,
इ. स. १८६२ ( म. वा.)

१०. विष्णुसहस्रनामाचा अर्थ—काशीनाथशास्त्री आगाशे,
इ. स. १८६४ (म.वा.)

११. संक्षिप्त गुरुचरित्र— इ. स. १८६५ (म. वा.)

१२. मारुतीची खबर—( प्र. बुद्धिप्रकाश छापखाना ) पुणें
इ. स. १८६५ (म.वा.)

१३. अनंतकथा—( बुद्धिप्रकाश छापखाना ) पुणें
इ. स. १८६६ (म. वा.)

१४. चतुःश्लोकी भागवताचा अर्थ—विष्णुबावा ब्रह्मचारी
मुंबई, इ. स. १८६७

१५. मत्स्यपुराण—जनार्दनाचार्य वळे व अनंताचार्य अष्टपुत्रे
( भाग १-२-३ ) पुणें, इ. स. १८७०–७४

१६. श्रीमन्महाभारतसार—(भाग १–२) प्र.–रावजी श्रीधर
गोंधळेकर, पुणें, इ. स. १८७३

१७. वाल्मीकिरामकथामहोदयं (खंड १ ला)—निर्णयसागर प्रेस,
मुंबई, इ. स. १८७३

## धर्मविषयक सामान्य ग्रंथ—

१८. आशौचविचार—बाळकृष्ण भिकाजी राजवाडे,
इ. स. १८४१

१९. हिंदुधर्मतत्व—गंगाधरशास्त्री फडके, मुंबई, इ. स. १८५२ (ग्रां. कॅ.)

२० वैराग्यशतक—( भर्तृहरीकृत-सटीक ) मुंबई इ. स. १८५८ (ब्रि. म्यु.)

२१. प्रश्नोत्तरमालिका—( संस्कृत मराठी )
मुंबई, इ. स. १८६० (ब्रि. म्यु.)

२२. परमधर्मतत्व—सिताराम रावजी जुन्नरकर,
मुंबई, इ. स. १८६२

२३ मुलास उपदेश—विनायक कोंडदेव ओक,
पुणे, इ. स. १८६२ ( ग्रां. कॅ.)

२४ गुणसागर—आपाजी लक्ष्मण टिकेकर,
मुंबई, इ. स. १८६८ (इ. ऑ.)

२५ धर्मविवेचन—एक जगद्वासी आर्य, मुंबई इ. स. १८६८ ( इ. ऑ.)

२६ विचारसागर—गणेश सखाराम हरचरे इ. स. १८७१

२७ प्रश्नोत्तरशेखर—रावजी श्रीधर गोंधळेकर,
पुणे, इ. स. १८७१

२८ धर्मसिंधुसार—(मराठी टीकेसहित ) बापूशास्त्री मोघे,
इ. स. १८७४ (ब्रि. म्यु.)

## सृष्टीजन्य ईश्वरज्ञान—

२९ सृष्टिजन्य ईश्वरज्ञान—पांडुरंग गणोबा, मुंबई इ. स. १८४२

३० सृष्टिजन्य ईश्वरज्ञान—बॉम्बे ट्राक्ट आणि बुक सोसैटी,
मुंबई, इ. स. १८६३

## ब्राह्मसमाज

३१ ब्राह्मधर्मप्रतिपादकवाक्यसंग्रह—( मराठी भाषांतरासह )
मुंबई, इ. स. १८७० (इ.ऑ.)

३२ धर्मशिक्षा अथवा ब्राह्मधर्माची मूलतत्त्वे ( बंगालीवरून )
विठ्ठल कृष्णाजी खेडकर, मुंबई, इ. स. १८७३

## नीति

३३ विदुरनीति—कुरियर छापखाना, मुंबई, इ. स. १८२३

३४ मराठी बोधवचने—( आवृत्ति ३ री )
मुंबई, इ. स. १८३१

३५ नीतिज्ञानपरिभाषा—( Principles of morality )
मेजर—क्याडी ( आवृत्ति २ री ) पुणे, इ. स. १८३१ (ग्रा.कॅ.)

३६ नवीन लघुहितोपदेश— मुंबई, इ. स. १८५४ ( ग्रां. कॅ.)

३७ नीतिशतक—( भर्तृहरीकृत, मराठी टीकेसहित )
मुंबई, इ.स. १८५८ ( ब्रि. म्यु.)

३८ नारदनीति मुंबई, इ. स. १८५८ (ब्रि. म्यु.)

३९ पदनामा— पुणे, इ. स. १८५८ (ग्रा. कॅ.)

## राजनीति

४०. वृद्धचाणाक्य— रावजी भास्कर रानड्ये, धोंडो मोरेश्वर मावळंकर, नारो पांडुरंग सबनीस मुंबई, इ. स. १८४७

४१. नीतिपद्धति—( शार्ङ्गधरपंडितविरचित ) मराठी
भाषांतर—गणपती गंगाधर, धार. इ. स. १८६७

४२. संस्कृत महाभारत ग्रंथातील राजधर्म—सरदार रघुनाथराव विठ्ठल विंचूरकर, मुंबई, इ. स. १८६९

४३. सुबोध राजनीति -नारायण भिकाजी नेने, मुंबई, इ. स. १८७२

## तत्त्वज्ञान

### भगवद्गीता

४४ भावचंद्रिका—श्रीकृष्णार्जुनसंवाद—बाळजी सुंदरजी (रामचंद्रशास्त्री मुंडले याचें साह्याने ) मुंबई, इ. स. १८३९

४५. पदबोधिनी गीता—(अन्वयार्थ) बापसोबा श्रीकृष्णजी क्षत्री ( सदाशिवशास्त्री फाळके यांच्या साह्यानें ) मुंबई, इ. स. १८५३

४६ भाषाविवृतिसहित गीता—रघुनाथशास्त्री पर्वते पुणें, इ. स. १८६०

४७ गीतार्थमंजरी—शिवराम भास्कर काणे,रत्नागिरी इ. स. १८६८

### सामान्य ग्रंथ

४८ काल्पनिक विज्ञानाविषयींच संक्षेपेकरून कथन. रेव्हरंड जे. स्टिव्हेन्सन मुंबई इ. स. १८५२

४९ आत्म्याचे अमरत्वाविषयीं—गोविंद गंगाधर. मुंबई, इ. स. १८५५ (ग्रां. कॅ.)

५० वेदान्तसार ( मराठी भाषांतर ) जनार्दन रामचंद्रजी मुंबई, इ. स. १८६७

५१ ब्रह्मविचार ( संस्कृत—मराठी ) वासुदेव आत्माराम
मुंबई, इ. स. १८७०(इं.ऑ.)

५२ पंचदशी— ( मराठी भाषांतर ) रघुनाथ शंकरशास्त्री
अभ्यंकर, मुंबई. इ. स. १८७३

---

# ९ शास्त्रीय व कलाविषयक वाङ्मय

**भौतिक शास्त्रांच्या ज्ञानाविषयीं उदासीनता**

जग मिथ्या आहे, संसार असार आहे, आयुष्य क्षणभंगुर आहे अशा तऱ्हेच्या मायावादी विचारसरणीमुळे मध्यन्तरीच्या काळात हिंदुस्थानातील लोक भौतिक शास्त्राच्या ज्ञानाविषयी उदासीन होते. इह लोकीच्या नश्वर वैभवापेक्षा परलोकातील शाश्वत सुखाची विवचना करण्यांतच आमच्यातील विचारवंत गढून गेलेले असत. सृष्टींतील अनंत चमत्कारांचा शोधपूर्वक अभ्यास करण्यापेक्षा भक्तियुक्त अंतःकरणाने सृष्टिकर्त्याच्या सगुण स्वरूपाचे ध्यान करणेच त्याना अधिक श्रेयस्कर वाटे. यामुळे एकोणिसाव्या शतकाच्या आरंभापर्यंत हिंदुस्थानांतील इतर भाषाप्रमाणे मराठी भाषेतहि शास्त्रीय ग्रंथलेखनाचा परिपाठ पडला नाही.

**परंपरागत शास्त्रें-वैद्यक आणि ज्योतिष**

इतिहासाचार्य वि. का. राजवाडे यानी भा. इ. स. मंडळाच्या षाण्मासिक वृत्तातात* मराठी गद्याविषयीं एक निबंध लिहिला होता. त्यांत त्यांच्या संग्रही गणित-ज्योतिष, फल-ज्योतिष आणि वैद्यक या विषयाचे प्राचीन गद्यग्रंथ असल्याचा त्यानी उल्लेख केला आहे. वैद्यक आणि ज्योतिष ही

* भा. इ. स. मंडळ—षाण्मासिक वृत्त ( शके १८३४ ) पृ. १३१.

दोन्ही शास्त्रे आर्यावर्तात फार उच्च दशेला जाऊन पोहोंचलीं होती आणि त्यासंबंधी संस्कृत भाषेत बरेंच ग्रंथहि लिहिले गेले. उपरिनिर्दिष्ट मराठी पुस्तकें हीं ह्या संस्कृत ग्रंथांचींच भाषांतरें असलीं पाहिजेत. याव्यतिरिक्त मराठी भाषेत शास्त्रीय ग्रंथलेखनाचा प्रयत्न झाल्याची माहिती कोठेंहि आढळत नाहीं.

**शास्त्रीय ग्रंथलेखनाचा उपक्रम**

इंग्रजी अंमल सुरू झाल्यानंतर इ. स. १८२० पासून मुंबई सरकारनें शिक्षणप्रसाराचें कार्य हातीं घेतलें. देशी भाषाच्या द्वारें एतद्देशीय लोकांना भौतिक शास्त्राचें ज्ञान करून देणें हेंहि या नवीन शिक्षणक्रमातील एक प्रमुख अंग होतें. शाळातील विद्यार्थ्यांना शास्त्रीय विषय शिकविताना क्रमिक पुस्तकाची उणीव भासूं लागली, आणि ती भरून काढण्यासाठी इंग्रजी पुस्तकाच्या आधाराने मराठी भाषेंत शालोपयोगी शास्त्रीय ग्रंथ प्रसिद्ध होऊं लागले. प्रत्येक शास्त्राची परिभाषा नवीन तयार करण्याचे काम अत्यंत बिकट व त्रासदायक असल्यामुळे ह्या काळातहि शास्त्रीय वाङ्मयाची वाढ मंद गतीनेंच झाली असल्यास नवल नाही. मराठी भाषेतील सुरवातीच्या शास्त्रीय ग्रंथात प्रतिपाद्य विषयाचें सागोपांग विवेचन केलेले आढळत नाही. विद्यार्थ्यांच्या मनात त्या त्या शास्त्राविषयीं जिज्ञासा जागृत करण्याच्या उद्देशानेंच हे ग्रंथ लिहिले गेले. स्वतंत्र ग्रंथाखेरीज दिग्दर्शन, मराठी ज्ञानप्रसारक व त्रैमासिक ज्ञानदर्शन या मासिकांतील अनेक मनोरंजक व उपयुक्त लेखांमुळेहि शास्त्रीय वाङ्मयात बरीच भर पडली.

## वैद्यक

मराठी वाङ्मयातील शास्त्रीय विभागांत वैद्यकीय ग्रंथाची संख्या सर्वात अधिक आहे.† मुंबईचें ग्रांट मेडिकल कॉलेज इ. स. १८३८ सालीं स्थापन

---

† "Under Science proper medicine appears to have attracted the chief attention."

**M. G. Ranade**—'*The Growth of Marathi Literature.*'

...१७

झालें. या कॉलेजात इंग्रजी वैद्यक मराठी भाषेच्या द्वारें शिकाविण्याचे वर्ग असत. यांतील विद्यार्थ्यांच्या उपयोगासाठीं तेथील शिक्षकांनीं इंग्रजी ग्रंथांच्या आधारानें मराठी भाषेत सातआठ पुस्तकें लिहिलीं. याशिवाय संस्कृत भाषेतील वैद्यकीय ग्रंथांचींहि मराठी भाषांतरें प्रसिद्ध झालीं.

**जॉन मॅक्लेनन**

डॉ. जॉन मॅक्लेनन यांनीं इ. स. १८२८ त 'औषधकल्पनाविधि' आणि 'निदान' हे दोन भाषांतरात्मक ग्रंथ लिहिले. 'औषधकल्पनाविधि' या ग्रंथांत पाश्चात्य आणि पौरस्त्य औषधांचें वर्णन असून त्यांची लॅटिन, इंग्रजी, प्राकृत, संस्कृत, हिंदुस्थानी, फारशी व आरबी इतक्या भाषांतील नांवें दिली आहेत. निदानावरील ग्रंथांत रोगांच्या मुख्य जाति, त्यांचे पोटभेद आणि प्रत्येक रोगाची ठळकठळक लक्षणे सांगितलीं आहेत. जॉन मॅक्लेनन हे मुंबईस आसिस्टंट सर्जन व नेटिव मेडिकल स्कूलचे सुपरिंटेंडेट होते. त्यांच्या 'निदान' या ग्रंथांतील एक लहानसा उतारा सादर करितों.

"**मुखमौक्तिक. ल० आपुथे. ई. थ्रश्.**

पूर्वीं जिव्हा सुजलेलीशी होऊन तिचा व तोडांतील पदार्थाचा वर्ण मेचकसा होतो, नंतर ओष्ठ जिव्हा आतडे यांचे ठायीं मुग गुंज जोंधळा याचे इतके मोटे वर्तुलसे मोत्यासारिखे असे फोड होतात. ते कधि निरनिराळे व कधि संलग्न असतात व एकदां जाऊन पुनः होतात. व त्यांजपासून दह्याचे सार्यासारखा पदार्थ निघतो. या रोगाला मुसलमान छारु व निनान्व म्हणतात. त्याचे स्वतंत्र आणि परतंत्र असे दोन प्रकार आहेत.

१ **स्वतंत्र**—हा बालांनाच होतो. यांत मुखापासून आंतड्यापर्यंत फोड होत जातात व याजबराबर किंचित् ज्वर असतो.

**परतंत्र**—हा बालांस व मोठ्यें मनुष्यांस होतो. याचे फोड बहुतकरून गळ्यापासून तोंडांत होत येतात. ते कधि काळेसे होतात व निर्बलपणा फार होतो. सन्निपात ज्वर येतो. " ‡

**निघंटप्रकाश**
**निघंटरत्नाकर**

बापू गंगाधर जोशी यांनी चिंतामण जोशी वैद्य व रामचंद्रभट्टयोगी याच्या साह्यानें इ. स. १८३९ त 'निघंटप्रकाश' या नांवाचा एक विस्तृत ग्रंथ लिहिला. गुणदोषप्रकरण, परिभाषाप्रकरण, परीक्षाप्रकरण, दिनचर्या, शारीर, निदान, धातूपधातु, चिकित्सा आणि पथ्यापथ्य अशीं या ग्रंथाचीं एकंदर नऊ प्रकरणे आहेत. याच धर्तीचा 'निघंटरत्नाकर'हा ग्रंथ दातार, ताम्हनकर, महाबळ आणि पाटील या चौघांनी शेठ हंसराज करमसी यांच्या साह्यानें इ. स. १८६७ सालीं तीन भागांत प्रसिद्ध केला.

**कृष्णशास्त्री भाटवडेकर**

कृष्णशास्त्री भाटवडेकर यानीं संस्कृत ग्रंथांवरून ' वैद्यावतंस ' ' वैद्य-जीवन, ' ' वैद्यामृत, ' त्र्यंबकी '. इत्यादि पांचसहा ग्रंथ लिहिले, आणि मराठी वाङ्मयाच्या वैद्यक शाखेंत बहुमोल भर घातली. कृष्णशास्त्री हे डॉ. भालचंद्र कृष्ण भाट-वडेकर ह्यांचे वडील, " हे चांगले वैद्य, चांगले व्युत्पन्न आणि इंग्रजी चांगले शिकलेले होते. आकाशसौंदर्य, माधवनिदान, वैद्यसारसंग्रह, मेघदूतकाव्य, सुभाषितरत्नाकर, इत्यादि कितीएक ग्रथ त्यांनीं लिहिलेले प्रसिद्ध आहेत. "* यांच्याइतकी विस्तृत व भारदस्त स्वरूपाची ग्रथरचना त्या काळीं फारच थोड्या लोकांच्या हातून झाली आहे.

---

‡ निदान—पृ. ३३.

* बालबोध ( डिसेंबर १८९५ ) पृ. १९४.

**पांडुरंग गोपाळ मंत्री**

पांडुरंग गोपाळ मंत्री यांनी इ. स. १८६८ साली " महामारीच्या रोगावर लोकोपयोगी सूचना " या नावाचें एक लहानसें पुस्तक प्रसिद्ध केलें, त्यानंतर इ. स. १८७२ त त्यांनी 'बालरोगचिकित्सा' हा ग्रंथ लिहिला. "यांत डाक्तर स्थान्नर ह्याच्या बालरोगाच्या ग्रंथाचा बराच आधार घेतला आहे...ठिकठिकाणी वैद्यकसंबंधी शब्दांची परिभाषा, प्राचीन संस्कृत वैद्यक ग्रंथात जी उपलब्ध आहे तीच घेतली आहे " * या पुस्तकावर 'दंभहारक' मासिकांत विस्तृत अभिप्राय¶ प्रसिद्ध झाला होता.

**गोपाळ शिवराम वैद्य (इ स. १८४०-९०)**

गोपाळ शिवराम वैद्य यांनी इंग्रजी ग्रंथाच्या आधाराने 'शस्त्रवैद्यक' ( Surgery ) आणि 'न्यायवैद्यक' ( Medical Jurisprudence ) हे दोन ग्रंथ लिहिले. ग्रांट मेडिकल कॉलेजात वरील दोन्ही विषयाचे ते शिक्षक होते. त्यांचे इंग्रजी शिक्षण मुंबईस एलफिन्स्टन विद्यालयात झाले. पुढें त्यांनीं मेडिकल कॉलेजांतील पगारी विद्यार्थ्याची जागा मिळवून आपला वैद्यकीय शिक्षणक्रम पुरा केला. इ. स. १८६४ त त्यांना एल्. एम्. ही पदवी मिळाली. याच वर्षी बाटलीवाल्याच्या दवाखान्यात असिस्टंट सर्जनच्या जागीं त्यांची नेमणूक झाली. या काळी मुंबईतील नामांकित शस्त्रवैद्यात त्यांची गणना होत असे.

**सखाराम अर्जुन (इ. स. १८३९-८५)**

डॉ. सखाराम अर्जुन यांनी 'वैद्यतत्व' आणि 'गर्भविद्या आणि प्रसूतिकरण ' हे दोन ग्रंथ लिहिले. यांचे शिक्षण मुंबईस एल्फिन्स्टन विद्यालयात झाले. इ. स. १८६३ त त्यांनी एल. एम्. ची पदवी मिळविली. हे " ग्रांट मेडिकल

* प्रस्तावना—बालरोगचिकित्सा.

¶ दंभहारक पु. २ अ. ६.

कॉलेजात वनस्पतिशास्त्राचे प्रोफेसर, व्हाक्सिनेशन खात्याचे सुपरिंटेंडेंट, नामदार व्हाइसराय साहेबांचे ऑनररी असिस्टंट सर्जन, आणि मुंबई युनिव्हर्सिटीचे फेलो होते; इतकेच नाहीं, तर वैद्यकीच्या संबधानें यांची मुंबई शहरांत जितकी चहा होती, तितकी डाक्तर भाऊ दाजींचे मागे थोड्याच डाक्तराची होती. " † यांच्या 'वैद्यतत्व' या ग्रथातील एक उतारा खाली देत आहे—

" शुचिर्भूतपणाची आवश्यकता वाढवून सागणे तर अवघडच आहे. सर्वांग प्रत्यहीं धुवावे आणि धुतेवेळीं यथास्थित चोळावे. बहुतेक लोकांस ऊन पाण्यापेक्षा थंड पाणी चागले; परंतु नाजुक मनुष्यास शीतोदक स्नान नेहमी सोसत नाहीं. स्नान केल्यानंतर शिरशिरी आलीशी वाटली, तर थंड पाण्याबद्दल कोंबट पाणी घ्यावे. उत्तरेकडील लोकाच्या धर्मशास्त्राप्रमाणे त्यास वारंवार स्नानें करावीं लागतात, त्यावरून हिंदुस्थानामध्ये मलीनता हे रोगाचे साधारण कारण नाहीं, असे वाटेल; परंतु हीं स्नानें वास्तविक असण्यापेक्षा केवळ आचारनिमित्तानें असतात. मलीन वस्त्रे वापरणे, आणि ज्या घरात सर्व प्रकारची घाण साचून राहिली आहे, अशा घरात राहणे, ह्या चालीबरोबर ती चालत असतात, आणि सर्व एतद्देशीय लोकामध्ये असे एक ठेंग मत आहे की, ज्या रोगामध्यें ज्वर असतो, त्यात स्नान केलें असतां मोठी दुखापत होते; म्हणून ज्यानां आठवड्याचे आठवडे किंवा महिनेही अंग धुण्याची उपेक्षा केली आहे, असे लोक पुष्कळ पाहाण्यात येतात, व ते उंचवर्णातही असतात. " *

† वि. ज्ञा. वि. पु. १७ अं. १०

* वैद्यतत्व पृ. १७०.

जनार्दन हरी आठल्ये यांनीं इ. स. १८६१ त ‘ Domestic Guide to Mothers in India ’ या इंग्रजी ग्रंथाच्या आधारें ‘ बालवैद्य ’ या नांवाचें एक लहानसें पुस्तक प्रसिद्ध केले. इ. स. १८६५ त नारायण दाजी यांनीं ‘ औषधिविद्या ’ नामक ग्रंथ लिहिला. याशिवाय ‘अमृतसागरवैद्यकग्रंथ,’ ‘आरोग्यचिंतामणि,’ ‘स्त्रियांचे विकार, वनौषधिसंग्रह’ इत्यादि अनेक लहानमोठे वैद्यकीय ग्रंथ ह्या काळांत प्रसिद्ध झाले.

**शारीरशास्त्र इंद्रियविज्ञानशास्त्र**

जॉन मॅक्लेनन् यांनी इ. स. १८५२ त शारीरशास्त्रावर एक लहानसें भाषांतरात्मक पुस्तक प्रसिद्ध केलें. त्यानंतर भिकाजी अमृत चोभे यांनीं इ. स. १८६३ सालीं ‘ मानुषशारीरशास्त्र ’ या नांवाचा एक विस्तृत ग्रंथ लिहिला. ह्यांत ग्रांट मेडिकल कॉलेजांतील मराठी वर्गांमध्ये दिलेल्या त्यांच्या छत्तीस व्याख्यानांचा सारांशरूपाने समावेश केला आहे. इ. स. १८६५ त त्याचा ‘ मानुष इंद्रियविज्ञानशास्त्र ’ हा ग्रंथ प्रसिद्ध झाला. यांत मानवी शरीराच्या निरनिराळ्या इंद्रियांची रचना व क्रिया ह्यांविषयीं सविस्तर वर्णन केलें आहे. हा ग्रंथ प्रथम इंग्रजींत लिहिला आणि मग त्याचे मराठींत भाषांतर केले. व्यंकट रंगो कट्टी यांनीं डॉक्टर कार्पेंटर यांच्या इंद्रियविज्ञानशास्त्रावरील इंग्रजी ग्रंथाच्या आधारें ‘ नरतनु ’ या या नांवाचे पुस्तक प्रसिद्ध केलें. त्यावर वि. ज्ञा. विस्तारांत * डॉ. सखाराम अर्जुन यांनीं परीक्षणात्मक लेख लिहिला होता. भिकाजी अमृत चोभे यांच्या ‘ मानुष इंद्रियविज्ञानशास्त्र’ या ग्रंथांतील एक उतारा येथें सादर करितों.

* वि. ज्ञा. वि. पु. ४ अं. ४.

" मनुष्याचें अन्न प्राणिज व उद्भिज्ज अशा पदार्थांचें मिश्रण असावें अशी ईश्वरी योजना आहे, व त्यांच्या दंताच्या व आंतड्याच्या स्थितीवरून व अनुभवावरून ती प्रदर्शित होतें. मांसाहारी प्राण्यांचें अन्न इतर प्राण्यांच्या शरीरातल्या रक्तमांसादि पदार्थांनीं झालें असतें त्यांत मांसाहारी प्राण्यांचे रक्तमांसादि भाग घटित करणारीं मूलतत्वें असतात, व तीं तत्वें प्रायशः ह्यांच्या शरीरांतल्या तत्वाप्रमाणेंच संयोग पावलेलीं असतात. हे अन्न रक्ताशीं मिळून त्यास पुन्हा सेंद्रियस्थिति प्राप्त होण्यास त्याचें द्रावण होणे मात्र अवश्य असते. आतां ज्यांचें उपजीवन फक्त उद्भिज्ज पदार्थांवर होतें, असे जे वनस्पत्याहारी प्राणी त्यांच्या मांसरक्तादि भागांशी ज्यांचा विपाकाने एकरूपता होऊन जाणार असें अन्न प्राप्त होण्यास अधिक अडचण पडावी असे वाटेल; परंतु अन्नाच्या सामान्य उद्भिज्ज पदार्थांपैकीं मुख्यांत प्राणिज पदार्थांतल्या अलब्यूमन, फैब्रीन, व केजीन, ह्या मुख्य पोषक पदार्थांशी एकरूप असे पदार्थ असतात. उद्भिज्ज अलब्यूमन हें बहुतेक वनस्पतींच्या रसांत व बीजांत विपुळ असते व तें एथें प्राणिज अलब्यूमनाच्या ठिकाणी आहे. ग्लूतिन हें दाण्यांत म्हणजे गहूं, बाजरी, ज्वारी, मका इत्यादिकांत, व ह्याच जातीच्या दुसऱ्या वनस्पतींच्या बीजांत व रसांत असते व हे प्राणिज फैब्रीनासारखें आहे. आणि लेग्युमिन हे हरबरा, तूर, चवळी, मूग, उडीद, वाटाणा, पावटा घेवडा इत्यादि लेग्यूमिनस म्हणजे ज्यांस शेंगा असतात त्या वनस्पतींत व बटाट्यांत असतें, तें दुधांतल्या केजीनाशीं एकरूप आहे. ह्या सर्व उद्भिज्ज पदार्थांचे वर सांगितलेल्या प्राणिज पदार्थांप्रमाणेच रूपांतर होऊन मांसरक्तादि भाग होतात, आणि मांसाहारी व वनस्पत्याहारी

प्राण्यांच्या मासरक्तादि भागाप्रमाणें त्याचें नेत्रोजनविशिष्ट अर्ज्ञाहि सर्व मुख्य लक्षणाना सारखे आहे असे मानतां येते." †

## ज्योतिःशास्त्र—फलज्योतिष

वैद्यकाप्रमाणेंच खगोलविद्या आणि फलज्योतिष ह्यासबधीहि या काळात बरेच ग्रंथ लिहिले गेले. इ. स. १८३२ त मुंबईच्या शिक्षामडळीसाठी पुणे येथे 'भूगोल आणि खगोल इत्यादि विषयक सवाद' या नांवाचा ग्रथ छापण्यात आला. बाळशास्त्री जांभेकर यांनी आपल्या भूगोलशास्त्राला जोडलेल्या निबंधात भास्कराचार्यांच्या मताचे थोडक्यात विवेचन केले आहे. इ. स. १८४६ साली अमेरिकन मिशनच्या विद्यमानेंहि खगोलविद्येवर लहानसे शालोपयोगी पुस्तक प्रसिद्ध झाले.

**सिद्धांतशिरोमणिप्रकाश**

'मालवदेशीय सिहोरनगरस्थ सुबाजी बापू' यांनी इ. स. १८३६ त 'सिद्धातशिरोमणिप्रकाश' या नांवाचा ग्रथ लिहिला. त्यात पौराणिक, सिद्धांतिक आणि कोपरनिकन ह्या तिन्ही मताचा तुलनात्मक विचार केला आहे. भाषेच्या दृष्टीनें या पुस्तकांत पुष्कळ दोष आहेत, परंतु त्या काळातील बहुतेक ग्रथ भाषांतरात्मक असल्यामुळें स्वतंत्र-ग्रंथरचनेचा हा प्रयत्न कौतुकास्पद आहे. त्यातील एक उतारा खालीं उद्धृत करितो.

"या भूगोलखगोलाविषयीं श्रीमद्भागवतांतर्गत पंचम स्कंधीं वर्णन आहे या प्रमाणेच महाभारतांतर्गत भीष्मपर्वांतही आदिभागीं आहे आणि वायु पुराणादिकांतही आहे सारें व्यास

† मानुषइंद्रियविज्ञानशास्त्र पृ. २४.

कृत बहुधा एक प्रकारेच आहे याला कांहीं विरुद्ध भास्कराचार्यकृत सिद्धांतशिरोमणीत लिहिले आहे या दोहींमध्यें पुराण कांहीं प्रत्येक या गोलाविषयाच सांगीतले नाहीं सिद्धांत तर प्रत्येक या गणिताविषयांच उत्पन्न जाला आहे म्हणोन सिद्धांत प्रबल आहे याहीवर गेलीवर साहेब लोकाहीं प्रत्यक्ष दर्शीतर्फा करून बयानहीं लिहिले आहे आणि तदनुसार नकषे गोल हेहीं केले आहेत या तीन प्रकारामध्यें कोणता विषय कोठें सत्य आहे कोणता विषय कोठें भ्रमिष्ट आहे हे आपल्या बुद्धीने यथामति विचारून सांगतो तरि विचक्षणाहीं कृपा करून चित्त देऊन श्रवण करावे आणि कोठें काहीं दुरुक्त असल्यास परिहास न करिता शोधावे.''*

कृष्णशास्त्री गोडबोले आणि वामन कृष्ण जोशी गद्रे यांनी इ. स. १८५६ त गणेश दैवज्ञांच्या ग्रहलाघवाचें मराठींत भाषांतर केले. यांत ज्योतिष ग्रंथांपैकीं तिथि वर्तविणे, ग्रहण वर्तविणे वगैरे सामान्य गोष्टींची माहिती दिली आहे. त्यानंतर कृष्णशास्त्री गोडबोले यांनी विलियम् चेंबरस् आणि रॉबर्ट चेंबरस् यांच्या इंग्रजी ग्रंथाच्या आधाराने 'ज्योतिःशास्त्र' ( A Trealise on Astronomy ) हा ग्रंथ लिहिला. वामन कृष्ण जोशी यांनी इ. स. १८७० त 'पंचांगसाधनसार' हे पुस्तक प्रसिद्ध केले. गोडबोले यांच्या 'ज्योतिःशास्त्र' या ग्रंथातील एक लहानसा उतारा खालीं देत आहे.

**कृष्णशास्त्री गोडबोले, वामन कृष्ण जोशी गद्रे**

* सिद्धांतशिरोमणिप्रकाश--पृ. ८

" ताऱ्याचे गमनमार्गाचा विचार करितांना जसा आपण एक एक तारा पाहिला, तसे न करितां आपण आपली दृष्टि दोन ताऱ्यांचे पुंजाकडे तीन ताऱ्यांचे पुजांकडे, किवा कोणतेही एकादे पुंजाकडे लावली तर असें दिसते की ते सर्व एका मेळीत भ्रमण करून सदां एकमेकापासून आपआपली अंतरे सारखी राखितात; ह्या मुळेच त्यांच्या आकाशांतील प्रदक्षिणा सारखे कालांत होतात. वस्तुतः हे सर्व भचक्र एका ध्रुवापासून दुसऱ्या ध्रुवापर्यंत जी रेषा म्हणजे आंस त्या भोंवतीं फिरतें. एका आंसा-भोंवतीं सदां व हळूहळू फिरणाऱ्या आणि सुमारें चोवीस तासांत पूर्ण प्रदक्षिणा करणाऱ्या अशा एकाद्या पोकळ गोलांत बसविल्या प्रमाणें ह्या ताऱ्यांची स्थिती आहे. आतां एक ध्रुव क्षितिजापासून बराच वर आणि दुसरा बराच खालीं आहे, म्हणून हे उघड आहे, कीं ह्या भचक्राचे भ्रमण तिर्यक् दिशेनें होतें. हें गमन जर क्षितिजसमांतर दिशेनें होतें तर एक ध्रुव आकाशांत आपले डोकीवर असता आणि दुसरा त्यांच्यासमोर आपले पायांखालीं असता आणि हे भ्रमण जर जसें जमिनीवर चाक फिरतें तसें क्षितिजास लंब दिशेनें होतें, तर एक ध्रुव क्षितिजाचे बराबर उत्तर बिंदूंत असता आणि दुसरा क्षितिजाचे बराबर दक्षिण बिंदूंत असता परंतु हे भ्रमण ह्या दोन दिशांचे मध्ये होतें."†

केरो लक्ष्मण छत्रे यांनी इ. स. १८६० मध्यें युरोप खंडांतील मोठमोठाले गणकांचे ग्रंथ व प्रत्यक्ष वेध यांवरून 'ग्रहसाधनाचीं कोष्टकें' हा ग्रंथ प्रसिद्ध केला. यापूर्वीच त्यांनीं मराठी ज्ञानप्रसारकांत ज्योतिःशास्त्रासंबंधीं दोनतीन लेख लिहिले होते. हवेसंबंधींचा त्यांचा

**केरो लक्ष्मण छत्रे**
**(इ. स. १८२४–६४)**

† ज्योतिःशास्त्र पृ. ४–५

विस्तृत ग्रंथहि याच मासिकांतून क्रमशः प्रसिद्ध झाला. केरोपंत छत्रे यांचा जन्म इ. स. १८२४ त झाला. त्यांचे शिक्षण मुंबईस एल्‌फिन्स्टन कॉलेजांत झालें. इ. स. १८६५ साली त्यांना पुण्याच्या पाठशाळेंत गणितशास्त्राच्या मुख्य गुरूची जागा मिळाली. नामांकित गणितज्ञ म्हणून त्यांची महाराष्ट्रांत सर्वत्र प्रसिद्धी होती.

**आकाशसौंदर्य**

कृष्णशास्त्री भाटवडेकर यांनीं चार्ल्स् एफ्. ब्लंट यांच्या इंग्रेजी ग्रंथावरून महाराष्ट्र-भाषेत 'आकाशसौंदर्य' या नांवाचा ग्रथ लिहिला. "ह्यांत आकाशांतील ग्रह, तारे, नक्षत्रे, इत्यादिकांचे यथार्थ वर्णन केले आहे; व हा विषय स्पष्ट समजावा म्हणून त्या त्या ग्रहनक्षत्रादिकांचीं सुंदर चित्रे काढून त्यांस यथायोग्य रंग दिला आहे. . . . . . जरी हा विषय शास्त्रीय आहे तरी प्राकृत जनांस आणि मुख्यत्वेंकरून मुलांस याचा बोध व्हावा या उद्देशाने यामध्ये सुलभ शब्दांची योजना करून सरळ भाषेनें लिहिला आहे."*

ह्याशिवाय ज्योतिःशास्त्र व फलज्योतिष यासंबधी ज्योतिषसार, ज्योतिष-रत्न, मुहूर्तमार्तंड, ज्योतिषचक्र, तिथिचिंतामणि, चमत्कारचिंतामणि इत्यादि अनेक ग्रंथ या काळी प्रसिद्ध झाले.

## कायदा

**हिंदुधर्मशास्त्र**

रघुनाथ शास्त्री दात्ये यांनीं सरकारच्या आज्ञेवरून इ. स. १८४४ त 'मिताक्षराव्यवहाराध्याय व मयूखदायभाग' यांचे मराठींत अक्षरशः भाषांतर केले. त्यानंतर इ. स. १८६७ त विश्वनाथ नारायण मंडलीक यांनीं 'हिंदुधर्मशास्त्र व्यवहारखंड' हें लहानसें पुस्तक प्रसिद्ध केलें. शास्त्राचे उगम, विवाहाविषयीं, दत्तविधान,

---

* प्रस्तावना—आकाशसौंदर्य

दायविभाग, स्त्रीधनाविषयी, पोषण आणि पोष्यवर्ग, स्वत्वनिवृत्ति देणे, विक्री, इत्यादि; अज्ञान व त्यांचे पालन करणार, किरकोळ विषय. अशी या पुस्तकाची एकंदर नऊ प्रकरणे आहेत. जनार्दन सखाराम गाडगीळ यानीं रेमंड वेस्ट आणि जोहान जॉर्ज बूलर यांच्या ग्रंथावरून 'हिंदु-धर्मशास्त्रसार' ( भाग २ ) हा ग्रंथ मराठी भाषेत लिहिला. या शिवाय काशिनाथ महादेव फडके यांनींहि 'धर्मशास्त्र' ( इ. स. १८६४ ) या नांवाचे पुस्तक प्रसिद्ध केलें होते. मंडलीक यांच्या 'हिंदुधर्मशास्त्र' ह्या ग्रंथांतील एक उतारा येथे सादर करितोः—

" ( १६ ) प्राचीन काली असवर्ण स्त्रीशीं विवाह होत असे, तो अनुलोम मात्र वर्ण असला पाहिजे; म्हणजे उंच वर्णाचा पुरुषाचे नीच वर्णाचा स्त्रीशीं लग्न होत असे. या नियमामुळ ब्राह्मणास चारहि वर्णांच्या कन्यांशीं विवाह करण्यास अनुकूल होते.

क्षत्रियास, ब्राह्मण वर्ज करून बाकी तिन्हीं वर्णाचा मुली करितां येत असत. वैश्यास, स्ववर्णाची व शूद्राची कन्या करिता येत होती. शूद्रास मात्र आपल्या वर्णाबाहेर लग्न करण्याची परवानगी नव्हती. साम्प्रत तर सवर्णांचे मात्र लग्न होते. असवर्णाचा विवाह झाला असता त्यापासून सशास्त्र संबंध होत नाही.

( १७ ) कन्येचा विवाहकाल आठापासून दाहा वर्षपर्यंत मानिला आहे.' पुढे अविवाहित ठेविल्यास काही [illegible] दोष मानितात. परंतु साम्प्रत दाहा वर्षांनंतरहि मुलींना विवाह होतो; व पूर्वी प्राप्तयौवन स्त्रियांनी तीन वर्ष वाट पाहून पित्यानें लग्न न केल्यास, स्वयंवर करावा, असे म्हटले आहे. यावरून सर्वत्रच सारखा पाठ होता असे दिसत नाही; तसेंच जे प्राप्तयौवन

कन्येचा विवाहास दोष सांगितले ते अदृष्ट आहेत; म्हणून जेथे तशी रूढी असेल, अथवा शिष्टसम्मते नवी पडेल, तेथे व्यवहार-रीत्या ता विवाह रद्द होईल असे वाटत नाही.''।

नेहमीच्या व्यवहारातहि कायद्याचे ज्ञान उपयुक्त असल्यामुळें त्या विषयाची पुस्तकें जास्त प्रमाणात प्रसिद्ध होणें स्वाभाविक आहे. हिंदुधर्मशास्त्राप्रमाणेच मुसलमानी कायद्यासंबंधीहि दोन पुस्तकें लिहिली गेली. याशिवाय मेजर क्यांडी, गणेश बाबाजी माटे, जनार्दन हरी आठल्ये, नारायण मोरेश्वर केळकर, मुकुंदराव भास्करजी, वासुदेव जगन्नाथ कीर्तीकर इत्यादि लेखकांनीं निरनिराळ्या कायद्यासंबंधीचीं पुष्कळच पुस्तकें प्रसिद्ध केली. परंतु वाङ्मयाच्या दृष्टीने त्यांना फारसें महत्त्व नसल्यामुळें या ठिकाणीं त्यांचे विस्तृत विवेचन करणें इष्ट होणार नाही.

## अर्थशास्त्र

**लक्ष्मीज्ञान-संपत्ति-विवेचन**

'कामगार लोकांशीं संभाषण' या ग्रंथाच्या कर्त्यानें इ. स. १८४९ त क्लीफ्ट साहेबाच्या इंग्रजी ग्रंथावरून लक्ष्मीज्ञान (Political Economy) या नांवाचा एक लहानसा ग्रंथ लिहिला. ज्ञान, उद्योगाचे विभाग, क्रयविक्रय, भांडवल, निर्भयपणा, किंमत, धारा-नफा-मजुरी अशीं या पुस्तकाची एकंदर सात प्रकरणे आहेत. प्रस्तावनेच्या शेवटीं 'लोकहितवादी' यांचे नाव आढळतें, तेव्हा कदाचित् त्यांनींच हा ग्रंथ लिहिला असण्याचा संभव आहे. त्यानंतर इ. स. १८५३ सालीं नारो बाळकृष्ण पटवर्धन यांनीं 'Money Matters' ह्या इंग्रजी पुस्तकाचे 'संपत्तिविवेचन' या

। हिंदुधर्मशास्त्र पृ. १०–११

नांवानें मराठी भाषांतर केलें. 'लक्ष्मीज्ञान' ह्या पुस्तकांतील खालील उताऱ्यावरून मराठी भाषेतील सुरवातीच्या शास्त्रीय ग्रंथांचें स्वरूप लक्षांत येईल.

"उद्योगाची वाटणी केल्याचें फळ असें आहे, कीं उद्योग होतो, व जो येका कामांत प्रवीण असतो तें काम तो लौकर करितो, याजमुळें थोडा वेळ लागतो आणखी कितीएक कामे असी आहेत; कीं येक काम संपऊन दुसरे कामास लागण्यास हात्यारें बदलावी लागतात जागा बदलावी लागत्ये व येकाचें चित्त येका कामाकडे असलें म्हणजे त्यात त्याला सुधारणा करावयास सापडते, तो नवी हत्यारे व नव्या युक्ती करून सुलभ काम करितो, तसे येकाकडे सर्व कामे असल्यानें होत नाहीं; पूर्वी सुईचा दाखला लिहिला आहे तेंच काम चौघानी केलें तर येके तासात हजार सुया करितात आणि येकटा करणार कसबीही असला तरी येक तासात शेंभराहून अधीक करीत नाहीं. जसे सैपाक करणार व वाढणार, गंध लावणार, पाट मांडणार, वेगळाले असले तरी काम किती लौकर होतें व ती सर्व कामे येकट्याकडे असल्याने तशी होणार नाहींत, व सर्व बिघडतील तसे हे आहे."*

हरि केशवजी पाठारे व विश्वनाथ नारायण मंडलीक यानीं इ. स. १८५४ त मिसेस मार्सेट हिच्या इंग्रजी ग्रंथावरून 'देशव्यवहारव्यवस्था' या नांवाचा गुरुशिष्यसंवादरूप ग्रंथ मराठी भाषेत लिहिला. या पुस्तकात एकंदर बावीस संवाद असून त्यांमध्यें संपत्तीचीं मुख्य कारणें, मालाचे रक्षण, उद्योगाची वांटणी, भांडवल, रोजमुरा

**हरि केशवजी पाठारे**
**(इ. स. १८०४–५८)**

* लक्ष्मीज्ञान पृ. २७–२८

व लोकसंख्या इत्यादि गोष्टींचे थोडक्यांत विवरण केलं आहे. हरि केशवजी यांनींच मराठी भाषेंतील शास्त्रीय वाङ्मयाचा पाया घातला असें म्हणावयास हरकत नाहीं. त्यांचे सर्व ग्रंथ भाषांतरात्मक असले तरी ते मुळाप्रमाणेच सरस व उत्कृष्ट वठले आहेत. हरि केशवजी हे मुंबई येथें दिवाणी कोर्टात चीफ ट्रान्सलेटर होते. हुबेहुब भाषांतर करण्याविषयीं त्यांची फार प्रसिद्धी होती. आपले सरकारी कामकाज सांभाळून त्यांनीं 'सिद्धपदार्थ विज्ञानशास्त्र,' 'रसायनशास्त्र,' 'इंग्लंडचा इतिहास,' 'यात्रिकक्रमण,' शालेपयोगी नीतिग्रंथ,' आणि 'देशव्यवहारव्यवस्था' असे सहा ग्रंथ लिहिले. त्यांची भाषा शुद्ध व सोपी होती. त्यानीं आपल्या मातृभाषेची अत्यंत निष्ठापूर्वक सेवा केली. ह्यांचे चिरंजीव रामचंद्र हरि यांनीं त्यांचें विस्तृत चरित्र प्रसिद्ध केलें आहे.

**अर्थशास्त्रपरिभाषा**

कृष्णशास्त्री चिपळूणकर यांनी इ. स. १८५५ त जॉन स्टुअर्ट मिल् यांच्या ग्रंथावरून 'अर्थशास्त्रपरिभाषा' या नांवाचा ग्रंथ लिहिला. "प्रकृत ग्रंथ लिहिणारास ह्या देशांतील व्यापाराची, शेतकीची, व राजव्यवस्थेची, विशेष तपशीलवार माहिती असती, तर ह्या ग्रंथाच्या ठायीं व्यावहारिक उपयोगिता विशेष येती, हें ग्रंथ करणारा संतोषानें कबूल करतो. ह्याप्रकारें व्यवहारसंबंधानें ह्या ग्रंथास कांहीं न्यूनता असली, तरी शास्त्रांतील मूल विषयांच्या प्रतिपादनाविषयीं तादृश न्यूनता ह्या ग्रंथांत आढळणार नाही, अशी प्रकृत ग्रंथकर्त्याची समजूत आहे." ‡ यांतील एक उतारा खाली देत आहेः–

---

‡ प्रस्तावना– अर्थशास्त्रपरिभाषा

" जर सर्व मनुष्यें आपआपल्या श्रमाच्या सर्व उत्पन्नाचा व्यय करूं लागली तर भांडवल कदापि वाढावयाचें नाहीं. प्रायः सर्व भांडवल संग्रहमूलक आहे. प्रायः पद घालण्याचें कारण असें आहे, कीं जो मनुष्य आपल्याच करता श्रम करतो तो निर्धन न होता त्याला आपल्या श्रमाच्या सर्व उत्पन्नाचा स्वसुखार्थ व्यय करता येतो. ह्या मनुष्याच्या उदाहरणात त्याचा माल तयार होईतोपर्यंत तो ज्या पदार्थांचा व्यय करतो, त्या पदार्थांस भांडवल म्हणावें असें कोणी म्हटल्यास तें म्हणणें एक प्रकारें खरें दिसत. परंतु वास्तविक पाहता त्या पदार्थांस भांडवल म्हणता येत नाहीं का की, त्या पदार्थांचा तो मनुष्य उत्पादक बुद्धीनें व्यय करीत नाहीं, तर स्वसुखार्थ करतो; म्हणून तेथें स्वोपभोगाचा प्रतिबंध झाला असें म्हणता येत नाहीं. आता बारीक विचार केल्यास ह्या स्थळीसुद्धा पुढल्या उत्पन्नाकरिता बियाचा वगैरे संचय प्रकृत सुखाचा प्रतिबंध करूनच करावा लागतो. तस्मात् लोकाची कितीही साधी अवस्था घेतली तरी तितकाही संग्रह असला पाहिजे. किंवा उत्पन्नापेक्षा खर्च तरी कमी असला पाहिजे. आतां मजूर चाकरीस ठेवून त्याकडून संपत्ति उत्पन्न करण्याचें म्हटलें, तर या अवस्थेत पहिल्या साध्या अवस्थेतल्यापेक्षाही अधिक संग्रह असला पाहिजे. एक मनुष्य दुसऱ्या मनुष्याकडून संपत्ति उत्पन्न करण्याच्या कामांत जें धन खर्चतो तें सर्व मुळीं संग्रहापासून झालेलें असतें; म्हणजे तें कोणी तरी उत्पन्न केलें पाहिजे व उत्पन्नकर्त्यानें त्याचा उपभोग न घेतला पाहिजे."†

**पदार्थविज्ञानशास्त्र**

हरी केशवजी यांनीं इ. स. १८३२ त ' सिद्धपदार्थविज्ञानविषयक संवाद ' हा ग्रंथ लिहिला. ह्या शास्त्राची परिभाषा तयार करण्याचें अवघड काम त्यांनीं फार उत्कृष्ट रीतीनें पार पाडलें आहे. दाढर्य, निर्भेद्यता, निरवरोध,

† अर्थशास्त्रपरिभाषा पृ. ६५-६६

परिमेयता, वक्रीभवन, प्रतिष्टंभ; विशिष्टगुरुत्व स्थितिस्थापकत्व, स्नेहाकर्षत्व, इत्यादि नवीन योजलेले शब्द मार्मिक व अर्थपूर्ण आहेत. " हरि केशवजी यांची मराठी लिहिण्याची इतकी खुबी होती कीं, हा ग्रंथ इंग्लिश ग्रंथाचें भाषांतर असताहि तसें त्या वेळेस कोणास वाटलें नाहीं. मूळचाच मराठी ग्रंथ असावा असें बहुतांस वाटलें. त्यावेळेस ' विद्येचे उद्देश लाभ आणि संतोष ' व ' सिद्धपदार्थविज्ञान ' हे मोटे व सरस ग्रंथ झाले. " † कॅरो लक्ष्मण छत्रे यांनी इ. स. १८५५ त पदार्थविज्ञानशास्त्रावर एक लहानसें पुस्तक प्रसिद्ध केलें. त्यावेळीं असलेले ग्रंथ फार महाग म्हणून हा स्वल्प ग्रंथ काढिला असें प्रस्तावनेंत म्हटलें आहे. याशिवाय महादेव गोविंद-शास्त्री कोल्हटकर यांनीहि इ. स. १८६१ त चेंबर्सकृत ' Matter and Motion ' ह्या ग्रंथाचें मराठींत भाषांतर केलें. हरि केशवजी यांच्या 'सिद्ध पदार्थविज्ञानविषयक संवाद या ग्रंथांतील एक उतारा येथें उध्दृत करितों.

> " पदार्थांचें सामान्य ज्ञान होण्यास आपल्या देहावयामध्ये ज्ञानतंतूंचे ठायीं मात्र योग्यता आहे. अत एव मनास पदार्थांचें विशेष ज्ञान व्हावयास हे ज्ञानतंतू साधन होत; तर पदार्थांचें सामान्य ज्ञान ज्ञानतंतूवर होतें, तेणेंकरूनच त्या पदार्थांचें मनास विशेष ज्ञान होते. आतां अनुभवावरून असें कळूं येते कीं, पदार्थांचा ज्ञानतंतूशीं स्पर्श झाल्याविना त्यांजवर त्या पदार्थांचें सामान्य ज्ञान उमटत नाहीं, आणि असा अनुभव आहे, म्हणून ज्ञानतंतूविशिष्ट जी इंद्रियें, तीं दूर असलेल्या पदार्थांतें जाणावयास समर्थ होत नाहींत. यास दृष्टात जो सुगंध द्रव्याचे परमाणूंचा वस्तुतः आपल्या नासिकेस स्पर्श होतो, त्यांचा मात्र आपणास गंध येतो. आणखी मागांही तुम्हास सांगितलें होते कीं; पुष्पाचे जे पराग उडून आपल्या नाकांत शिरतात, आणि तेथील आघ्राण

† दादोबापांडुरंग-आत्मचरित्र पृ. १९

ज्ञानतंतूंवर आदळताच त्या ज्ञानतंतूंद्वारां मनास पुष्पगंधाचें विशेष ज्ञान होते. " ‡

रसायनशास्त्र

हरि केशवजी यांनीं इ. स. १८३७ साली 'रसायनशास्त्रविषयक संवाद' या नावाचा भाषांतरात्मक ग्रंथ प्रसिद्ध केला. त्यांच्या इतर पुस्तकाप्रमाणेंच हा ग्रंथहि गुरु-शिष्यसंवादरूप असून त्यातील विवेचनपद्धति सुबोध व मनोरंजक आहे. रामजी गणोजी चौगुले यांनीं 'रसायनशास्त्र अथवा हुन्नेरनिधि' या पुस्तकाचे तीन भाग प्रसिद्ध केले. ग्रांट मेडिकल कॉलेजातील औषधिविद्या व रसायनशास्त्र या विषयांचे अध्यापक नारायण दाजी यानी इ. स. १८६३ त रसायनशास्त्रावर एक ग्रंथ लिहिला. याशिवाय ह्या विषयावर हरहुन्नर स्नेही आणि उपयुक्त चमत्कारसंग्रह हे दोन ग्रंथ प्रसिद्ध झाले.

यंत्रशास्त्र

इ.स.१८३५ त विलियम हेनरी बेल यांनीं नारायणशास्त्री जोशी चौलकर याच्या साह्यानें 'शिल्पविद्या या विषयाचे निबंध' ( Treatises on Mechanics ) हे पुस्तक प्रसिद्ध केले. यांत स्थैर्यविज्ञान, क्रियाकलाप, शूलदंत, चक्रसघात, समसूत्रस्थ, पार्थिवगुरुत्व इत्यादि अनेक शब्द नवीन बनविले आहेत. इ. स. १८४६ त अमेरिकन मिशनच्या विद्यमानें या विषयांवर एक पुस्तक प्रसिद्ध झाले. त्यानतर गोविंद गगाधर फडके यांनीं इ. स. १८५३ त 'यंत्रशास्त्राचीं मुळे' हा ग्रंथ लिहिला. यांत 'चलन आणि यंत्रशास्त्र' यांच्या नियमाचे सविस्तर वर्णन केलें आहे. विलियम हेनरी बेल यांच्या वरील पुस्तकांतील एक उतारा येथे सादर करितों.

‡ सिद्धपदार्थविज्ञानशास्त्रविषयक संवाद पृ. ४३५—३६

" ईश्वराने मनुष्याचा स्वाधीन जीं नानाप्रकारचीं शिल्पसाधनें ठेविलीं आहेत तीं शिल्पसाधनें अशीं. अप्रवाही पदार्थाचा भार आणि त्यांचा गतींतलें चालकत्व व पातळ पदार्थांचे भार आणि चेपण वायु आणि गास म्हणजे, एका जातीचा वायुस्वरूप पदार्थ त्यांचे भार आणि चेपण उष्णतेचे योगानें जी प्रवाही पदार्थांची वाफ होती तिचे स्थितिस्थापकबल कमाणीचें स्थितिस्थापकत्व व जीवाचे शारीरबल हीं सर्व साहजिक शिल्पसाधनें आहेत, परंतु त्यांचा शक्ति अनेका जातींचा आणि अनेका मानाचा आहेत. यास्तव या बलांनीं कांहीं प्रतिरोध दूर करावयाचा असतां यास पूर्वी कांहीं रूपांतर दिल्यावांचून हीं प्रायःकामांत घेतां येत नाहींत. उदाहरण जा शक्ति आपल्या स्वाधीन आहेत त्यामधून कोणीएक शक्ति घेतली असतां ती विवक्षित दिशेत क्रिया करीत नाहीं. किंवा तिचा वेग किंवा मान इच्छानुरूप नसतें यास्तव ती शक्ति कार्यस्थलापर्यंत जातांना तिची दिशा किंवा वेग किंवा मान कामांत यथायोग्य उपयुक्त पडे अशी कांहीं कळ केली पाहिजे. अशी जी कळ करितात तिला " यंत्र " म्हणतात. " *

**शेतकी व बागाईत**

नाशिक येथील रेव्हरेंड सी. पी. फारार यांचा विद्यार्थी रामचंद्र अमृत दुगल यांनीं इ. स. १८३८ त ' जागती जोत किंवा शेतपोत रीतभात याविषयीं वाद ' हें लहानसें पुस्तक प्रसिद्ध केलें. त्यानंतर इ. स. १८४६ त आलेक्झांडर गिबसन यांनीं ' शेतकी आणि घरगुती व्यवस्था ' हा ग्रंथ लिहिला. गोविंद नारायण यांनीं 'उद्भिज्जन्य पदार्थ' [ इ. स. १८५६ ] आणि 'वृक्षवर्णन' [ इ. स. १८५७ ] हीं दोन पुस्तकें प्रसिद्ध केलीं. याशिवाय ह्या विषयावर 'पुष्पवाटिका,' 'वृक्षविनोद,' 'खताचे प्रकार' इत्यादि पुस्तकें त्याकाळीं प्रसिद्ध

---

* शिल्पविद्या या विषयाचे निबंध. पृ. ८३

झाला. 'शेतकी आणि घरगुती व्यवस्था' या पुस्तकांतील एक उतारा खालीं उध्दृत करितों.

"जी धान्यें पेरावयास सतत ओलावा पाहिजे त्याची क्षितिजा जवळ वळवाचे ढगाप्रमाणे चंचळ ढगे असतील त्याजवर विश्वास ठेवून पेरणी करूं नये. तसेच लहान लहान प्राणी यांच्या कृतीवरून जीं लक्षणे दिसून येतात तीहि क्षुल्लक आहेत असे समजूं नये. पाऊस लागण्याचे पूर्वी चिमण्या उंच उडत नाहींत कारण कीं, जे उडणारे लहान जीव त्या शोधीत असतात त्या जिवांच्यानें हवेचे ओलसरपणामुळे वर जाववत नाहीं, ते जमीनीबरोबर उडतात. तसेच सुके जमीनीवर बेडूक उड्या मारतात, दुतोंड शब्द करूं लागते. तसेंच लहान लहान जीव रात्रीचे फार येतात, त्यांत विशेषकरून चांचड, टोळ, आणि माशा, यांचा प्रादुर्भाव फार होतो. हीं सर्व चिन्हें, उष्णता, आणि हवा, ही एकत्र जाहालीं असतां पावसाळा लागल्याच्या या निभ्रांत खुणा समजाव्या. परंतु या उपयोगी विषयासंबंधी तपशलिवार मजकूर लिहिण्याचा माझा अभिप्राय नाहीं, परंतु ईश्वरानें जी तुम्हांस बुद्धि आणि शाहाणपण दिलें आहे त्याचा उपयोग करावयास तुम्ही प्रवृत्त व्हावें हा माझा उद्देश आहे". ‡

**संगीत**

भाऊशास्त्री अष्टपुत्रे यांनी इ. स. १८५० त 'गायनप्रकाश' या नावाचे एक पुस्तक लिहिलें. त्यानंतर विश्वनाथ नारायण मंडलीक यांनीं इ. स. १८६४ सालीं गोवर्धन लक्ष्मण छत्रे याचा 'गीतलिपी' हा लहानसा ग्रंथ प्रसिद्ध

‡ शेतकी आणि घरगुती व्यवस्था—पृ. १४.

केला. ह्यांत पाश्चात्य संगीताच्या धर्तीवर भारतीय संगीताची ' नोटेशन पद्धति ' बसविण्याचा प्रयत्न केला आहे. सूर्याजी सदाशिव महात्मे आणि विश्वनाथ रामचंद्र काळे ह्या दोघांनीं इ. स. १८७२ त ' तंतुवाद्य–सतार शिकण्याचें पहिले पुस्तक ' तयार केलें.

**संकीर्ण**

इ. स. १८४६ त अमेरिकन मिशनच्या विद्यमानें तर्कशास्त्रावर एक लहानसें पुस्तक लिहिलें गेलें. त्यानंतर बाळकृष्ण विद्याधर हळबे यांनी इ. स. १८७२ त तर्कसंग्रहाची ' न्यायसिंधुपोत ' या नांवाची प्राकृत टीका प्रसिद्ध केली. सीताराम खंडेराव यांनी इ. स. १८७१ त ' शिल्पोपयुक्तसंग्रह ' हे पुस्तक लिहिलें. ह्याशिवाय भूगोलशास्त्र, फोटोग्राफी, शिवणकला, शास्त्रीयज्ञान-दर्शन, कालमापकयंत्रपरिभाषा, इत्यादि अनेक शास्त्रीय ग्रंथ त्या काळी प्रसिद्ध झाले. कृष्णशास्त्री चिपळूणकर यांनीं इ. स. १८६१ त 'अनेक-विद्यामूलतत्वसंग्रह ' या नावाचा अत्यंत उपयुक्त ग्रंथ लिहिला. त्यांत निरनिराळ्या शास्त्रीय विषयाची थोडक्यांत माहिती दिली आहे. त्यांतील एक उतारा येथें सादर करितों.

> " वातावरणाचा दाब समजल्यापासून व्यवहारातल्या शेंकडो साधारण गोष्टींची उपपत्ति कळते. आपण भांड्यातून पाण्याचा घोट घेऊं लागलों असता, पाण्यास तोंड लावून ते आंत घेण्याकरिता जो यत्न करितों, तेणेकरून तोंडातला वारा संकुचित होऊन तेथें रिकामी जागा होते, व बाहेरच्या पाण्यावर वातावरणाचा दाब असतो, ह्यामुळे ते तोंडांतल्या रिकाम्या जागेंत शिरतें. मोठ्या पाटावर भांडें पालथें ठेवून त्याच्या तोंडाच्या कडेस शेण वगैरे लावून आंतल्या व बाहेरच्या वाऱ्याचा संबंध बंद केला

> असतां, तें भांडे उचलूं लागल्यास त्याबरोबर पाटा उचलतो, त्याचे कारणही वातावरणाचा दाबच होय. पोटांस भाड्यांच्या तुंबड्या लाविल्या असता चिटकण्याचे बीज हेंच आहे. तसेंच बंबांत व पिचकाऱ्यात पाणी चढते; माशास व मुंग्यास वगैरे तक्तपोशींच्या खालच्या बाजूवरून चालता येतें; अभिषेकपात्राच्या तोंडावर हात ठेविला असतां, त्यातून पाणी गळण्याचे बंद होते; इत्यादि अनेक गोष्टींचें कारण वातावरणाचा दाब होय. " *

मराठी भाषेतील मालापूर्वकालीन शास्त्रीय वाङ्मयाचा आपण थोडक्यांत आढावा घेतला. हरी केशवजी, भाऊ महाजन गोविंद नारायण, कृष्णशास्त्री गोडबोले, कृष्णशास्त्री भाटवडेकर, डॉ. सखाराम अर्जुन, नारायण दाजी इत्यादि तत्कालीन विद्वज्जनांनी इंग्रजी व संस्कृत ग्रथांच्या आधाराने मराठी भाषेंत शास्त्रीय ग्रंथलेखनाचा पाया घातला. संस्कृत भाषेच्या साह्यानें पदार्थविज्ञानशास्त्र, रसायनशास्त्र, शिल्पशास्त्र, इत्यादि भौतिक शास्त्रांची परिभाषा तयार करण्याचा त्यांनीं प्रयत्न केला. ज्या ठिकाणी नवीन अन्वर्थक शब्द बनविता आले नाहीत, त्या ठिकाणी मूळचे इंग्रजी शब्दच त्यांनी उपयोगांत आणिले. ह्या काळांतील बहुतेक शास्त्रीय ग्रंथ मुख्यतः शाळेतील विद्यार्थ्यांसाठी लिहिले असल्यामुळे त्यांतील माहिती अगदीं प्राथमिक स्वरूपाची आहे.

---

* अनेकविद्यामूलतत्त्वसंग्रह-- पृ. ११९

## परिशिष्ट

### वैद्यक

१ औषधकल्पनाविधि–जॉन मॅक्लेनन, मुंबई,
इ. स. १८२८.

२ निदान–जॉन मॅक्लेनन, मुंबई, इ. स. १८२८.

३ निघंटप्रकाश–बापू गंगाधर जोशी, मुंबई, इ. स. १८३९.

४ शार्ङ्गधरवैद्यक ग्रंथ–चिंतामण जोशी नागांवकर,
मुंबई, इ. स. १८५४.

५ बोपदेवशतक–कृष्णशास्त्री भाटवडेकर, मुंबई,
इ. स. १८६०. (ब्रि. म्यु.)

६ वैद्यावतंस–कृष्णशास्त्री भाटवडेकर, मुंबई,
इ. स. १८६०. (ब्रि. म्यु.)

७ वैद्यजीवन ( लोलिंबराज ) कृष्णशास्त्री भाटवडेकर,
मुंबई, इ. स. १८६१. (ब्रि. म्यु.)

८ बालवैद्य–जनार्दन हरी आठल्ये, रत्नागिरी,
इ. स. १८६१.

९ वैद्यामृत—( मोरेश्वर ) कृष्णशास्त्री भाटवडेकर,
( आवृत्ति ४ थी ) मुंबई, इ. स. १८६२(ब्रि.म्यु.)

१० माधवनिदान-कृष्णशास्त्री भाटवडेकर,मुंबई, इ. स. १८६२

११ चिकित्सासार—विनायकशास्त्री पिटकर,
पुणें, इ. स. १८६२(ग्रा.कॅ.)

१२ त्र्यंबकी—कृष्णशास्त्री भाटवडेकर ( आवृत्ति ४ थी )
मुंबई, इ.स.१८६३.(ब्रि.म्यु.)

१३ अमृतसागरवैद्यकग्रंथ—( जयपुरचे राजे प्रतापसिंह यांच्या मारवाडी भाषेंतील ग्रंथाचे मराठी भाषांतर )
मुंबई, इ. स. १८६४(ब्रि.म्यु.)

१४ पुणें शहरच्या स्थितीविषयीं डाक्तर लीथसाहेब यांचा रपोट—( मराठी भाषांतर ) इ. स. १८६४

१५ वैद्यसारसंग्रह—कृष्णशास्त्री भाटवडेकर, रघुनाथशास्त्री दात्ये, ( आवृत्ति ३ री ) मुंबई, इ. स. १८६५(ब्रि.म्यु.)

१६ औषधिविद्या—नारायण दाजी, मुंबई, इ. स. १८६५

१७ निघंटरत्नाकर—( भाग १—२—३ ) गणेश रामचंद्रशास्त्री दातार, भास्कर अनंतशास्त्री ताम्हनकर, कृष्णशास्त्री महाबळ, विश्वनाथ विनायक पाटील, मुंबई,
इ. स. १८६७

१८ महामारीच्या रोगावर लोकोपयोगी सूचना—पांडुरंग गोपाळ मंत्री, मुंबई, इ. स १८६८

१९ आरोग्यचिंतामणी–गोविंद बल्लाळ बापट, सातारा,
इ. स. १८६९(इ.ऑ.)

२० वैद्यतत्व—डॉ. सखाराम अर्जुन, मुंबई, इ. स. १८६९

२१ शस्त्रवैद्यक—गोपाळ शिवराम वैद्यक, मुंबई, इ. स. १८६९

२२ बहात्तर रोगावर मात्रा–पुणे, इ. स. १८७०(इं.ऑ.)

२३ न्यायवैद्यक–गोपाळ शिवराम वैद्य, मुबई इ. स. १८७१

२४ स्त्रियांचें विकार–अहमदनगर, इ. स. १८७१.(इं.ऑ.)

२५ वनौषधिसंग्रह—विठ्ठल बाजीभट्ट काळे, विनायक
गोपाळ कयाळ, रत्नागिरी, इ. स. १८७२

२६ बालरोगचिकित्सा–पांडुरंग गोपाळ मंत्री, मुंबई,
इ. स. १८७२

२७ त्र्यंबकीप्रकाश–बापूशास्त्री मोघे, मुंबई, इ. स. १८७२(इं.ऑ.)

२८ गृहोपयोगी मित्र— मुबई, इ. स. १८७२(इं.ऑ.)

२९ गर्भविद्या आणि प्रसूतिकरण–डॉ. सखाराम अर्जुन,
मुंबई इ. स. १८७३

३० आरोग्यसाधन–गोपाळ गगाधर गोखले,पुणें, इ.स.१८७४ (इ.ऑ.)

## शारीर ( Anatomy )

१ शारीर–जॉन मॅक्लेनन, मुंबई इ. स. १८५२

२ मानुष शारीरशास्त्र–भिकाजी अमृत चोभे,
मुबई, इ. स. १८६३

## इंद्रियविज्ञानशास्त्र–( Physiology )

१ मानुष इंद्रियविज्ञानशास्त्र–भिकाजी अमृत चोभे, मुंबई,
इ. स. १८६५.

२ नरतनु—व्यंकट रंगो कट्टी मुधोळकर, बेळगांव,
इ. स. १८७१.

## ज्योतिःशास्त्र( Astronomy )—फलज्योतिष ( Astrology )

१ भूगोल आणि खगोल इत्यादि विषयक संवाद—पुणें,
इ. स. १८३२.

२ भास्कराचार्य—[ निबंध ] बाळशास्त्री जांभेकर,
मुंबई, इ. स. १८३६.

३ सिद्धांतशिरोमणिप्रकाश–सुब्राजी बापु, मुंबई, इ. स. १८३६

४ वीस वर्षांचें पंचांग—वि. स. अग्निहोत्री, पुणें,
इ. स. १८४५.

५ खगोलविद्या–अमेरिकन मिशन, मुंबई; इ. स. १८४६.

६ ज्योतिषसार–जनार्दन भास्कर क्रमवंत, मुंबई,
इ. स. १८४८.

७ ज्योतिषरत्न–वि. स. अग्निहोत्री, पुणे, इ. स. १८५३.

८ ग्रहलाघव—वामन कृष्ण जोशी गद्रे, कृष्णशास्त्री
गोडबोले, मुंबई, इ. स. १८५६.

९ स्फुट ज्योतिष–[ आवृत्ति ४ थी ] मुंबई,
इ. स. १८५६.(ब्रि.म्यु.)

१० स्फुट ज्योतिष [ Astrology ] रत्नागिरी, इ. स. १८५७
११ मुहूर्तमार्तंड—महादेवशास्त्री जोशी, रत्नागिरी, इ. स. १८५८
१२ ग्रहसाधनाचीं कोष्टकें—केरो लक्ष्मण छत्रे, मुबंई,
इ. स. १८६०.
१३ ज्योतिषचक्र—मुंबई, इ. स. १८६०. (ब्रि.म्यु.)
१४ आकाशसौंदर्य-कृष्णशास्त्री भाटवडेकर, मुंबई, इ. स. १८६१.
१५ ज्योति शास्त्र—कृष्णशास्त्री गोडबोले, मुंबई,
इ. स. १८६२.
१६ सामुद्रिक— पुणे, इ. स. १८६३ (ग्रां.कॅ.)
१७ पचागदर्शन—परशुरामपत गोडबोले. पुणें, इ. स. १८६३ (ग्रां.कॅ.)
१८ नारायणी प्रश्नावली— मुबंई, इ. स. १८६४. (ग्रां.कॅ.)
१९ ज्योतिष—कृष्ण फौजदार, इ. स. १८६६. (म.वा.)
२० सहदेवकृत ज्योतिष इ. स. १८६७. (म.वा.)
२१ तिथिचिंतामणि—गोपिनाथ सदाशिव पराजपे,
कोल्हापूर, इ. स. १८६८.
२२ प्रश्नभैरव—लक्ष्मण गोपाळ दीक्षित, पुणें, इ. स. १८६८. (इं.ऑ.)
२३ गर्गाचार्यकृत प्रश्नावली— पुणें, इ. स. १८६८. (इं.ऑ.)
२४ चमत्कारचिंतामणि—लक्ष्मण गोपाळ दीक्षित,
( आवृत्ति २ री ) पुणे, इ. स. १८६९. (इं.ऑ.)
२५ घटित पहाण्याची रीत—चिंतामण सदाशिव वाघ,
इ. स. १८६९. (म.वा.)
२६ सहदेव मताचे ज्योतिषरत्न—नारो आप्पाजी गोडबोले,
( आवृत्ति ३ री ) पुणें, इ. स. १८७०.

२७ पंचागसाधनसार वामन कृष्ण जोशी गद्रे,
मुंबई, इ. स. १८७०.

२८ छायायंत्राचा नकाशा—बाळाजी नारायण फडके,
इ. स. १८७१. (म.वा.)

२९ केशवीप्रकाश—आत्माराम घोडभट साधले, वामन लक्ष्मण
जोशी, मुंबई, इ. स. १८७२. (इं ऑ.)

३० जातकालंकार—आत्माराम काशिनाथशास्त्री, मुंबई,
इ. स. १८७३. (इं.ऑ.)

३१ बृहत्संहिता [ वराहमिहिरकृत ] मराठी भाषांतरासह
जनार्दन हरी आठल्ये, रत्नागिरी, इ. स. १८७३.

३२ श्रीमत्वराहमिहिराचार्यकृत बृहज्जातक—( मराठी भाषांतर )
माधवराव ब्रम्हाजी संगमनेरकर, मुंबई, इ. स. १८७४.

३३ शुक्रग्रस्तविचित्रसूर्यग्रहण—गणेश जनार्दन आगाशे,
पुणें. इ. स. १८७४. (इं.ऑ.)

## कायदा*

### हिंदुधर्मशास्त्र ( Hindu Law )

१ मिताक्षरा व्यवहाराध्याय व मयूखदायभाग—मराठी भाषांतर ( न्यायाचे उपयोगासाठीं ) रघुनाथशास्त्री दांत्ये पुणे, इ. स. १८८८.

---

* ह्या काळांत कायद्याचीं बरींच पुस्तकें प्रसिद्ध झाली. विस्तारभयास्तव त्यांपैकी जीं विशेष महत्वाचीं वाटली तेवढींच ह्या यादींत दाखल केलीं आहेत.

२ धर्मशास्त्र—काशिनाथ महादेव फडके, पुणे,
इ. स. १८६४(ग्रां.कॅ.)

३ हिंदुधर्मशास्त्र [ व्यवहारखंड ] विश्वनाथ नारायण मंडलीक,
मुंबई, इ. स. १८६७

४ हिंदुधर्मशास्त्रसार भाग (१।२)—जनार्दन सखाराम गाडगीळ,
मुंबई, इ. स. १८६८–७०

## मुसलमानी कायदा

५ मुसलमानी दिवाणी कायदा—व्यंकटराव रामचंद्र मुंबई,
इ. स. १८६७

६ महमदीशास्त्र—रामचंद्र मोरेश्वर गुप्ते कऱ्हाडकर.
योगिराज व्यंकाजी रिसबुड, मुंबई, इ. स. १८६७

## संकीर्ण

७ पोलिस कायदा—जेम्स स्पीअर्स—मुंबई, इ. स. १८५५

८ गांवचे वहिवाटीविषयी वही—गणेश बाबाजी माटे,
पुणें, इ. स.१८५६(ग्रां. कॅ.)

९ न्यायाब्धिसेतु भाग २—मोरेश्वर सखाराम चितळे, जनार्दन
हरि आठल्ये रत्नागिरी, इ. स. १८५६–५७

१० मुलकी उमेदवार—जनार्दन हरि आठल्ये, रत्नागिरी
इ. स. १८५९ (ग्रां.कॅ.)

११ दिवाणी काम चालविण्याचे रीतीविषयींचा कायदा—मेजर
टी. क्याडी मुंबई, इ. स. १८५९ (ग्रां.कॅ.)

१२ हिंदुस्थानच्या अपराध्यांस शिक्षा करण्याविषयी कायदा—
(Indian Penal Code) मेजर टी. कयांडी
मुंबई इ. स. १८६० (ग्रा.कॅ.)

१३ फौजदारी कायदा—खंडेराव बाळाजी फडके,
रत्नागिरी, इ. स. १८६१ (ग्रा.कॅ.)

१४ दिवाणी कायदा—नारायण मोरेश्वर केळकर,
पुणे, इ. स. १८६१ (म.वा.)

१५ अपराधबोधक—चिंतो विश्वनाथ पेठे,पुणें, इ. स. १८६२ (ग्रा.कॅ.)

१६ फौजदारी सर्वसंग्रह—नारायण मोरेश्वर केळकर,
पुणे, इ. स. १८६२ (ग्रां.कॅ.)

१७ न्यायदर्पण—गणेश बाबाजी मराटे, बाळकृष्ण वामन
चोळकर, पुण, इ. स. १८६२ (ग्रां.कॅ.)

१८ प्रमाणशास्त्र—मुकुंदराव भास्करजी, मुंबई, इ. स. १८६३

१९ करारशास्त्र—बाबाजी गणेश देशपांडे, पुणे, इ. स. १८६४ (ग्रां.कॅ.)

२० मुलकी सर्वसग्रह—नारायण मोरेश्वर केळकर,
पुणें, इ. स. १८६४ (ग्रा. कॅ.)

२१ करारशास्त्र—वासुदेव जगन्नाथ कीर्तीकर,
मुंबई, इ. स. १८६५ (इं. ऑ.)

२२ कायद्यासंबंधीं नियम—व्यंकटराव रामचंद्र,
मुंबई, इ. स. १८६९ (इं.ऑ.)

२३ अपकृत्यशास्त्र—महादेव चिमणाजी आपटे,
मुंबई, इ. स. १८७०

२४ रेव्हेन्यु-तत्त्वसंग्रह—धोंडो गोपाळ मुजूमदार,
पुण, इ. स. १८७२ (इं.ऑ.)

## अर्थशास्त्र

१ व्याज—बाळ रघुनाथ, मुंबई, इ. स. १८४३(ग्रां.कॅ.)
२ लक्ष्मीज्ञान—'कामगार लोकांशी संभाषण' या ग्रंथाच्या कर्त्याने केले. पुणें, इ. स. १८४९
३ संपत्तिविवेचन—नारो बाळकृष्ण पटवर्धन, मुंबई, इ. स. १८५३(ग्रां.कॅ.)
४ देशव्यवहारव्यवस्था—हरि केशवजी पाठारे, विश्वनाथ नारायण मंडलीक, मुंबई, इ. स. १८५४
५ अर्थशास्त्रपरिभाषा—कृष्णशास्त्री चिपळूणकर, पुणे, इ. स. १८५५

## व्यापार

१ व्यापारदर्पण—शंकरशास्त्री गोखले, पुणे, इ. स. १८५२(ग्रां.कॅ.)
२ दलालाची ठकबाजी— पुणें, इ. स. १८६४(ग्रां.कॅ.)
३ व्यवहारदर्पण—शंकरशास्त्री गोखले, मुंबई, इ. स. १८७१

## पदार्थविज्ञानशास्त्र

१ सिद्धपदार्थविज्ञानशास्त्रविषयक सवाद—हरि केशवजी मुंबई, इ. स. १८३३
२ पदार्थविज्ञानशास्त्रांतील कितीएक विषयांवर व्याख्याने— पुणे, इ स. १८५२
३ पदार्थविज्ञानशास्त्र—केरो लक्ष्मण छत्रे, पुणें, इ. स. १८५५(ग्रां.कॅ.)

४ पदार्थविज्ञानशास्त्र—पदार्थ आणि चलन ह्याविषयी,
महादेव गोविंदशास्त्री, मुंबई, इ. स. १८६१

५ सृष्टपदार्थदर्पण—महादेव श्रीधर भावे,मुबई, इ. स. १८७३ (इं.ऑ.)

## रसायनशास्त्र

१ रसायनशास्त्रविषयक संवाद—हरी केशवजी,
मुंबई, इ. स. १८३७

२ रसायनशास्त्र अथवा हुन्नेरनिधी( भाग ३ )
रामजी गणोजी चौगुले, मुंबई, इ. स. १८५९ (ग्रां.कॅ.)

३ रसायनशास्त्र—नारायण दाजी, मुबई इ. स. १८६३ ( ग्रा.कॅ.)

४ हरहुन्नर-स्नेही ( भाग २ )—आत्माराम विनायक पाटकर,
पुणें, इ. स. १८७१ (इं.ऑ.)

५ उपयुक्त चमत्कारसंग्रह—गगाधर गोविंद सापकर,
पुणे, इ. स. १८७२ (इं.ऑ.)

## यंत्रशास्त्र

१ शिल्पविद्या या विषयाचे निबंध—विलियम हेनरी बेल,
नारायणशास्त्री जोशी, मुंबई, इ. स. १८३५

२ पदार्थविद्या (भाग१)—शिल्पविद्या, मुंबई, इ. स. १८४६

३ यंत्रज्ञान—पंदनाम्याचे भाषांतर करणाऱ्याने केले.
पुणें, इ. स. १८५०

४ यंत्रशास्त्राची मुळे—गोविंद गगाधर फडके,
मुंबई, इ. स. १८५३

## शेतकी व बागाईत

१ दक्षिण देशांत तुतीचें झाड करण्याची व रेशिमाचे किडे पाळण्याची व रेशिम उत्पन्न करण्याची रीति—सीनियर जी .मटि इ. स. १८३८

२ जागती जोत—शेतपोत रीतभात यांविपर्यी वाद, रामचंद्र अमृत दुगल, नासिक,इ. स. १८३८

३ शेतकी आणि घरगुती व्यवस्था—आलेक्झांडर गिब्सन पुणें, इ. स. १८४६

४ उद्भिज्जन्यपदार्थ—गोविंद नारायण मुंबई, इ. स. १८५६

५ वृक्षवर्णन—गोविंद नारायण. मुंबई, इ. स. १८५७

६ Notes on the cultivation of mulberry trees and preparation of silk जी. मटि. पुणें, इ. स. १८६७(इं.ऑ.)

७ खानदेशकृषिकर्मोत्तेजक प्रदर्शन मुंबई, इ. स. १८७१ (इं.ऑ.)

८ खताचे प्रकार— मुंबई, इ. स. १८७३ (इं.ऑ.)

९ पुष्पवाटिका—लक्ष्मण जयदेव गोरे, ठाणें, इ. स. १८७३ (इं.ऑ.)

१० वृक्षविनोद—वामनशास्त्री बेंदरकर, पुणें, इ. स. १८७३ (इं.ऑ.)

## संगीत

१ गायनप्रकाश—भाऊशास्त्री अष्टपुत्रे, पुणें, इ. स. १८५०

२ गीतलिपि—गोवर्धन लक्ष्मण छत्रे, मुंबई, इ. स. १८६४

३ तंतुवाद्य—सतार शिकण्याचें पहिलें पुस्तक—सूर्याजी सदाशिव महात्मे, विश्वनाथ रामचंद्र वकील, मुंबई, इ. स. १८७२

## तर्कशास्त्र

१ तर्कशास्त्र—अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, इ. स. १८४६
२ न्यायसिंधुपोत—तर्कसंग्रहाची प्राकृत टीका—बाळकृष्ण विद्याधर हळबे, मुंबई, इ. स. १८७२

## शिल्पशास्त्र

१ सर्वेपरिज्ञान—चिंतो विश्वनाथ, पुणें इ. स. १८६७
२ शिल्पोपयुक्तसंग्रह—सिताराम खंडेराव, मुंबई इ. स. १८७१
३ शिल्पशास्त्रावर व्याख्यान—( लॉर्ड नेपियर याचे ) मराठी भाषांतर—उइलियम हेनरी ह्यावलक पुणे इ. स. १८७१
४ सर्वे क्षुब्दोध—बाळ गगाधर तावे, गोविंद लक्ष्मण गुरल्हासुरकर, पुणें इ स. १८७२

## प्राणिशास्त्र

१ कित्येक जनावराचे वर्णन— पुणें इ. स. १८३९ (ग्रां. कॅ.)
२ जनावराच्या गोष्टी—नारो रामचंद्र पुणे इ. स. १८५६ (ग्रा. कॅ.)
३ शालिहोत्रटीका— मुंबई इ. स. १८६३ (ब्रि. म्यु.)
४ सृष्टिजन्यश्वापदचित्रसंग्रह—कृष्णशास्त्री भाटवडेकर मुंबई इ. स. १८६४ (ग्रा. कॅ.)
५ अश्वपरीक्षा—सटीक. नारो आपाजी गोडबोले पुणें इ. स. १८६७ (ब्रि. म्यु.)

## सृष्टिशास्त्र

१ सृष्टींतील चमत्कार—गोविंद नारायण माडगांवकर

मुंबई इ. स. १८५२ (इं. ऑ.)

२ सृष्टींतील चमत्कार—डेविड हाइम, मुंबई इ. स. १८७० (इं. ऑ.)

३ सृष्टिज्ञानपरिभाषा—सखाराम बापूशेट दांडेकर

ठाणें इ. स. १८७१ (इं. आ.)

## भूप्रकृतिविद्या

१ वाय्वावरण आणि त्यांतील चमत्कार—(टामस डिक साहेबाच्या इंग्रजी ग्रंथावरून ) भाऊशास्त्री थेऊरकर, मुंबई इ. स. १८५७

२ भूप्रकृतिविद्या—सखाराम बापू दाडेकर, इ. स. १८७१ (इ. ऑ.)

३ भूगोल व भूप्रकृतिविद्या व ज्योतिषासंबंधीं सामान्य माहिती—भिकाजी धोंडदेव निगुडकर, इ. स. १८७४ (म. वा.)

## संकीर्णग्रंथ

१ विद्येचे उद्देश, लाभ आणि संतोष या विषयांचे वाद—जॉर्ज जर्व्हिस ( जगन्नाथशास्त्री क्रमवंत यांचे साह्यानें )

मुंबई इ. स. १८२९

२ सारसंग्रह— मुंबई इ. स. १८३१

३ गणितशास्त्राच्या उपयोगाविषयीं संवाद

मुंबई इ. स. १८३५

४ भूगोलशास्त्र—गणित—भाग ( Mathematical Geography ) बाळशास्त्री जांभेकर मुंबइ इ. स. १८३६

५ शास्त्रीय ज्ञानदर्शन—सखाराम रामचंद्र दीक्षित, विष्णु अमृतराव
मुंबई इ. स. १८५६

६ शंकुच्छेद—दाजी नीळकंठ नगरकर, पुणें इ. स. १८५६

७ फोटोग्राफी—हरिश्चंद्र चिंतामण, मुंबई इ. स. १८६० (ग्रां. कॅ.)

८ अनेकविद्यामूलतत्वसंग्रह मुंबई इ. स. १८६१

९ कालमापकयंत्रपरिभाषा—बाळाजी नारायण फडके
पुणें इ. स. १८७१ (इं. ऑ.)

१० मल्लविद्याप्रकाशक—सिताराम बल्लाळ महाजन—
पुणें इ. स. १८७२ (इं. ऑ.)

११ शिवणकला—विष्णु मोरेश्वर थत्ते पुणें इ. स. १८७३ (इं. ऑ.)

---

# १० ख्रिस्ती वाङ्मय

एकोणिसाव्या शतकाच्या पूर्वार्धातील ख्रिस्ती धर्मप्रसारकांचें प्रचारकार्य मराठी गद्य–वाङ्मयाच्या वाढीला कसें उपकारक झालें, तें 'सामान्य निरूपण' या प्रकरणांत दिग्दर्शित केलें आहेच. ख्रिस्ती धर्म व पाश्चात्य संस्कृति यांचें श्रेष्ठत्व एतद्देशीय लोकांच्या मनावर बिंबविण्यासाठीं त्यांनीं मराठी भाषेंत निरनिराळ्या प्रकारचीं लहानमोठीं पुस्तकें प्रसिद्ध केलीं. ख्रिस्ती धर्मग्रंथ व प्रार्थना यांचीं भाषांतरें केलीं, मुद्रणकलेच्या साह्यानें हिंदुधर्म व समाजव्यवस्था यावर टीकेची झोड उठविली, आणि त्या बरोबरच गोष्टी आणि संवाद यांच्या रूपानें येशू ख्रिस्ताची शिकवण आबालवृद्धांना सुगम करून सांगण्याचा प्रयत्न केला. व्याकरणाच्या दृष्टीनें ही पुस्तकें कितीहि सदोष असलीं, तरी मराठी भाषेंत गद्यलेखनाची प्रथा रूढ होण्यास त्यांचा पुष्कळच उपयोग झाला यांत कांहीं शंका नाहीं.

**ख्रिस्ती धर्मग्रंथ व प्रार्थना**

प्रथमतः श्रीरामपुर येथील मिशनऱ्यांनीं ख्रिस्ती धर्मग्रंथांचीं भाषांतरें करण्यास प्रारंभ केला. त्यानंतर मुंबईस अमेरिकन मिशनच्या प्रचारकांनीं हें काम हातीं घेतलें. ख्रिस्ती शास्त्राचीं सर्व भाषांत भाषांतरें छापण्यासाठीं इ. स. १८१३ त 'मुंबई बायबल सोसायटी' स्थापन झाला. इ. स. १८२६ सालीं अमेरिकन

मिशनच्या विद्यमाने नव्या कराराचें संपूर्ण भाषांतर प्रसिद्ध झालें. यानंतरच्या काळांत बॉम्बे ट्राक्ट आणि बुक सोसायटीनेंहि बरींच पुस्तकें प्रकाशित केलीं. रेव्हरंड जे. बी. डिक्सन यांनीं दाजीशास्त्री शुक्ल यांच्या साह्यानें जुन्या कराराचें मराठींत भाषांतर केलें. या शिवाय 'पावसाविषयी प्रार्थना,' 'देवाच्या दहा आज्ञा,' 'प्रेषितांचीं कृत्यें,' 'पश्वादि भूतदया', 'शाब्बाथ निरूपण' इत्यादि अनेक खिस्ती धर्मविषयक ग्रंथ या काळी छापले गेले. यापैकीं नव्या करारांतील एक उतारा खालीं देत आहे.

> "आणि ते वाटेने जात असता । असे जाले । कोणी त्याला बोलिला । प्रभू । जेथे जेथे तूं जातोस । तेथें मी तुला अनुसरेन ॥ ५८ ॥ तेव्हा येशू त्याला बोलिला । कोल्ह्यास बिळे । आणि आकाशांतल्यां पांखरांस वस्त्या आहेत । परंतु मनुष्याच्या पुत्राला जेथे डोकें टेकावे ते नाहीं ॥ ५९ ॥ मग तो दुसऱ्याला बोलिला तूं मला अनुसर । परंतु तो बोलिला । हे प्रभू । पहिले माझ्या बापाला पुरायास मला जाउं दे ॥ ६० ॥ तेव्हा येशू त्याला बोलिला । मेलेल्यांस आपल्या मेल्यांस पुरूं दे । परंतु तूं जाऊन देवाच्या राज्याचें वर्तमान प्रगट सांग ॥ ६१ ॥ तेव्हां दुसराही बोलिला । हे प्रभू । मी तुला अनुसरेन । परंतु पहिले माझ्या घरीं जे । यांची निरवणी मला करूं दे ॥ ६२ ॥ तेव्हा येशू त्याला बोलिला । कोणी आपला हात नांगरास लावतो । आणि माघारें पाहातो तो देवाच्या राज्याजोगा नाहीं ।"†

† नवा करार (इ. स. १८३०) पृ. १७४

**हिंदूंचे धर्मग्रंथ व चालीरीती यांवर टीका**

ख्रिस्ती धर्माचें श्रेष्ठत्व स्थापित करण्यासाठीं हिंदुधर्मातील वैगुण्य व दोष दाखविणे अवश्य होते, यासाठीं ख्रिस्ती धर्म-प्रसारकांनीं हिंदूंचे धर्मग्रंथ व चालीरीती यांचा बारकाईनें अभ्यास करून त्यावर टीका करण्यास सुरवात केली. 'उपदेशचंद्रिका' मासिकाचे संपादक मोरभट दांडेकर आणि सातारा विद्यालयांतील अध्यापक नारायणराव यांचा मुंबइचे प्रसिद्ध मिशनरी जॉन विल्सन यांच्या हिंदुधर्मप्रकरणीं कडाक्याचा वादविवाद झाला. यांतील आक्षेपांना प्रत्युत्तर म्हणून विल्सन साहेबानें 'हिंदुधर्मप्रसिद्धीकरणाचे' दोन भाग प्रसिद्ध केले. रॉबर्ट निब्बिट यांनी 'भगवद्गीतेचे सार' या पुस्तकात गीतेतील सिद्धांत खोडण्याचा हास्यास्पद प्रयत्न केला आहे. मूर्तिपूजा, जातिभेद, पुनर्जन्म इत्यादि अनेक विषयांवर मिशनरी लोकांनी पुस्तकें लेहिली. त्यांच्या लेखणीच्या कचाट्यातून हिंदूंचा एकहि सामाजिक प्रश्न सुटला आहे असे दिसत नाही बाबा पद्मनजी यांनी 'हिंदुधर्म व ख्रिस्तीधर्म यांची तुलना' व 'कृष्ण आणि ख्रिस्त यांची तुलना', 'मतपरीक्षा' इत्यादि ग्रंथ प्रसिद्ध केले. या शिवाय 'ब्राम्हणाचें महत्व,' 'मूर्तीचा उच्छेद', 'होळीविषयीं उपदेश', 'तुळशीचे लग्न' इत्यादि अनेक टीकात्मक पुस्तकें त्याकाळीं छापली गेली.

**बोधपर मनोरंजक गोष्टी व संवाद**

मनोरंजक गोष्टी व संवाद यांच्या द्वारेंहि ख्रिस्ती धर्मातील तत्वे सामान्य लोकांच्या मनावर ठसविण्याचा मिशनरी लोकांनी उपक्रम केला. मिसेस फारार या ख्रिस्ती लेखिकेनें लहान लहान गोष्टींचा चारपांच पुस्तकें प्रसिद्ध केलीं. याशिवाय 'बाबाजीची बखर' 'राधानाथाची गोष्ट' 'गरीब तारा हिची गोष्ट' इत्यादि गोष्टीरूप ग्रंथ या काळीं प्रसिद्ध झाले. त्या सर्वांत

हरी केशवजी यांचें 'यात्रिकक्रमण' ( Pilgrim's Progress ह्या रूपकात्मक कथाग्रंथाचे भाषांतर ) हें पुस्तक उत्तम वठलें आहे. त्यांतील एक उतारा खालीं देत आहे.

" मग सुवार्तिक बोलूं लागला कीं, तुला ज्या गोष्टी सांगतो त्याविषयीं जपून रहा, तुला ज्यानें भुलविलें तो कोण आणि तो ज्याकडेस तुला पाठवित होता तो कोण हें मी तुला सांगतो. तुला जो भेटला त्याचे नाव प्रपंच सुज्ञ; हे त्याचे नाव वास्तावक आहे. कां तर त्यांचे मनांत प्रपंचाचेंच मत वागतें, म्हणून तो सुवर्तन गावांच्या भजनसभेस जातो; त्याला प्रपंचाचे मत अतिशय आवडते, त्याचें कारण असे आहे कीं या मतात त्याला क्रुसाचे श्रम सोसावे लागत नाहो; आणखी त्याचा शारीर स्वभाव आहे. म्हणून माझा मार्ग नीट असताही त्या मार्गास तो दूषितो. या मनुष्याने तुला विचार सागितला त्यांत तीन गोष्टी आहेत. त्यांचा त्वां सर्वस्वें त्रास मानावा. त्या अशा, त्याने. तुला तुझा मार्ग सोडावयास सांगितलें—क्रूस त्रासदायक आहे असे सुचविलें—आणि ज्या मार्गानें मरण प्राप्त व्हावें अशा मार्गाकडेस तुझी योजना केली."*

ह्या काळातील काही प्रमुख ख्रिस्तीधर्मप्रसारकाची या ठिकाणी थोडक्यांत माहिती देणे अवश्य आहे.

**रॉबर्ट निज्बिट**
**( इ. स. १८०३–५५ )**

रॉबर्ट निज्बिट हे इ. स. १८२७ त हिंदुस्थानांत आले. त्या नंतर त्यानी मराठी भाषेचा अभ्यास केला. शुद्ध व स्पष्ट उच्चाराबद्दल त्यांची फार ख्याति होती. त्यांनी 'खरा पश्चात्ताप' ( इ. स. १८३० ), 'भगवद्गीतेचें सार' ( इ. स. १८३२ ) 'ब्राम्हणाचे

* यात्रिकक्रमण पृ. ३०–३१

महत्व (इ. स. १८३३) आणि 'Worship of elements' (इ. स. १८३५) प्रसिद्ध केली. त्यापैकीं 'भगवद्गीतेचें सार' या पुस्तकांतील एक उतारा खाली उध्दृत करितो.

"सोन्याचे गोळ्यास कळंक लागत नाही आणि त्या सोन्याचा कितीहि लहान तुकडा जरीं केला तरी त्यालाहि कळंक लागणार नाही ॥ गोळ्याचे गुण जे असतील ते तुकड्यामध्येंहि राहतात ॥ मनुष्याचा जीव देवाचा अंश असता तर जे देवाचे गुण असतील ते त्या जीवामध्येंहि राहते ॥ देवाला अज्ञान नाही आणि जर मनुष्याचाजीव त्याचा अंश असता तर त्या जीवालाहि अज्ञान नसते ॥ मनुष्याचे जीवाला तर अज्ञान आहे, यावरून जाणावें कीं तो जीव देवाचा तुकडा नाहीं ॥ सोन्यासारिखा एक धातुचा तुकडा आहे ॥ त्याची परीक्षा पाहिल्यावर मला समजते की त्याला कळंक लागतो ॥ यावरून मी जाणतो की तो सोन्याचा तुकडा नाहीं ॥ सोन्याचे गुण त्याजमध्यें नाहीत यावरून सोन्याचा तुकडा नाहीं असा माझा निश्चय होतो ॥ तसें ह्या जिवाला देवाचे गुण नाहींत यावरून सिद्ध होते की तो देवाचा तुकडा नाही ॥"†

**डॉं. जॉन विल्सन**
**(इ. स. १८०४–१८७५)**

डॉ. जॉन विल्सन हे इ. स. १८२९ साली हिंदुस्थानांत आले. धर्मप्रसाराच्या कार्यासाठी त्यानी संस्कृत, मराठी, गुजराथी, हिंदुस्थानी, फारशी इत्यादि अनेक पौरस्त्य भाषांचे परिश्रमपूर्वक अध्ययन केले. विद्वत्ता, दीर्घोद्योग, कर्तव्यनिष्ठा, मनुष्यमात्राविषयी प्रेमभाव इत्यादि अलौकिक

---

† भगवद्गीतेचे सार पृ. ४९–५०

गुणामुळें त्यांनीं आपल्या विद्यार्थ्यांवर व सहकारी मित्रांवर विलक्षण छाप बसविली होती. त्यांच्या कार्याचा व्याप दांडगा असल्यामुळ मुंबई इलाख्यांत ते फार प्रसिद्धी पावले. मोरभट दाडेकर व सातारचे नारायणराव ( स्वदेशधर्माभिमानी ) याच्या आक्षेपांना प्रत्युत्तर म्हणून त्यांनी 'हिंदुधर्मप्रसिद्धीकरणाचे' दोन भाग ( इ. स. १८३२–३५ ) प्रसिद्ध केले. याशिवाय त्यांचे भाषाविषयक बरेच इंग्रजी निबंध तत्कालीन मासिकातून प्रसिद्ध झाले होते. त्यांच्या 'हिंदुधर्मप्रसिद्धीकरण' ( भाग २ रा ) या ग्रंथातील एक उतारा खालीं देत आहे.

> "सर्व वस्तुमात्रात देवाची व्याप्ति आहे अशा मतंकरून ईश्वराचे आत्मत्व जे स्पष्ट वादावरून सिद्ध होतें त्याचे खंडण होतें अथवा सर्व वस्तु ज्या दृष्टीस पडतात त्या मिथ्या असें दर्शवितें. सर्व पदार्थमात्र ईश्वरप्रकृतीचे अंश आहेत असे म्हटले असता प्रत्यक्षेकरून असा सिद्धात होतो की ईश्वर द्विभागिला जातो. त्याचे तुकडे व रक्षा होती व ता पृथ्वविर प्रसृत होतो मिश्र होतो त्याचीं अनक स्वरूपे होतात आणि तो असंख्य प्रकारें बदलला जातो. ह्या सर्व गोष्टी मायारूपी असे म्हटलें असता साधारण बुद्धीस आणि खऱ्या विद्येस अगदीं विपरीत होते. देव फसवलेला आणि फसवणारा आहे असे ह्या हिंदूमतापरून दिसते वाहवा जी वाहवा." *

**स्टिव्हेन्सन**

रेव्हरंड जे. स्टिव्हेन्सन यानींहि मराठी भाषेचा फार चांगला अभ्यास केला होता. त्यांनी 'मराठी भाषेचें व्याकरण' व 'इंग्लिश भाषेचा व्याकरणाची मूळपीठिका' हे दोन व्याकरणविषयक ग्रंथ लिहिले. इ. स. १८३३ त त्यांनीं ऋग्वेदाच्या

* दुसरे हिंदुधर्मप्रसिद्धीकरण पृ. १९–२०

कांहीं भागाचे मराठी भाषांतर प्रसिद्ध केलें. याशिवाय त्याची अनेक लहान लहान पुस्तकें याकाळीं छापलीं गेलीं.

**मिसेस फारार.**

नाशिक येथील ख्रिस्ती–धर्मप्रचारक सी. पी. फारार यांच्या पत्नी मिसेस फारार यांनीं 'शास्त्रांतील सुबोध धडे,' (इ. स. १८३५) 'बाळबोध गोष्टी,' (इ. स. १८३८) 'यात्रेकऱ्याचा' वृत्तान्त (इ. स. १८३८) इत्यादि पाच सहा मराठी पुस्तकें लिहिली. अर्वाचीन काळातील पहिल्या स्त्रीलेखिका म्हणून मिसेस फारार यांचा प्रयत्न विशेष कौतुकास्पद आहे.

**बाबा पदमनजी**
**(१८३१–१९०६)**

मालापूर्वकालीन गद्यवाङ्मयातील प्रमुख लेखकात बाबा पदमनजी याची गणना केली पाहिजे. त्यानी मराठी भाषेत चाळीस पन्नास पुस्तकें लिहिली. त्यापैकीं स्त्री-विद्याभ्यास, व्यभिचारनिषेधक बोध, यमुना-पर्यटन, निबंधमाला इत्यादिकाची माहिती मागील प्रकरणांतून आलेली आहेच. याशिवाय त्यानीं 'ख्रिस्ती धर्मासबधी मतपरिक्षा', 'कृष्ण आणि ख्रीस्त यांची तुलना', 'निःशास्त्रवादपरीक्षा', 'आत्मारामपंत आणि मृत्यु शिपाई', 'सिद्धांतरत्नमाला' इत्यादि अनेक पुस्तके प्रसिद्ध केली. त्यांची भाषा शुद्ध, सुबोध व गोड असून तिच्यांत ईश्वरभक्तीचा जिव्हाळाहि आहे. त्याच्या इतकी विस्तृत ग्रंथरचना त्याकाळच्या दुसऱ्या कोणाहि लेखकाच्या हातून झालेली नाहीं. बाबांचा जन्म इ. स. १८३१ त झाला. विद्यार्थी दशेंत असतानाच डॉक्टर विल्सन, जेम्स मिचल, रॉबर्ट निज्बिट ह्या ख्रिस्तीधर्मप्रचारकांच्या शुद्ध व प्रेमळ वर्तनाचा त्याच्या मनावर बराच परिणाम झाला व तेव्हापासूनच त्यांची हिंदुधर्मावरील श्रद्धा डळमळू लागली होती. इ. स. १८५४ त त्यांनीं

ख्रिस्ती धर्म स्वीकारला. त्यांनी आपल्या धर्मांतराचा विस्तृत वृत्तात 'अरुणोदय' या ग्रथांत निवेदन केला आहे. 'सत्यदीपिका' ह्या ख्रिस्ती मासिकाचें ते काम पहात असत. त्यांच्या 'कृष्ण आणि खीस्त यांची तुलना' या पुस्तकातील एक उतारा खालीं देत आहे.

"हिंदु लोक असें समजतात कीं कृष्ण अवतारी पुरुष होता म्हणून त्याची बाळपणींची क्रीडा निर्दोष होती. अणखी ते असें म्हणतात की, मनुष्याचा अवतार घेतला तर मनुष्याप्रमाणें आचरण केलेंच पाहिजे. ह्यास आमचें असें उत्तर आहे कीं कृष्णास अवतारी पुरुष मानल्यानें त्याची बालक्रीडा विशेष दूषणार्ह होते जर तो देव असून मनुष्यरूप घेऊन आला असें मानिलें तर त्याची वर्तणूक विशेष निर्मळ असायाची होती.तो मनुष्य कशाला झाला? पापी मनुष्यांस सद्वर्तनाचा धडा घालून द्यायास कीं नाहीं? मनुष्याचा अवतार ईश्वर घेईल तर तो त्याच्या पापाचाही अवतार घेईल काय? जसा प्रारंभी मनुष्य पवित्र होता तसा तो होऊन त्यास पूर्वीसारखा पवित्र करायाचा उपाय योजील. कृष्णास साधारण मनुष्य कल्पून त्याच्या बालक्रीडेचा विचार केला असता त्यापासून आतां कोणाचें विशेष अनहित होणार नाहीं. त्याप्रमाणें अनेक दुर्गणी लेंकरें आजपर्यंत होऊन गेलीं, आणि त्यांनीं व कृष्णानें जे अनाचार केले असतील त्यांपासून त्यांच्याच वेळच्या लोकाचे अनहित झाले असेल. पण कृष्णास देव मानल्याने आज शतावधि वर्षांपासून लक्षावधि लोकांचा नाश होत आहे." †

याशिवाय जे. बी. डिक्सन, हेनरी ब्यालंटिन, जेम्स मिचल, नारायण शेषाद्रि इत्यादि लेखकांनींहि ख्रिस्ती धर्मासबंधीं अनेक लहानमोठी पुस्तकें लिहिलीं.

---

† कृष्ण आणि खीस्त याची तुलना पृ. १०

# परिशिष्ट

## ख्रिस्ती धर्मग्रंथ व प्रार्थना

१ सेंट मॅथ्यू — श्रीरामपुर, इ. स. १८०५
२ होलीबायबल—पांच भाग — श्रीरामपुर, इ. स. १८०७-२१
३ मंगळसमाचार—( New Testament )
श्रीरामपुर, इ. स. १८११ ( ब्रि. म्यु.)
४ नवा करार—(कोंकणी भाषेंत )
श्रीरामपुर इ. स. १८१८ ( ब्रि. म्यु.)
५ होलीबायबल ( कोंकणी ) श्रीरामपुर, इ. स. १८२१ ( इं. ऑ.)
६ सेंट मॅथ्यू — मुंबई, इ. स. १८२०
७ नवा करार—अमेरिकन मिशन—मुंबई, इ. स. १८२६ (इं.ऑ.)
८ खरें प्रायश्चित्त—रॉबर्ट निज्बिट — मुंबई, इ. स. १८३०
९ पहिली प्रश्नोत्तरावलि — मुंबई, इ. स. १८३३
१० Wrath to come — मुंबई, इ. स. १८३३
११ पावसाविषयीं प्रार्थना — मुंबई, इ. स. १८३३
१२ The way of Salvation रे. मिचेल,
मुंबई, इ. स. १८३३

१३ ईश्वराचे पवित्रत्व—रे. सी. पी. फारार
नाशिक, इ. स. १८३५ (इं.ऑ.)

१४ साधारण प्रार्थना—रे. जे. डिक्सन, मुंबई, इ.स. १८३५ (इं.ऑ.)

१५ पुरातन परम पवित्र लेख—जे. डिक्सन,
मुंबई, इ. स. १८३७ (इं.ऑ.)

१६ शास्त्रांतील सुबोध धडे—मिसेस फारार,
मुंबई, इ. स. १८३८ (इं.ऑ.)

१७ आमचा तारणारा प्रभु येशु ख्रिस्त याविषयीं शुभवर्तमान—
अमेरिकन मिशन, मुबई, इ. स. १८४०

१८ प्रार्थना ( आवृत्ति ४थी ) मुंबई, इ. स. १८४१

१९ देवाच्या दहा आज्ञा मुंबई, इ. स. १८४१ (ब्रि.म्यु.)

२० देवाचें भजन करण्याची रीत— मुंबई, इ. स. १८४१ (ब्रि.म्यु.)

२१ एका दिवशीं कोणी एक ख्रिस्ती, मुंबई, इ. स. १८४५ (ब्रि.म्यु.)

२२ एस्त्राएलास हितोपदेश इ. स. १८४५ (ब्रि.म्यु.)

२३ शुभवर्तमानसंबंधीं प्रश्नोत्तरावळी— मुंबई, इ. स. १८४५
( बॉ. ट्रा बु. सोसायटी )

२४ यथातथ—अमेरिकन मिशन प्रेस, मुंबई, इ. स. १८४६

२५ पहिले पुस्तक ( Genesis ) रे. जे. डिक्सन
मुंबई, इ. स. १८४६

२६ दुसरें पुस्तक ( Genesis ) रे. डिक्सन,
मुंबई. इ. स. १८४६

२७ पांचवें पुस्तक—नेमप्रकरण रे. डिक्सन,
मुंबई इ. स. १८४६

२८ शुभ वेळांचें पहिलें पुस्तक--सॅम्युअल मुंबई इ. स. १८४६
२९ प्रेषितांची कृत्यें मुंबई, इ. स. १८४७ (इं.ऑ.)
३० ज्ञानमार्गाची सूचना ( आवृत्ति २ री )
बॉ. ट्रा. बु. सोसायटी मुंबई, इ. स. १८४९
३१ ख्रिस्ती मंडळीची बखर—Rev. Barth
मुंबई, इ. स. १८५०
३२ विश्वासकथा ( on Faith ) मुंबई, इ. स. १८५० (इं.ऑ.)
३३ ख्रिस्ती धर्माच्या सत्यतेचीं प्रमाणे— मुंबई. इ. स. १८५०
३४ धर्मशास्त्रप्रसार—— मुंबई, इ. स. १८५१ (इं ऑ.)
३५ भाव कोणावर ठेवावा ( मोडी ) मुंबई, इ. स. १८५२ (इं.ऑ.)
३६ पापपीडितास शाति ( मोडी ) मुंबइ, इ. स. १८५ (इ.ऑ.)
३७ पश्वादि भूतदया ( Kindness to Animals )
मुंबई, इ. स. १८५३
३८ नवा उत्पन्न जो त्याचे निरूपण, मुंबई, इ.स. १८५३ (इं.ऑ.)
३९ ख्रिस्ती लोकाचे कर्तव्यसार——बाबा पदमनजी
मुंबई, इ. स. १८५६
४० येशूख्रिस्ताने जी प्रार्थना आपल्या शिष्यास सागितली
तिजवर टीका [ बॉ. ट्रा. बु. सो. )मुंबई, इ. स. १८५६
४१ ख्रिस्ती धर्माचा प्रसार होण्याविषयीच्या भविष्यवचनांची
पूर्णता—शेख दाऊद इ. स. १८५७
४२ देव दयाळु असतां मनुष्यांनीं कां दुःखी राहावे—
बॉ. ट्रा. बु. सो, मुबई, इ. स. १८५७

४४ मात्थीनें केलेलें शुभवर्तमान यावरील टीका—
मुंबई इ. स. १८५८

४५ प्रार्थनेचें सामर्थ्य. रे. बिसेल.
( बॉ. ट्रा. बु. इ. स. १८५९

४६ आमचीं भक्तीसबधीं पापें वाहणारा उपाध्या-बाबा पदमनजी
मुंबई इ. स. १८६२

४७ ख्रिस्ती धर्म कसा उत्पन्न झाला आणि कसा वाढला
ह्याची गोष्ट इ. स. १८६२

४८ शाब्बाथनिरूपण—बॉ. ट्रा. बु.सो. मुंबई इ. स. १८६३

४९ सुप्रभात—बॉ. ट्रा. बु. सो. मुंबई इ. स. १८६४

५० हृदयदर्पण मुंबई इ. स. १८६४ ( ब्रि. म्यु. )

५१ आकाश लोकाविषयीं संवाद—( आवृत्ति २ री )
मुंबई, इ. स. १८६६.

५२ ख्रिस्ती धर्म ईश्वरस्थापित आहे ह्याविषयीं वाद—
इ. स. १८६७.

५३ आत्मारामपंत आणि मृत्यु शिपाई—बाबा पदमनजी,
मुंबई, इ. स. १८६७.

५४ शास्त्रातील प्रकरणे ( आवृत्ति २ री ) मुंबई,
इ. स. १८६७.

५५ प्रायश्चित्ताच्या दिवसाची प्रार्थना—मुंबई, इ. स. १८६७.

५६ खऱ्या धर्माचा कसोटी— . नारायण शेषाद्रि;
इ. स. १८६८.

५७ खरा पश्चात्ताप—रे. नारायण शेषाद्रि, मुंबई,
इ. स. १८६८.(इ.ऑ.)

५८ धर्माविषयीं संवाद—रे. बोवेल, इ. स. १८७०.

५९ पाप्याचा सखा— इ. स. १८७१.

६० प्रभूच्या प्रार्थनेचा उलगडा—मुंबई, इ. स. १८७२.(इं.ऑ.)

६१ सुभक्ति उत्तेजक—रे. शेषाद्रि, मुंबई, इ. स. १८७२.(इं.ऑ.)

६२ क्रूस वाहणारा—मुंबई. इ. स. १८७२.(इं.ऑ.)

६३ ईस्टर राणीचा संक्षिप्त वृत्तांत—मुंबई, इ. स. १८७२.(इं.ऑ.)

६४ पवित्रशास्त्राचा इतिहास—रे. स्वार्ट्झ, मुंबई,
इ. स. १८७३.

६५ कॅथॉलिक धर्मासंबंधीं प्रश्नोत्तरावलि—मुंबई,
इ. स. १८७३.

६६ मादागास्कर बेटांतील ख्रिस्ती धर्माचा इतिहास—
इ. स. १८७४.

६७ परमेश्वराप्रीत्यर्थ दशमांश—अप्पाजी बापुजी,
इ. स. १८७४.(इं.ऑ.)

६८ खरा मार्ग— मुंबई, इ. स. १८७४.(इं.ऑ.)

६९ बेने इस्राइल लोकांचा इतिहास—तळेकर, डेविड हाइम,
इ. स. १८७४.(ब्रि.म्यु.)

## हिंदुधर्मावर टीका

७० भगवद्गीतेचें सार—राबर्ट निज्बिट, मुंबई, इ. स. १८३२.

.. २०

७१ पहिलें हिंदुधर्मप्रसिद्धीकरण —जॉन विल्सन, मुंबई,
इ. स. १८३२.

७२ ब्राह्मणाचें महत्व—राबर्ट निस्बिट मुंबई, इ. स. १८३३.

७३ दुसरे हिंदुधर्मप्रसिद्धीकरण—जॉन विल्सन, मुंबई,
इ. स. १८३५.

७४ मत्स्यपुराण आणि इंग्री शास्त्र—( तुलना )
इ. स. १८४५.

७५ मूर्तीचा उच्छेद—बॉ. ट्रा. बु. सो. मुंबई,
इ. स. १८५०.(ब्रि.म्यु.)

७६ पुनर्जन्मनिर्णय — मुंबई; इ. स. १८५३.(इं.ऑ.)

७७ मतपरीक्षा—( भाग २ ) बॉ. ट्रा. बु. सो. मुंबई,
इ. स. १८५६–५८.

७८ हिंदुधर्म व ख्रिस्ती धर्म यांची तुलना—बाबा पदमनजी,
( आवृत्ति २ री ) बॉ. ट्रा. बु. सो.
( प्रथमावृत्ति इ. स. १८५४ ) मुंबई, इ. स. १८६७.

७९ कृष्ण आणि ख्रीस्त याची तुलना—बाबा पदमनजी,
इ. स. १८७१.

८० सिंहस्थमाहात्म्य—रे. प्राइस, मुंबई, इ. स. १८७२(इं.ऑ.)

८१ मूर्तिपूजेविषयीं जे जे शास्त्रात लिहिलें आहे तें—मुंबई,
इ. स. १८७३.

८२ हिंदुधर्माविषयीं प्रश्न— इ. स. १८७३(इं.ऑ.)

८३ खंडोबाची गोष्ट, बॉ. ट्रा. बु. सो. मुंबई, इ. स. १८७४.

८४ तुळशीचे लग्न— मुंबई, इ. स. १८७४.(इं.ऑ.)

## हिंदुसमाजरचना व चालीरीति यांवर टीका

८५ होळीविषयीं उपदेश—बॉ. ट्रा. बु. सो. मुंबई,
इ. स. १८४७.

८६ हिंदु लोकांच्या सणाविषयीं निबंध—बाबा पदमनजी,
( बॉ. ट्रा. बु. सो. ) मुंबई, इ. स. १८५३.

८७ ज्ञातिभेदनिर्णय—बॉ. ट्रा. बु. सो. मुंबई, इ. स. १८६५.

८८ नवसाला पावणें याविषयीं विचार—रेव्ह. ए. व्हाइट,
मुंबई, इ. स. १८६८.

## बोधपर गोष्टी आणि संवाद

८९ हेन्री आणि त्याचा सांभाळणारा गडी संभू ह्याची गोष्ट—
मिसेस फारार, नाशिक, इ. स. १८३५.

९० चमत्कारिक गोष्टी—मिसेस फारार, नाशिक,
इ. स. १८३५.

९१ बालबोध गोष्टी—मिसेस फारार, नाशिक, इ. स. १८३८.(ग्रां.कॅ.)

९१ शास्त्रांतल्या गोष्टी ( आवृत्ति २ री ) बॉ. ट्रा. बु. सो.
इ. स. १८४०.

९१ यात्रिकक्रमण—हरि केशवजी, मुंबइ. इ. स. १८४१.

९१ बाबाजीची बखर—( बाबाजी रघुनाथ मराठे )
मुंबई, इ. स. १८४४.(ब्रि.म्यु.)

९२ राधानाथाची गोष्ट—मुंबई, इ. स. १८४४(ब्रि.म्यु.)

९३ काफर देशाची मुलगी इची गोष्ट—मुंबई,
इ. स. १८४५.(ब्रि.म्यु.)
९४ अविचार, पश्चात्ताप व प्रायश्चित्त याविषयीं गोष्ट—
मुंबई, इ. स. १८४५.(ब्रि.म्यु.)
९५ गरीब शेरा हिची गोष्ट—मुंबई, इ. स. १८५२.(इं.ऑ.)
९६ सालखबेरी मैदानांतील धनगर—मुंबई, इ. स. १८५२(इं.ऑ.)
९७ सिंदी चाकर माणसाची गोष्ट ( आवृत्ति २ री )
मुंबई, इ. स. १८५३ (इं.ऑ.)
९८ एक नास्तिक मनुष्य ख्रिस्ती झाला ह्याविषयींची हकीकत
मुंबई, इ. स. १८५८
९९ बाला सुदराबाई ठाकूर—रे. नारायण शेषाद्रि,
मुंबई, इ. स. १८६८ (इं.ऑ.)
१०० लहान जेन ( आवृत्ति २ री ) मुंबई, इ. स. १८६८ (इं.ऑ.)
१०१ दोन मेंढा राणीची गोष्ट— मुंबई, इ. स. १८७२ (इं.ऑ.)
१०२ देवप्रीतीची प्राचीन गोष्ट मुंबई, इ. स १८७३ (इं.ऑ.)
१०३ फुलें वेचणाऱ्या मुलीची गोष्ट— मुंबई, इ. स. १८७३ (इं.ऑ.)
१०४ रागेनवाल गांवातील लोहार इत्यादिकांच्या गोष्टी
( बॉ. ट्रा. बु. सो. ) इ. स. १८७४
१०५ राजाचा पुत्र मुंबई, इ. स. १८७४ (इं.ऑ.)

## संकीर्ण ग्रंथ

१०६ देव कसा आणि खरे भक्त कसे. ( आवृत्ति ३ री )
मुंबई, इ. स. १८३३

१०७ यात्रेकऱ्याचा वृत्तात, मिसेस फारार नाशिक इ. स. १८३८

१०८ चांगले मुलगे किंवा तुम्ही आपली परीक्षा करा.

इ. स. १८३८

१०९ संभाषणे ( ख्रिस्ती धर्मासंबधी ) मुंबई, इ. स. १८३८

११० ज्या बायकास लेकरे आहेत त्यास सुबोध.

मुंबई, इ.स. १८४१ (ब्रि.म्यु.)

१११ जरीमरीविषयी सवाद मुंबई, इ. स. १८४५ (ब्रि.म्यु.)

११२ पावसाविषयी विचार मुंबई, इ. स. १८४५ ( ब्रि.म्यु.)

११३ निरनिराळे धर्म. रे. एच. व्यालंटाइन, इ. स. १८५१

११४ मनोरंजक गोष्टी मुंबई, इ. स. १८५१ (इ.ऑ.)

११५ उरूस व यात्रेसबंधी जरीमरी मुंबई, इ. स. १८५१ (इं.ऑ.)

११६ कोकरांचा चारा ( आवृत्ति २ री ) मुंबई, इ.स. १८५३ (इं.ऑ.)

११७ सचोटीविषयी मुंबई, इ.स. १८५३ (इं.ऑ.)

११८ मुलांसाठीं बोधाच्या गोष्टी मुंबई, इ. स. १८५४

११९ सदाचरणाच्या गोष्टी (आवृत्ति६वी) मुंबई इ. स. १८५४

१२० रत्नमाला मुंबई, इ. स. १८५८ (इ.ऑ.)

१२१ बालमोतांतले शाळेचे वर्णन. मुंबई, इ. स. १८६२

१२२ गालिप्रदान मुंबई. इ. स. १८६९ (इ.ऑ. )

१२३ ईश्वरभक्तास सर्व गोष्टी कल्याणकारक होतात.

इ. स. १८६९

१२४ देव, मनुष्य आणि शास्त्र याविषयीं विचार,

इ. स. १८७०

१२५ धार्मिक व अधार्मिक यांचा भेद मुंबई इ. स. १८७०(इं.ऑ.)

१२६ माणसाचा जीव मौल्यवान आहे मुंबई इ. स. १८७०(इं.ऑ.)

१२७ गुरुजनांचे अर्थशास्त्र मुंबई इ. स. १८७०(इं.ऑ.)

१२८ मोठा विचार मुंबई इ. स. १८७२(इं.ऑ.)

१२९ उद्धारमहिमा मुंबई इ. स. १८७३(इं.ऑ.)

---

## ११ संकीर्ण वाङ्मय

स्थलवर्णन

गोविंद नारायण यांनी इ.स. १८६३ त ‘ मुंबईचे वर्णन ’, या नांवाचा माहितीपूर्ण ग्रंथ प्रसिद्ध केला. यांत भौगोलिक, सामाजिक व राजकीय दृष्टीनें मुंबई शहराचें इत्थंभूत वर्णन करण्याचा प्रयत्न केला आहे. “ मुंबईची पूर्वीची कशी स्थिति होती, व सद्यः कशी आहे, हा सर्व मजकूर जेवढा माघ्य झाला तेवढा यामध्यें केवळ प्राकृत भाषेंत लिहिला आहे. शब्दचातुर्याकडे व वाक्यसौंदर्याकडे तादृश लक्ष दिल्याशिवाय केवळ बालबोध भाषेचाच क्रम अनुलक्षून ही रचना केली आहे. ” मराठी भाषेतील वर्णनात्मक पुस्तकात हा ग्रंथ निःसशय पहिल्या प्रतीचा आहे. यांतील माहिती परिश्रमपूर्वक मिळविलेली असून लिहिण्याची शैलीहि सुबोध व मनोरजक आहे. याच धर्तीवर नारायण विष्णु जोशी यांनीं इ स. १८६८ त ‘ पुणें शहरचें वर्णन ’ लिहिलें. उपयुक्त माहितीच्या दृष्टीनें हें पुस्तकहि उत्कृष्ट वठलें आहे. याशिवाय ज्ञानप्रसारक मासिकांतहि अनेक स्थलवर्णनपर लेख प्रसिद्ध झाले होते. ‘ मुंबईचें वर्णन ’ या ग्रंथांतील एक उतारा येथें सादर करितों:---

“ माहीम हे लहानसें गांव मुंबईच्या वायव्येस किल्ल्यापासून सुमारें तीन कोशाच्या अंतरावर आहे. एथें जिकडे तिकडे माड

आहेत. बाजारात मात्र थोडीशी दाट वस्ती आहे, तीही पाचकळसी, वाडवळ, सुतार, भंडारी, कांसार, सोनार, कोळी, मुसलमान, किरिस्तांव यांची आहे. एथे नारळाचें उत्पन्न फार व एथील नारळ उत्तम प्रकारचे असून ते महाग खपतात. एथील वाडवळ लोक राहातात तेच माडांची व इतर झाडांची देखरेख करितात. एथें पोर्टुगीज लोकांची एक दोन देउळें व पाठशाळा आहेत. हिंदू लोकांची दोन चार देवळे व मुसलमान लोकांची एक मोठी मशीद आहे. मुकदम बाबा नांवाच्या एका पिराची त्यांत कबर आहे. ह्या मुकदम साहेबाचा मार्गशीर्षच्या सुमारास मोठा उरूस भरतो. तो पाचसहा दिवसपर्यंत असतो तेथे शेकडो व्यापारी लोकांची दुकाने पडतात. ही एक मुंबईंतील प्रख्यात जत्राच आहे. सर्व प्रतीचे लोक ह्या ठिकाणी जातात. हिंदू लोक तर सर्वांपुढे जाऊन याची पूजा करावयास सिद्ध असतात. शेवटास मांडवी आहे. त्याच्या शेजारीं आगीच्या गार्डाचे ठाणे आहे. एथे वांद्ऱ्याचा पूल सुरू होतो. वांद्ऱ्याचा पूल सर जमशेटजी जिजीभाई यानी १,५५००० रुपये खर्च करून लोककल्याणार्थ सन १८४३ त बांधिला व २२००० रुपये खर्च करून त्याच्या पत्नीनें तेथील मोठा रस्ता बांधिला. माहिमाची हद्द संपते तेथे मोठा दरवाजा आहे. माहिमास भंडारी लोकांची वस्ती फार आहे. ते लोक माडापासून सूर काढितात. व त्याची दारू व गूळ तयार करितात. माहिमास किल्ला आहे तो लहान असून साधारण आहे. एथें बंदर आहे त्यात बहुदा मासळी उतरते. हा पदार्थ एथे उत्तम प्रकारचा सापडतो असे सांगतात"†

---

† मुंबईचें वर्णन पृ. ७१–७२.

**प्रवासवर्णन**

शामराव मोरोजी यानीं इ. स. १८५२ त अनेक ग्रंथ, यात्रेकरू व देशाटन करणारे लोक यांच्या साह्याने 'काशिप्रकाश म्हणजे महायात्रावर्णन' हे पुस्तक लिहिले. यातील माहिती साधारण बरी आहे. पण भाषा मात्र अशुद्ध आहे. मराठी भाषेतील हे पहिलेंच प्रवासवर्णन होय. यानतर दाजीसाहेब किब्रे यांनी महाराष्ट्र व गुजराथ या प्रांतांतील आपल्या दौऱ्याचे वर्णन 'प्रसिद्ध स्थळें (भाग २) या नावाने लिहून छापिले. जगन्नाथ विठोबा क्षत्री यानी 'गोकर्णमहाबलेश्वराचे यात्रेप्रकरणी वृत्तात,' (इ. स. १८६३ त) प्रश्नोत्तररूपानें प्रसिद्ध केला. इ. स. १८६७ त भास्कर हरी भागवत यानी करसनदास मुलजी याच्या मूळ गुजराथी ग्रंथावरून 'इंग्लंडांतील प्रवास' हें पुस्तक मराठींत लिहिले. शामराव मोरोजी यांच्या 'काशिप्रकाश' या ग्रंथांतील एक उतारा खाली सादर करितो.

> "हे शहर प्राचीन मथुर्व देशी श्रीउग्रसेन रायाचे आहे धर्मा अरण्यांत ते मुंबईहून ३९० कोसांवर उत्तर दिशेस आहे तेथे एक तारामंडळ यमुनेतीरीं पाहाण्याची माडि किंवा इमारत माहाराज जयशिंग राजे जयनगरचे त्याणी केली आहे माहाराज विरशिंग राजे याणी छत्तीस लक्ष रुपये लावून श्रीकृष्णजीचो देवालयें किंवा मंदिरे बाधिली आहेत तेणेकरून ही एक कृष्णपुरी झाली आहे आणि निरंतर किंवा अहर्निश भक्तजन आळऊन, आळऊन मुखाने गातात व कृष्ण नामोच्चारण करितात सकल मथुरेत व ब्रीज चौऱ्याशित सर्व साधुसंत इत्यादि चारीवर्ण मानव आबालवृद्ध आणि स्त्रियासहित त्याचे कारण की, श्रीकृष्ण ध्यावा पाहावा किंवा मनी ठसावा असा इतर तीर्थ स्थानी अति उत्कृष्ट कृष्ण नामोत्साह नाहीं म्हणोन मथुरेस मोक्षपुरी म्हणतात." †

† काशिप्रकाश पृ. ५८.

भूगोल

बाळशास्त्री जाभेकर यांनी इ. स. १८३६ त शाळेतील विद्यार्थ्यांकरिता 'भूगोलविद्या' या नांवाचें लहानसें पुस्तक प्रसिद्ध केले. त्यानंतर महादेवशास्त्री पुराणिक यांनी इ. स. १८५४ त सलेवन [ Sullivan ] साहेबाच्या इंग्रजी ग्रंथावरून भूगोल विद्येची आणि खगोल विद्येची मूलतत्वं 'भूगोलखगोल' या पुस्तकांत ग्रथित केली. मेजर क्यांडी यांनीं 'हिंदुस्थानाचें वर्णन' [ भाग २ ] हीं पुस्तकें लिहिलीं. याशिवाय महाराष्ट्रांतील पुणें, नाशिक, सातारा, सोलापूर इत्यादि निरनिराळ्या जिल्ह्यांचेहि भूगोल प्रसिद्ध झाले. महादेवशास्त्री पुराणिक याच्या 'भूगोलखगोल' या ग्रंथांतील एक उतारा खालीं उद्धृत करितों.

"समुद्र, सरोवरें, नद्या आणि पृथ्वीवरचे ओलसर प्रदेश ह्यांपासून सूर्य व हवा ह्यांच्या योगानें पाण्याची वाफ होऊन वर जाते, त्या क्रियेस बाष्पभवन म्हणतात. पृथ्वीजवळच्या हवेपेक्षां वाफ हलकी असते, ह्यामुळे ती वर जाऊन जेथे तिच्या इतक्या वजनाची हवा असते तेथे ती राहाते. जोपर्यंत ती हवेत मिसळलेली असते, तोपर्यंत पाण्यांत विरलेल्या मिठाप्रमाणे ती अदृश्य असते.पण आंत न राहील इतकी वाफ हवेत मिसळली, तर, किंवा उष्णता कमी होऊन हवेच्या ठायीं वाफ वितळण्याची शक्ति कमी झाली, तर, वाफ घन होऊन आकाशांत मेघरूपानें दिसते, किंवा पर्जन्य, गारा आणि बर्फ ह्यांतून एखाद्याच्या रूपाने जमिनीवर पडतांना ती दिसते." *

---

* भूगोलखगोल पृ. १४०.

**दळणवळणाचीं साधनें**

एकोणिसाव्या शतकाच्या आरंभीं भौतिक शास्त्रांच्या वाढीबरोबर दळणवळणाची नवीन नवीन साधनें उपलब्ध होऊं लागली होती. महाराष्ट्रांतील सामान्य जनांना त्याची माहिती व्हावी म्हणून त्यासंबंधीं या काळांत चारपाच पुस्तकें प्रसिद्ध झालीं. कृष्णशास्त्री भाटवडेकर यांनीं ' लोखंडी रस्त्याचें संक्षिप्त वर्णन ' व 'वर्तमान वाहक विद्युद्यंत्र' हे ग्रंथ लिहिले. त्यानंतर ' लोखंडी सडकांचे चमत्कार ' व 'नौकानयनाचा इतिहास' हीं दोन पुस्तकें प्रसिद्ध झालीं. विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनीं 'शालापत्रक' मासिकांत नौकानयनाच्या इतिहासावर मार्मिक परीक्षण लिहिलें होतें.

**पाठमाला**

माधवराव मोरोजी आणि नाना मोरोबा यांनीं इ. स. १८४८ त ' विद्योपक्रमाचा ग्रंथ ' प्रसिद्ध केला. मराठी भाषेत ' योग्य पुस्तकांची ' उणीव आहे म्हणून हा पाठसंग्रह आपण प्रकाशित केला असें या ग्रंथाच्या प्रस्तावनेंत प्रकाशकांनीं नमूद केलें आहे इ. स. १८५० त मेजर क्यांडी यांनीं " इंग्रेजी पुस्तकांतील किती एक गोष्टींचे मराठी भाषांतर करून " 'वाचन पाठमाला' या नांवाचें पुस्तक रचिलें. याशिवाय ' ज्ञानबोधक, ' ' कथितपाठमाळा, ' ' मधुमक्षिका, ' ' गद्यरत्नावलि ' इत्यादि पुस्तकें या काळीं प्रसिद्ध झालीं. मेजर क्यांडी याच्या ' पाठमाला ' या पुस्तकांतील एक उतारा खालीं देत आहे.

> " तुमच्या मातापितरांच्या आज्ञा ईश्वराच्या आज्ञाशीं विरुद्ध नसल्यास त्या कानीं पडतांच, अलंघ्य अशा समजून, अनन्य भावानें तुम्हीं मानाव्या. जे आईबाप तुम्हांपेक्षां फार केलेले पाहिलेले आहेत, त्याहून आपण शहाणे असा अभिमान

> बाळगूं नका. आणि जर करतां ईश्वरकृपेनें तुम्हांस त्यांच्यापेक्षा विद्या अधिक झाली, किंवा संपत्ति अधिक मिळाली, तर तुम्ही त्यांची हेळणा करूं नका. त्यांशीं तुमची वागणूक नेहमीं मर्यादेची असावी; आणि विशेषकरून उलट जाब न जाण्याविषयीं व दुर्मुख न होण्याविषयीं, तुम्हीं फार जपत जावें. जर कधीं ते तुमच्या छंदास आड आले, तर तुम्हांवर जी जी त्यांची प्रीति आहे तिजवांचून दुसरें कांही कारण नाहीं, असें समजावें. त्यांनीं जे जे श्रम तुम्हांसाठीं केले आहेत, व जी जी दुःखें तुम्हासाठीं भोगिलीं आहेत, त्यांचें स्मरण ठेऊन तुम्ही त्यांच्या आज्ञाभंगापासून दूर राहावें; आणि तुम्हांकरितां ज्यांनीं पूर्वीं दुःख सोशिलें, अशा त्यांच्या मायाळू अंतःकरणास फिरून तुम्ही दुःख न द्यावें. मुलांनी आईबापांवर ममता केलीं, ह्याचीं उदाहरणें पुढें लिहिलीं आहेत, तीं पाहून त्या मुलांनीं चांगलें केलें असें मानून त्यांचा कित्ता घ्यावा. " *

**संस्कृत काव्यांचीं भाषांतरें**

संस्कृत भाषेतील दोनतीन काव्यांचीं गद्यात्मक भाषांतरें या काळीं प्रसिद्ध झालीं. इ.स. १८५३ त जयदेवकृत गीतगोविंदाची प्राकृत टीका लिहिली गेली. इ.स. १८६२ सालीं पांडुरंग विठ्ठल रानडे यांनीं भर्तृहरीचें 'शृंगारशतक' मराठी भाषांतरासह छापिलें. त्यानंतर बाळाजी नारायण फडके यानी इ. स. १८७३ त 'नैषध चरित्राचें' मराठींत भाषांतर केलें.

---

* वाचनपाठमाला [ पाठ ३७ ] पृ. १६६–६७.

**विशिष्ट ज्ञातिविषयक ग्रंथ**

विशिष्ट ज्ञातिसंबंधी लिहिलेली सातआठ पुस्तकें इ. स. १८७४ पूर्वी प्रसिद्ध झालीं. शामराव मोरोजी यांनीं पाठारे प्रभु ज्ञातिच्या संबंधानें 'पत्तनप्रभुलेखमणी' आणि 'श्रीमत् सभाविजय' हीं पुस्तकें लिहिलीं. भवानी विश्वनाथ कानविंदे यांनीं "सारस्वत ब्राह्मण उर्फ शेणवी किंवा कोकणे ब्राह्मण याविषयीं आक्षेपकांचें यथार्थ खंडन" हें पुस्तक लिहिलें. याशिवाय 'गोत्रमालिका', 'कऱ्हाडा ब्राह्मणाचे प्रवर', 'दशप्रकरण', 'चित्पावनविनोद' इत्यादि विशिष्ट ज्ञातिविषयक पुस्तकें याकाळीं लिहिलीं गेलीं.

**यशोदापांडुरंगी-केकादर्श**

दादोबा पांडुरंग यांनीं इ. स. १८६५ त मोरोपंताच्या 'केकावलीवर' 'यशोदापांडुरंगी' या नांवाची 'विस्तीर्ण' टीका लिहिली. तिच्या प्रस्तावनेत त्यांनीं परशुरामतात्याचा गौरवपूर्ण उल्लेख केला आहे. दादोबाच्या हा ग्रंथ पाल्हाळिक असून त्यांतील भाषाहि कांहीशी क्लिष्ट आहे. इ. स. १८६७ त परशुरामपंत गोडबोले यांनीं आपला 'केकादर्श' प्रसिद्ध केला. 'यशोदापांडुरंगी' च्या प्रस्तावनेंतील एक उतारा खाली उद्धृत करितो.

> "कालीदास, भवभूति, माघ आणि श्रीहर्ष यांचीं अनुक्रमें रघुवंशकिरातादि जीं प्रसिद्ध महाकाव्यें आहेत, त्यांमध्यें शब्दांच्या काठिन्यावरून आणि अर्थान्वयाच्या गूढत्वावरून श्रीहर्षाचें जें शेवटलें नैषधकाव्य, त्याचें दुर्बोधत्व बहुधा लोकानुभूत आहे; तसेंच ज्यांस संस्कृत भाषा अवगत नाहीं, अशा प्राकृत जनांस मोरोपंताच्या काव्यात संस्कृत शब्दांचा भरणा पुष्कळ असल्यानें सहाजिक त्या शब्दांच्या अपरिचयामुळें आणि प्राकृत जनांस अप्रसिद्ध असे संस्कृत शब्द आणि निव्वळ प्राकृत व ग्राम्य शब्द,

याचे मिश्रण असल्याने संस्कृत भाषाभिज्ञ अशा पंडितांसहि त्यांची निवड करून अर्थयोजना करण्यांत अवघड प्रसंग असण्याच्या दृढ संभवामुळें, तसेच समयविशेषीं शब्दांचा दूरान्वय असल्यानें अर्थज्ञानाच्या दुःसाध्यत्वामुळें, मोरोपंतांचे काव्यहि दुर्बोध आणि कठिण म्हणूनच बहुधा सर्व जनास अनुभूत आहे''†

याशिवाय 'पल्लीपतनकारिका,' 'वृंदसतसयी,' 'संसारचोपडी,' 'स्वप्नाध्याय', 'अग्निक्रीडा' इत्यादि पुस्तकें या काळीं प्रसिद्ध झालीं.

---

† यशोदापांडुरंगी–प्रस्तावना पृ. ९

# परिशिष्ट

## स्थलवर्णन

१ मुंबईचें वर्णन—गोविंद नारायण, मुंबई, इ. स. १८६३

२ पुणें शहरचे वर्णन—नारायण विष्णु जोशी,
मुंबई, इ. स. १८६८

## प्रवासवर्णन

१ काशिप्रकाश—शामराव मोरोजी, मुंबई, इ. स. १८५२

२ प्रसिद्ध स्थळें—[ भाग २ ] दाजीसाहेब किबे,
पुणे, इ. स. १८६१–६४ [ग्रा.कॅ.]

३ गोकर्ण महाबळेश्वराचे यात्रेप्रकरणीं वृत्तांत—जगन्नाथ विठोबा क्षत्री
मुंबई, इ. स. १८६३

४ इंग्लंडातील प्रवास—[ गुजराथीवरून भाषांतर ]
भास्कर हरि भागवत मुंबई, इ. स. १८६७

५ राणीचे पुस्तक [ हायलंडमधील आमचा दिनक्रम ]
गणपतराव मोरोबा पितळे, मुंबई, इ. स. १८७१

६ काशीयात्रा —हरी गणेश पटवर्धन, पुणें, इ. स. १८७२

## भूगोल

१ भूगोलविद्या—बाळशास्त्री जांभेकर, मुंबई, इ. स. १८३६

२ Marathi Atlas दादोबा पांडुरंग, नाना नारायण
मुंबई, इ. स. १८३९ [इं.ऑ.]

३ भूगोलखगोल—महादेवशास्त्री पुराणिक,
मुंबई, इ. स. १८५४

४ रत्नागिरी जिल्ह्याचा नकाशा—शिवराम भास्कर काणे,
रत्नागिरी, इ. स. १८५७, [ग्रां.कॅ.]

५ हिंदुस्थानाचें वर्णन—मेजर क्यांडी, मुंबई, इ.स. १८६०

६ आशियाखंडाचें वर्णन—मेजर क्याडी मुंबई, इ. स. १८६२

७ भूगोलाचें वर्णन [ भाग २ ] मेजर क्यांडी
मुंबई, इ. स. १८६३–६५

८ संक्षिप्त भूगोलवर्णन—परशुरामपंत गोडबोले,
मुंबई, इ. स. १८६५ [ग्रां.कॅ.]

९ हिंदुस्थानचा भूगोल—बापू पुरुषोत्तम जोशी, टोकेकर,
मुंबई, इ. स. १८६७ [ब्रि. म्यु.]

१० भूगोलविद्या—नारो अपाजी गोडबोले,
पुणें, इ. स. १८६८ [इं.ऑ.]

११ मुंबई इलाख्याचे वर्णन—मग्वाराम बापूशेट दाडेकर,
ठाणें, इ.स. १८६९ (इं.ऑ.)

१२ संक्षिप्त भूगोल—खगोलविद्या वासुदेव रामचंद्र मोहनी
पुणें, इ. स. १८७० (इं.ऑ.)

१३ धारवाड जिल्ह्याचे वर्णन--लक्ष्मण बळवत सोमण,
पुणे, इ. स. १८७१ (इं.ऑ.)

१४ खानदेश जिल्ह्याचे वर्णन--गो. अ. थत्ते,
गो. प्र. पंडित, पुणें, इ. स. १८७१ (इं.ऑ.)

१५ मध्यप्रदेशाचे वर्णन--हरी गोपाळ पाध्ये नागपूर,
इ. स. १८७१ (इं.ऑ.)

१६ पुणे जिल्ह्याचा भूगोल--राघो काशिनाथ लेले
पुणे, इ. स. १८७१ ( इं.ऑ.)

१७ ठाणे व कुलाबा जिल्ह्याचे वर्णन--सखाराम बापूशेट
दांडेकर, ठाणें, इ. स. १८७१ (इं.ऑ.)

१८ सातारा जिल्ह्याचें वर्णन--बळवंत हरी जोशी,
बोरगांवकर सातारा, इ. स. १८७१ (इं.ऑ.)

१९ रत्नागिरी जिल्ह्याचे वर्णन--शिवराम भास्कर काणे,
रत्नागिरी, इ. स. १८७२ (इं.ऑ.)

२० रत्नागिरी जिल्ह्याचा भूगोल--रा. मि. जोशी.
वि. दि. वैद्य, रत्नागिरी,इ. स.१८७२ (इं.ऑ.)

२१ सोलापूर जिल्ह्याचे वर्णन--गणेश बळवत लिमये,
सोलापूर, इ. स. १८७२ ( इं.ऑ.)

२२ खानदेश जिल्ह्याचा भूगोल--गोविंद हरी थत्ते
इ. स. १८७२ (इं.ऑ.)

२३ हिंदुस्थानवर्णनसार--भास्कर बल्लाळ आपटे,
पुणे, इ. स. १८७२ (इं.ऑ.)

२४ अहमदनगर जिल्ह्याचें वर्णन--विष्णु वासुदेव साठये,
गोविंद महादेव पुंडलीक अहमदनगर, इ.स. १८७३ [ इं.ऑ.]

२५ वऱ्हाडप्रांताची भूगोलविद्या—चिमणाजी राजाराम
पाठक, मुंबई इ. स. १८७३ (इं.ऑ.)

२६ भूगोलविद्या—भिकाजी धोंडदेव निगुडकर,
पुणे, इ.स. १८७४ (इं.ऑ.)

२७ नाशिक जिल्ह्याचें साक्षस वर्णन—विष्णु रामचंद्र देवधर
पुणे, इ. स. १८७४ (इं.ऑ.)

२८ प्रश्नोत्तररूप भूगोलविद्या—जनार्दन महादेव गुर्जर,
मुंबई, इ. स. १८७४ (इं.ऑ.)

## दळणवळणाचीं साधनें

१ लोखंडी रस्त्याचें संक्षिप्त वर्णन—कृष्णशास्त्री
भाटवडेकर, मुंबई इ. स. १८५४

२ लोखंडी सडकाचे चमत्कार—गोविंद नारायण,
मुंबई, इ. स. १८५८

३ वर्तमानवाहक विद्युद्यंत्र याचे संक्षिप्त वर्णन,
कृष्णशास्त्री भाटवडेकर, मुंबई, इ.स. १८५९

४ नौकानयनाचा इतिहास—गोविंद शंकरशास्त्री बापट,
मुंबई, इ. स. १८७२

## पाठमाला

१ विद्योपक्रमाचा ग्रंथ—माधवराव मोरोजी, नाना मोरोबा,
मुंबई, इ. स. १८४८

२ वाचनपाठमाला—मेजर क्यांडी, पुणें, इ. १८५०

३ ज्ञानबोधक-( पुस्तक २ रें ) मुबई, इ. स. १८५२.
४ कथितपाठमाळा-नारायणभाई दांडेकर, मुबई, इ. स. १८६०.
५ बालोपयोगी सर्वसंग्रह-विनायक कोंडदेव ओक, सातारा, इ. स. १८६१.(ग्रां.कॅ.)
६ वाचनमाला-नारायणभाई दांडेकर, पुणें, इ. स. १८६७.(इ.ऑ.)
७ स्त्रीकंठभूषण-बाबा पदमनजी, इ. स. १८६८.
८ मधुमक्षिका-विनायक कोंडदेव ओक, मुबई, इ. स. १८७१.
९ गद्यरत्नावलि-विनायक कोंडदेव ओक, इ. स. १८७३.

## संस्कृत काव्यांचीं भाषांतरें

१ गीतगोविंद-( प्राकृत टीकेसहित ) मुबई, इ. स. १८५३.
२ शृंगारशतक-पांडुरंग विठ्ठल रानडे, पुणे, इ. स. १८६२.
३ नैषधचरित्र-रामचंद्रशास्त्री तळेकर, पुणें, इ. स. १८६९.(इ.ऑ.)
४ नैषधचरित्र-बाळाजी नारायण फडके, पुणे, इ. स. १८७२.(इ.ऑ.)

## केकावलीवर टीका

१ यशोदापांडुरंगी-दादोबा पांडुरंग, मुंबई, इ. स. १८६५
२ केकादर्श-परशुराम गोडबोले इ. स. १८६७ ( म. वा. )

## विशिष्ट ज्ञातिविषयक ग्रंथ

१ पत्तनप्रभुलेखमणि-शामराव मोरोजी, मुबई, इ. स. १८६२.

२ पेशव्यांचा कावा—सुंदरराव रावजी, मुंबई, इ. स. १८६३.
३ श्रीमत्सभाविजय—शामराव मोरोजी, मुंबई, इ. स. १८६६.
४ गोत्रमालिका—वामन कृष्ण जोशी गद्रे, सदाशिव बजाबाशास्त्री, अमरापूरकर, पुणे, इ. स. १८६८.(इं.ऑ.)
५ कऱ्हाडा ब्राह्मणाचे प्रवर—रत्नागिरी, इ. स.१८६८.(इं.ऑ.)
६ सारस्वत ब्राह्मण ( आक्षेपकाचे यथार्थखंडन ) भवानी विश्वनाथ कानविंदे आणि इतर, मुंबई, इ. स. १८७०.
७ समस्त कोंकणस्थ नामदेव शिंपी जातीस पत्र—जगन्नाथ अतोबा निगुडे, मुंबई इ. स. १८७१.
८ गोत्रावलि—आबा जोशी मोघे वसईकर, मुंबई, इ. स. १८७२.( इं.ऑ.)
९ दशप्रकरण—लक्ष्मण नारायण केणीशास्त्री, इ. स. १८७२.
१० मुखमासीत ब्राह्मणमाहात्म्य—नारायण केशव वैद्य, मुंबई. इ. स. १८७३
११ चित्पावनविनोद—ल. ना. केणीकोटकर, इ. स. १८७३.
१२ देवरुख्यांविषयीं विचार—विष्णुशास्त्री पंडित, मुंबई, इ. स. १८७४.(इं.ऑ.)

## खेळ

१ चेंडुफळी—अनंतसुत, पुणे, इ. स. १८५८.(ग्रा.कॅ.)
२ बालखेळ— इ. स. १८५९.(म.वा.)
२ मुलींचाखेळ—पुणे, इ. स. १८६२.(ग्रां.कॅ.)

४ मुलासाठी कसरत—नारायण विश्णु जोशी पुणे.
इ. स. १८७१.( इ.ऑ.)

## बैठे खेळ

१ बुद्धिबळे खेळणारांचा मित्र—हरिश्चंद्रचंद्रोबा जोशी
मुंबई. इ. स. १८५८

२ बुधबळाचा ग्रथ—सिताराम रावजी जुन्नरकर. इ. स. १८५४.

३ कालकरमणूक—अष्टमकर, मुबई. इ. स. १८७३.( इ.ऑ.)

## जादू

१ जादूचा तमाशा—परशुराम रघुनाथ फडके
सातारा. इ. स. १८७१. (इ.ऑ.)

२ जादुप्रकाशज्ञान—आत्माराम विनायक पाटकर
पुणे. इ. स. १८७१. (इ.ऑ.)

## गृहव्यवस्था

१ संसारचोपडी—( गुजराथीवरून ) पुणे, इ. स. १८४७.(इ.ऑ.)

२ बैठक चावडी—काशिनाथपंत काळे. मुंबई, इ. स. १८५६. (ग्रां.कॅ.)

३ घरचें आयव्यय कोष्टक—जनार्दन हरी आठल्ये,
रत्नागिरी, इ. स. १८६३.(ग्रां.कॅ.)

४ जमाखर्चाची माहिती—कृष्णाजी प्रभाकर काळे,
रत्नागिरी, इ. स. १८७४.(इ.ऑ.)

## इतर ग्रंथ

१ पल्लीपतनकारिका— मुबई, इ. स. १८४४.(ब्रि.म्यु.)

२ वृंदसतसयी—केशव बाजी परचुरे मुबई, इ. स. १८४५(ग्रां.कॅ.)
३ स्वप्नचिंतामणी—गोपाळ दीक्षित सातारकर, इ. स. १८४८
४ स्वप्नाध्याय—रामचद्र सदाशिव जोशी, पुणे, इ. स. १८४९(ग्रा.कॅ.)
५ पुष्पवन—'यंत्रज्ञान' वगैरेचा कर्ता—पुणें, इ. स. १८५१
६ बॉम्बे असोसिएशन सभेचे हकीगतीचें पुस्तक—
मुबई, इ. स. १८५२ (ग्रा.कॅ.)
७ बॉम्बे असोसिएशनची पहिली अर्जी— इ. स. १८५२
८ बॉम्बे असोसिएशनची दुसरी अर्जी— इ. स. १८५३
९ पाडवट्टी—( Table of wages ) इ. स. १८५७(ब्रि.म्यु.)
१० कितानावरील लोकरी कशिदा पाडण्याची रीति—
( Canvas embroidery ) काशिनाथ गगाधर क्षत्री,
मुबई, इ. स. १८५९
११ सूपशास्त्र—रामचद्र सखाराम गुप्ते, इ. स. १८६७(ब्रि.म्यु.)
१२ अग्निक्रीडा—गणेश बाबाजी माटे, पुणें, इ. स. १८७१(इ.ऑ.)

———·———

# १२ नियतकालिकें

## १

## मासिकें

**मराठी भाषेंतील पहिलें मासिक ‘ दिग्दर्शन ’ ( इ. स १८३७ )**

एकोणिसाव्या शतकाच्या पूर्वार्धांत महाराष्ट्राच्या सर्वांगीण उन्नतीसाठीं ज्या कांही थोर पुरुषांनी आपले शक्तिसर्वस्व वेचलें, त्यांत बाळशास्त्री हे अग्रगण्य होत. या काळातील प्रत्येक सामाजिक, धार्मिक किंवा शैक्षणिक उपक्रमाशीं त्यांचा थोडाबहुत संबंध आल्यावांचून राहिला नाहीं. बाळशास्त्री यानी इ. स. १८३७ त ‘ दिग्दर्शन ’ या नांवाचे मराठी भाषेंतील पहिले मासिक सुरू केलें. “ या पुस्तकांत बातमींचे सार व भूगोल, इतिहास, पदार्थविज्ञान, रसायनशास्त्र व साधारणविद्या यांविषयीं थोडथोडा मजकूर दुसऱ्या ग्रंथातून घेतलेला किंवा नवा लिहिलेला छापला ” जाई; आणि “ प्रसंगोपात्त समजूत पडण्याकरितां ” चित्रेहि देण्यांत येत. यांत ‘ हिंदुस्थानचा इतिहास, ’ ‘ ग्रीस देशाचा इतिहास, ’ ‘ ग्रेटब्रिटन देशाची राज्यरीति, ’ ‘ सिद्धपदार्थविज्ञान, ’ ‘ ज्योतिःशास्त्र, ’ ‘सामान्य नीति’ इत्यादि अनेक उपयुक्त विषयांवर लेख आले होते. या मासिकाच्या तिसऱ्या पुस्तकांतील एक उतारा खालीं उद्धृत करितों.

"आता परमेश्वराचे सर्वव्यापकतेचा विचार केला असतां असें दिसते की परमात्मा सर्वातर्यामी होत्साता या सर्व जगताला प्रेरणा व साहाय्य करतो. तो सर्व सृष्टींत जळीं, स्थळीं, काष्ठीं, पाषाणीं भरलेला आहे. या सृष्टींत असा एकही पदार्थ नाहीं कीं ज्यांत त्याची वस्ती नाही, व दूर, जवळ, लहान, मोठा, या कारणाही त्याचे व्याप्तीस कांही हरकत आहे, असा अर्थ नाही. परमात्मा प्रति व्यक्तीमध्यें आहे, मग ती व्यक्ति पार्थिव असो, आणि तो परमात्मा स्वतापाशीं जेवढा सन्निध आहे, तेवढाच तो प्रतिव्यक्तीशी सन्निध आहे. एके स्थानापासून दुसऱ्ये स्थानी जाणे, व या सृष्टातील स्वनिर्मित पदार्थापासून व या अनंत ब्रह्मांडातील अमुक ठिकाणा-पासून निघून जाणे हे जर परमेश्वराच्या ठायी असले तर हा त्याजमध्ये अपूर्णपणा आहे, असे होईल. साराश एके प्राचीन विद्वानानें परमात्म्याचे स्वरूप वर्णिलें आहे, ते फार बरोबर आहे. तें असें की परमेश्वर अशी व्यक्ति आहे, की जिचा मध्यबिंदु सर्वत्र आहे, परंतु जिचा परिधि कोठेही नाही.

दुसरी गोष्टः— जसा परमेश्वर सर्वव्यापक, तसा तो सर्वज्ञही आहे. त्याचे सर्वव्यापकतेमुळे अर्थातच त्याचाठायी सर्वज्ञता येती. ज्यापेक्षां या सर्व ब्रह्मांडात त्याची व्याप्ति आहे, त्यापेक्षा तेथें जे जे प्रकार होत जातील, ते सर्व त्याचे समजण्यात आल्यावांचून राहावयाचे नाहीत. तसेच ज्ञानमय जगत् म्हणजे अंतःकरणे यांत जे जे विचार उत्पन्न होतील, तेही त्यास कळतील, कारण सर्वांच अंतर्यामी त्याची वस्ती आहेच. देहापासून आत्म्याला जर निराळे केले, आणि तो आत्मा लिंगदेह धरून मनोवेगेंकरून डोळयाचे पात लवे न लवे इतके काळांत या सृष्टीची मर्यादा उल्लंघन करून गेला, व तेवढ्येंच चापल्यतेकरून कोट्यावधि वर्षे अव्याहत त्याणे पर्यटन केलें, तथापि तो आत्मा, परमेश्वराचे भुजांतर्गत, व त्याचे

अनंत ब्रह्मांडाइी वेष्टित आहे, असें आपणास पाहाल. या प्रकारें सर्व शक्तिमान् परमात्म्याची सर्व व्यापकता आणि सर्वज्ञता यांचा विचार केला असतां सर्व दुःखकारक कल्पना विलयाप्रत जातात. ज्या वस्तुस स्थिति आहे, त्याजवर परमेश्वराचें लक्ष असतें, व त्यांत विशेषेकरून जे प्राणी आपण परमेश्वराचे लक्षात नसू म्हणून भय मानितात, त्यांजवर त्याचें लक्ष असतेंच असते त्याचें सर्व विचार, व विशेषेंवरून त्यास वरीलप्रमाणे जी काळजी लागती, तिचा परमेश्वर मनोमय साक्षी असतो, कारण स्वनिर्मित प्राण्यांतून कोणी त्याचे लक्षात नसावा, हे जसे केवळ अशक्य आहे, तसे परमेश्वराचें आपणावर लक्ष असावें, अशी जे काळजी वाहातात, व निष्कपटपणे परमेश्वरास शरण जाऊन त्याणें आपणावर लक्ष द्यावें, असें आपण योग्य नाहीं असें जे मानितात त्याजवर परमेश्वर कृपादृष्टी करील, अशी आपण पूर्ण खात्री बाळगावी." †

**उपदेशचंद्रिका**
**( इ. स. १८४४ )**

इ. स. १८४२ पासून खिस्ती धर्माचा प्रसार करण्यासाठीं 'ज्ञानोदय' पत्र निघूं लागलें. त्यामध्यें वारंवार हिंदुधर्मावरील टीकात्मक लेख प्रसिद्ध होत असत. मिशनरी लोकांच्या या हिंदुधर्मविरोधी प्रचाराचें खंडन करण्यासाठीं मोरभट दांडेकर यांनीं इ. स. १८४४त 'उपदेशचंद्रिका' या नांवाचें मासिक सुरू केलें. यापूर्वींच त्यांनीं 'हिंदुधर्मस्थापन' या पुस्तकांत जॉन विल्सन साहेबाच्या आक्षेपांना उत्तर दिलें होतें. हिंदु लोकांस आपल्या पवित्र धर्माचें यथार्थ ज्ञान व्हावें व त्यांनीं मिशनरी लोकांच्या जाळ्यांत सांपडूं नये म्हणून मोरभट यांनीं हें मासिक काढिलें. यात पाद्रीलोकांचीं पत्रें छापलीं जाणार नाहींत असें पहिल्या अंकांतच जाहीर केलें होतें.

---

† दिग्दर्शन ( पु. ३ अं. ८ ) पृ. २३६–३८

श्रीपत शेषाद्रि यांच्या शुद्धिकरणाचा सर्व पत्रव्यवहार या मासिकांत प्रसिद्ध झाला होता. या मासिकाच्या पहिल्या अंकातील प्रस्तावनेमधील एक उतारा खाली देत आहे.

" माझे देशचे लोक हो—काहीं महिन्यावर मी तुम्हास वचन दिले होते की आपला पवित्र हिंदुधर्म याचे संरक्षण होण्याकरिता मी दरमाहा एक लहानसे पुस्तक काढणार आहे. तें वचन पार पाडण्याची मी योजना आता केली आहे. परंतु या ग्रंथाचा उद्देश, व त्यात कोणकोणते विषय येत जातील व हे पुस्तक काढण्यास मी कोणत्ये कारणामुळे प्रवृत्त जाहालों याचें संक्षेपतः तुम्हास प्रथमारंभीं निवेदन करणे अवश्य आहे, हें जाणून तें मी खाली लिहितों.

हिंदु लोकहो तुम्हास माहितच आहे की या देशांत पाद्रींचा संचार होऊं लागल्यापासून आपले पवित्र धर्मास धक्का येत चालला आहे त्याहीं जागोजाग शाळा घालून व खिस्ती धर्माची पुस्तकें फुकट लोकांस वाटून या लोकास बाटविण्याचा महत् प्रयत्न चालविला आहे, व आपले लोकांस आपले धर्माचें ज्ञान नसते याजमुळे कित्येकांस हिंदुधर्माचा कंटाळा येऊन खिस्तीधर्म खरासा वाटूं लागला आहे. तेव्हा हे लोकहो हा अनर्थ फार विस्तृत होण्याचें पूर्वी तत्प्रतिबंधार्थ काहीं तरी तजवीज या प्रसंगीं योजणे अवश्य आहे की नाहीं ? माझे मते दरमाहां एक पुस्तक काढून त्यांत हिंदुधर्माची लोकांस माहितगारी होई, व खिस्ती लोक आपले धर्मावर दोष देतात, त्याचे खंडन होई असें करावें ही चांगली युक्ति आहे व पाद्री लोक दबले तर अशानें दबतील, यास हरवायास दुसरी युक्ति नाहीं."†

---

† उपदेशचंद्रिका ( पु. १ अ. १ ) प्रस्तावना.

स्वदेशामध्ये उपयुक्त ज्ञानाचा प्रसार करण्यासाठीं इ. स. १८४८ त स्थापन झालेल्या ‘ उपयुक्त ज्ञानप्रसारक सभे ’-ची माहिती ‘ सामान्य निरूपण ’ या प्रकरणांत आलेली आहेच. या सभेच्या विद्यमानें इ. स. १८५० पासून ‘ मराठी ज्ञानप्रसारक ’ मासिक प्रसिद्ध होऊं लागलें. या लहानशा पुस्तकात मराठी ज्ञानप्रसारक सभेमध्ये जी व्याख्यानें होत आणि जे निबंध वाचले जात त्याचा संग्रह करण्यांत येई. मालापूर्वकालीन मराठी गद्यवाङ्मयाच्या विकासाला ह्या मासिकाने पुष्कळच हातभार लाविला आहे. ह्यातील बरेचसे लेख एल्फिन्स्टन विद्यालयातील होतकरू विद्यार्थ्यांनी अभ्यास-पूर्वक लिहिलेले असत. त्याची भाषा शुद्ध व सोपी असे. निबंध, गोष्टी, संवाद, इतिहास, चरित्रे, वर्णनें इत्यादि सर्व प्रकारच्या लिखाणाला या मासिकात वाव मिळे. अशा उपयुक्त व मनोरंजक लेखाच्या द्वारें ज्ञानप्रसार-कानें सतरा वर्षेपर्यंत मराठी भाषेची उत्कृष्ट सेवा बजाविली. या मासिकाच्या पहिल्या पुस्तकांत ‘ एकीपासून लाभ, ’ ‘ भरती आणि ओहोटी याविषयीं निबंध, ’ ‘ मराठ्यांच्या राज्याचा उत्कर्ष आणि अपकर्ष, ’ ‘ विद्योद्भवलाभ ’ इत्यादि लेख प्रसिद्ध झाले होते. याच पुस्तकातील सखाराम दीक्षित मनोहर याचा ‘ हिंदुस्थानाची प्राचीन स्थिति,सांप्रतची स्थिति आणि या देशाचा पुढे होणारा परिणाम ’ हा लेख फारच सरस उतरला आहे. या मासिकांतून बेंजामिन फ्रांकलीन, जॉन हॉवर्ड, ग्रीस देशातील सप्तज्ञानी, महंमद, शिवाजी महाराज, अहल्याबाई इत्यादि अनेक थोर व्यक्तींचीं चरित्रें लिहिण्यांत आलीं. याशिवाय स्थलवर्णन, प्रवासवर्णन, लोकस्थिति आणि इतिहास यासंबधींहि ह्या मासिकांत बरेच लेख प्रसिद्ध झाले होते. विष्णु धनःशाम, महादेव गोविंद-शास्त्री, भास्कर दामोदर पाळंदे, गोविंद नारायण माडगांवकर, परशुराम

**मराठी ज्ञानप्रसारक**
**( इ. स. १८५०. )**

विष्णु योगी, बाळभास्कर शिंत्रे, नारायण विष्णु बापट, केरो लक्ष्मण छत्रे, केशव जनार्दन पुनाळेकर, विनायक जनार्दन कीर्तने इत्यादि अनेक उदयोन्मुख लेखकानीं या मासिकाच्या आश्रयानेंच लिहिण्याची कला साध्य करून घेतली. विष्णु घनःशाम यांनी ' नेत्र, ' 'कालाची शीघ्रगति, ' ' भूताविषर्या निबंध, ' ' कालक्रमणाचे नियम ' इत्यादि लेख लिहिले. केरोपंत छत्रे यांचे ' हवाप्रकरण ' याच मासिकांतून क्रमशः प्रसिद्ध झालें. ' विक्रमोर्वशीय, ' ' व्यवहारोपयोगी नाटक ' आणि ' रात्रिभ्रम ' हीं तीन नाटकें या मासिकांत छापली गेली. याशिवाय निरनिराळया विषयांवर अनेक उपयुक्त आणि वाचनीय लेख ' मराठी ज्ञानप्रसारकां ' त प्रसिद्ध झाले. या मासिकांच्या पहिल्या पुस्तकांतील सखाराम दीक्षित मनोहर यांच्या लेखांमधील एक उतारा येथें उद्धृत करितो.

" राज्य गेले; द्रव्य गेलें;प्रतिष्ठा गेली;व्यापार बुडाला;प्राचीन विद्येचा ऱ्हास झाला; नुतन विद्या शिकण्यास उत्तेजन नाहींसे झाले; अज्ञान वाढत चालले; आकाशांतून पडलो आणि धरणीनें सांवरलें अशी अवस्था झाली; जी शहरें पूर्वी केवळ इंद्रभुवनांसारिखीं शोभायमान व लंकेसारिखीं कनकमय होतीं, तीं रसातळास पोंचून तेथे केवळ पिशाचपुरी बसल्याशा दिसूं लागल्या, ज्या शिवारांमध्ये शेतकऱ्यांचे थवेचे थवे मोठ्या उमेदिने खपत असत, तेथे आता कबेरइतकें तृण वाढून त्यात गरीबदुबळे लोक मोठया कष्टानें कोरभर भाकरीकरितां मजुरी करितात, तथापि तीही मिळत नाही, जा शहराच्या रस्त्यामधून अमीर उमराव लोकाच्या स्वाऱ्या हमेशा जात असत, त्यांमधून तैलंग व इतर भिकाऱ्यांच्या झुंडी तांदळाच्या चार दाण्याकरितां दारोदार फिरताहेत; व अंधळेपांगळे हे रस्त्यात गडबडा लोळून करुणास्वर

काढिताहेत; जा लोकांस मद्यपान हे केवळ विषतुल्य व मोठें पातक असें वाटत होते, तेच लोक आता दारूच्या अमलानें लुंड होऊन रस्त्यात पडतात यावरून व्यसनी लोकाच्या मनातून ईश्वराचे भय अगदी नाहींसे झाले असे दिसून आले; उदरनिर्वाहार्थ किंवा यथेच्छ सुख भोगण्याच्या हेतुनें स्त्रिया स्वतंत्र व निर्भिड होऊन रस्तोरस्तीं व्यभिचार केवळ मूर्तिमंत दृष्टीस पडू लागला, जामध्यें पूर्वी मोठमोठे लष्करी कारखाने होते, अशा इमारती अथवा जीं उमराव लोकाचीं विश्रांतिस्थानें; त्याचे आता तुरुंग होऊन ती खुनी व व्यसनी लोकांनीं भरून गेली; वीतभर कागदाची किंमत हजारों रुपयेपर्यंत चढली असतां तसल्या कागदांस पैसा भरून आपल्या इष्टमित्रांचीं घरें बुडविण्याची इच्छा वाढत चालली आणि इतके अनर्थ धडधडीत होत असून माझे स्वदेशी लोक अज्ञानरूप गाढ निद्रेंतून जागृत होऊन ज्ञानप्रभेमध्ये अद्यापि येत नाहीत. असे नाना प्रकारचे खेदकारक विचार एकामागून एक मनात आल्यामुळे चित्त व्यग्र होतें परंतु महाप्रतापी विद्वान् असे जे लोक पूर्वी कधीं आपल्या पाहण्यात किंवा ऐकण्यांतही आले नसते, त्यांचा प्रत्यक्ष सहवास घडूं लागला; अद्वितीय राज्यनियमांचीं पुस्तकें सिद्ध होऊं लागलीं; न्यायमनसुबीच्या उत्तम रीति, राज्याचे बंदोबस्ताच्या व फौजेचे कवांयतीच्या शिस्ती नजरेस पडूं लागल्या, टांकसाळ, गोदी यांतील वाफयंत्रासारिखीं अपूर्व व महदुपयोगी यंत्रें, वाफेच्या गाड्या व जहाजें, घड्याळे व नानातऱ्हेचीं वस्त्रें इत्यादिक अलौकिक चमत्कार, जे पूर्वी कधीं ऐकलेही नवते, ते आतां नेहमी नजरेखालून जाऊं लागले. मोठे उपयोगी व केवळ दुर्लभ अशा ग्रंथांचे संग्रह पाहून त्यांच्याठायीं चित्त रमूं लागलें; छापखान्याच्या योगें बरींच वर्तमानपत्रें ( तीं बहुधा परभाषेंतलीं ) वाचावयास मिळूं लागलीं प्रजेचीं दुःखें प्रसिद्ध होण्यास तेंच यंत्रसाधन झालें; आणि त्याच

> अमूल्य यंत्राच्यायोगे सर्वनाशक रूढींचे व स्त्रियाच्या असाह्य दु:खाचे उद्गार निघूं लागले. धर्मसबंधी असत्य विचार प्रगट होऊं लागले, थोड्याबहुत शाळा झाल्या; याच्यायोगे देशाची स्थिति व विद्या म्हणून काय या गोष्टी समजूं लागल्या, स्वच्छ व निर्भय रस्ते झाले; मोठमोठ्या प्रचंड तारवांनी समुद्र आच्छादित झाला इत्यादिक आनंदजनक चमत्कार पाहून मात्र मनास विस्मय होतो. तस्मात् असे परस्परविरुद्ध विचार अंतकरणात येतात यामुळे मति कुंठित होऊन भगवंताची करणी अतर्क्य होय, हा निश्चय होतो आणि भगवच्चरणास जो विन्मुख झाला त्यास कृत्यकर्माचा पश्चाताप व्हावा, व त्याणें सर्व अहंकार सोडून या जगामध्ये मी म्हणजे काय पदार्थ; हे ध्यानांत ठेवावे, अशी विश्वाची व्यवस्था आणि संरक्षण करणारा जो प्रभु त्याची इच्छा असाही तर्क होतो. "†

**त्रैमासिक ज्ञानदर्शन (इ. स १८५४.)**

बाळशास्त्री जांभेकर याचे वृत्तपत्रव्यवसायातील सहकारी भाऊ महाजन यांना इ. स. १८५४ त 'ज्ञानदर्शन' या नियतकालिकाच्या पहिल्याच अंकात त्यांनी आपला उद्देश खालीलप्रमाणे नमूद केला आहे. " मराठी भाषेत विद्यांच्या विषयावर व त्यांत विशेषेकरून पश्चिम देशांतील विद्यांच्या विषयांवर फारच थोडे ग्रंथ आहेत व कित्येक विषयांवर तर अजून मुळींच जाहाले नाहींत; तेव्हां अशा विषयांची लोकास माहितगारी होण्याकरितां काही तरी साधन उपस्थित केलें असतां त्यापासून उपयोग पडेल असे मनात आणून, हें त्रैमासिक पुस्तक काढण्याची योजना केली आहे" हे त्रैमासिक तीन वर्षेंपर्यंत चालले आणि त्यात 'युरोप खंडाचा अर्वाचीन

† मराठी ज्ञानप्रसारक (पु. १ अं. ४) पृ० ११३–१५

इतिहास, ' ' न्यायशास्त्र, ' ' नीतिशास्त्र, ' संपत्तिशास्त्र, ' ' मानसशास्त्र, ' ' भूगर्भशास्त्र ' इत्यादि विषयांवर विस्तृत आणि विद्वत्ताप्रचुर लेख प्रसिद्ध झाले. त्यांपैकीं ' मानसशास्त्र ' या लेखातील एक लहानसा उतारा येथे सादर करितों.

" इंद्रियजन्यज्ञान आणि मानस व्यापारानुचिंतन यांजपासून आपणाला होणाऱ्या बहुतेक सर्व भानांशी संतोष किंवा असंतोष यांतून कोणा एकाचा तरी योग असतो; आणि जेणेकरून आपणाला सुख किंवा दुःख होत नाहीं असा एकही आपल्या मनाचा विचार किंवा बाह्य पदार्थांपासून जाहालेला इंद्रियविकार आपणास आढळणार नाहीं. जे काहीं आपणांस संतुष्ट किंवा असंतुष्ट करितें त्यास सुख आणि दुःख असे म्हणावें. मग हें सुख आणि दुःख आपल्या मनाच्या विचारापासून उत्पन्न जाहालेलें असो किंवा आपल्या शरिरावर काहीं पदार्थाची क्रिया घडून त्याजपासून उत्पन्न जाहालेलें असो. समाधान, संतोष, आनंद आणि सुख किंवा असमाधान असंतोष, कष्ट, विपत्ति आणि दुःख हे एकाच वस्तूचे निरनिराळे प्रकार आहेत, व ते सर्व सुख आणि दुःख याच्या भानासंबंधीं आहेत. "†

**पुणें पाठशाळा पत्रक (इ. स. १८६१)**

मराठी ज्ञानप्रसारकाप्रमाणेच पुणे–पाठशाळा–पत्रकानेहि मालापूर्वकालीन गद्यवाङ्मयांत बहुमोल भर घातली. हे मासिक इ. स. १८६१ त निघालें. याचे पहिले संपादक श्रीकृष्णशास्त्री तळेकर हे होते. सुरवातीचीं तीनचार वर्षें यांमध्ये मुख्यतः शिक्षणविषयक लेखच जास्त येत. ऑगस्ट १८६३ पासून केरो लक्ष्मण छत्रे हे शालापत्रकाचे काम पाहूं

† त्रैमासिक ज्ञानदर्शन ( पु. २ अ. १ ) पृ. १

लागले. केरोपंत छत्रे, कृष्णशास्त्री चिपळूणकर, विष्णुशास्त्री चिपळूणकर यांच्यासारखे रसज्ञ व मार्मिक संपादक लाभल्यामुळें या मासिकाची उत्तरोत्तर प्रगतीच होत गेली असली, तर त्यांत काहीं नवल नाहीं. कृष्णशास्त्री यांचे मराठी व्याकरणावरील निबंध, नवीन पुस्तकांची परीक्षणे, रासेलसचें भाषांतर इत्यादि बरेंच लिखाण या मासिकांतून क्रमशः प्रसिद्ध झालें. 'जयपाळ,' 'थोरले माधवराव पेशवे यांजवर नाटक,' 'घाशीराम कोतवाल,' 'चंद्रकांत,' 'विलक्षण न्यायचातुर्य,' 'अवलिया अथवा मानी स्वभावाचा दारुण परिणाम,' नौकानयनाचा इतिहास इत्यादि पुस्तकांवर नियतकालिकांत अभिप्राय आले होते. याशिवाय 'लघुरसायनशास्त्र,' 'वाचनाविषयीं,' 'कवितेविषयीं,' 'मराठी भाषेविषयीं निबंध,' 'इंग्रजांचें सर्वांशीं अनुकरण करणें अयोग्य होय' इत्यादि लहान लहान पण मार्मिक व मुद्देसूद निबंध या मासिकांत छापले गेले.

**विविधज्ञानविस्तार [इ. स. १८६७]**

इ. स. १८६७ त विविधज्ञानविस्तार मासिकाचा जन्म झाला. ह्या नवबालकाच्या आगमनानें मराठी नियतकालिकसृष्टींत विलक्षण स्थित्यंतर घडून आलें. मराठी मासिकें हळूहळू स्वतंत्र व स्वावलंबी होण्याच्या मार्गाला लागली. ह्या मासिकाच्या पहिल्या व अंकांतील उपोद्घातांत संपादकांनी आपली मनीषा खालीलप्रमाणें व्यक्त केली आहे.

"याच्या परिमाणानुसार यांत नानाविध विषयांचा संग्रह केला जाईल. शास्त्रीय विषय; स्त्रियांच्या उपयोगास्तव, मनोरंजक असून सन्मार्गवर्ती अशा गोष्टी; रूपकें; कविता, विद्यार्थ्यांच्या उपयोगास्तव अन्य भाषेंतून घेतलेलीं भाषांतरें, इतिहास, देशज्ञान, विख्यांत पुरुषांचीं आजन्म चरित्रें, शरीरसंपत्ति रक्षणार्थ उत्तम

वैद्यकाच्या आधारें घेतलेले नियम, नवीन जाहलेल्या पुस्तकाचें गुणावगुणविवेचन, नित्य व्यवहारसंबंधीं नीतिवादाचे निबंध इत्यादि अनेक विषयांचा संग्रह करणार आहों आणि राजे व रंक पुरुष व स्त्रिया, लहान व थोर, यांतून कोणाच्याही हातीं हें पुस्तक लागलें असतां, तें आपल्या संग्रहीं असावें, अशी पूज्य बुद्धि त्यांच्या ठायीं उत्पन्न करण्याचा निश्चय केला आहे. "

त्यावेळच्या अनेक प्रसिद्ध विद्वानांचें या मासिकाला पूर्ण पाठबळ मिळाल्यामुळे त्यानें मराठी मासिकांना प्रौढ व भारदस्त स्वरूप प्राप्त करून दिलें. या मासिकात अर्थशास्त्र, आरोग्यशास्त्र, भाषाशास्त्र, काव्यचिकित्सा, साहित्य-समीक्षा, इतिहास इत्यादि विषयांवर माहितीपूर्ण लेख येत असत. "त्याची भाषा शुद्ध व प्रौढ असून त्यांतील विषयहि महत्त्वाचे असतात. तारखेच्या तारखेस अंक काढून वर्गणीदारांच्या ठपक्यांतून सुटावें एवढीच इच्छा न धरतां हातीं घेतलेल्या कामाचा बोजा त्यास चांगलासा कळतोसें स्पष्ट दिसतें. त्यांतील लेखावरून लिहिणारांचा देशाभिमान, निर्भीडपणा, निर्मत्सरता, गुणग्राहित्व वगैरे उत्कृष्ट गुण सर्व व्यक्त होतात. "* असा या मासिकाविषयीं विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनीं आपला अभिप्राय व्यक्त केला आहे.

ता. १० ऑक्टोबर १८७१ पासून ' दंभहारक ' मासिक निघूं लागलें. संपादकांनीं आपला मुख्य उद्देश खालील वाक्यात निवेदन केला आहे. " दर महिन्यास एकदां सर्वांच्या भेटीस आम्ही येणार आहों. आम्ही येतेवेळीं सर्वांस विश्रांति देण्यास्तव आमच्या सामर्थ्यानुसार नानाविध विषय आणीत जाऊं.

**दंभहारक**
[ इ. स. १८७१ ]

* निबंधमाला —' मराठी भाषेची सांप्रतची स्थिति '

. २२

धर्म, नीति, व्यवहार यांविषयीं निबंध, मनोरंजक असून सन्मार्गदर्शक अशी कविता, गोष्टी, रूपकें इत्यादि अनेक विषय, ज्यांच्यायोगें श्रीमंत, गरीब, विद्वान, अविद्वान, पुरुष, स्त्रिया, यांतून कोणासही आमच्या सहवासाची इच्छा व्हावी......पण माझ्या बाळकाच्या नांवाप्रमाणें दुर्व्यसन व दुराचरण निषेधार्थ एकादे वेळेस निस्पृह भाषणाचा त्याला प्रसंग आल्यास सज्जन विद्वानानीं क्षमा करावी. "

या मासिकात 'परागंदा झालेल्या गृहस्थाची कन्या, ' 'स्त्रियांची स्वाभाविक भूषणें, ' ' सृष्टिचमत्कार, ' ' एतद्देशीय भाषांचें इंग्लिश लोकांचें 'ज्ञान, 'धर्म' 'क्रियेवाचून ज्ञान पंगु' इत्यादि लेख प्रसिद्ध झाले होते. त्यांपैकीं ' गृहधर्म ' यांतील एक लहानसा उतारा खालीं देत आहे.

> " आत्मविषयक कर्तव्य कर्माचे विवरण केलें आतां दुसऱ्याशीं कसें वागावें त्याविषयीं विवरण करितों. घड्याळाचें प्रत्येक चक्र पृथक् असून जसीं परस्परांशीं सुदृढ जोडिलीं असतात, तसें प्रत्येक मनुष्य स्वतंत्र असूनही अनेक प्रकारच्या संबंधाने परस्पर जोडलेलीं आहेत. मोठी धामधूम चाललेला व मनष्यांनी भरलेला जनसमूह, हे एक नियमसपन्न मनोहर यंत्रच होय. त्या यत्राचे प्रत्येक मनुष्य हें एक एक चाक आहे. तरी असीं मानवरूपी सर्व चक्रें परस्पर संयुक्त होऊन जे कार्य होत, ते वेगळेपणानें कधी व्हावयाचें नाहीं."†

**ज्ञानसंग्रह**
**[इ. स. १८७२]**

इ. स. १८७२ पासून अकोलें येथें ' ज्ञानसंग्रह' मासिक प्रसिद्ध होऊं लागलें. यांत महाजनी प्रभृति विद्वान लोकांचे लेख येत असत. बोधपर निबंध, शास्त्रीय विवेचन, मनोरंजक गोष्टी, शिक्षणाविषयक लेख, ग्रंथपरीक्षण, नाटकें, चरित्रें,

† दंभहारक ( पु. १ अं. ८ ) पृ. १४२

देशदर्पणें इत्यादिकांचा ह्या मासिकांत समावेश होत असे. यांत मत्सर, परोपकार, मैत्री, वेळेचे मूल्य, उद्योग आणि दृढनिश्चय इत्यादि विषयांवर निबंध आले होते; तसेंच मोहना आणि विक्रमोर्वशी हीं नाटकेंहि प्रसिद्ध झाली होती.

इ. स. १८५४ त 'चंद्रिका' या नावाचें मासिक निघालें. पहिल्या वर्षी यात 'सर विलियम जोन्स याचें चरित्र,' 'शिक्षणपद्धतीविषयीं विचार,' 'गोऱ्या लोकांचा काळेरंगा,' 'राजसत्ताक व लोकमतानुसारी राज्यांतील सौकर्याविषयीं विचार,' 'निरिच्छतेविषयीं निबंध' इत्यादि लेख आले होते. बॉम्बे ट्रॅक्ट आणि बुक सोसायटीच्या विद्यमाने इ. स. १८६१ पासून 'सत्यदीपिका' हें मासिक प्रसिद्ध होऊं लागले. यांत ख्रिस्ती धर्मग्रंथ व मिशनरी लोकांच्या हालचाली यांची माहिती येत असे.

**चंद्रिका [इ. स. १८५४]**

**सत्यदीपिका [इ. स. १८६१]**

रावजी केशवराव सावारे यांनीं इंग्रजी भाषेंतील ज्ञानकोशाच्या धर्तीवर इ. स. १८६८ त 'विद्याकल्पतरू' (Marathi cyclopeadia) हे मासिक सुरू केलें होतें. लक्ष्मण शंकर अभ्यंकर यांनीं इ. स. १८७० त 'स्त्रीज्ञानप्रदीप' या नांवाचें मासिक काढिलें. यापूर्वी स्त्रीशिक्षणाच्या विषयाला वाहिलेलीं 'सुमित्र' आणि 'स्त्रीभूषण' हीं दोन मासिकें मराठींत निघालीं होतीं.

**विद्याकल्पतरू [इ. स. १८६८]**

**स्त्रीज्ञानप्रदीप [इ. स. १८७०]**

याशिवाय 'ज्ञानदर्पण,' 'ज्ञानाकर,' 'गायनाब्धि सेतु,' 'न्यायदीपिका' इत्यादि अनेक मासिकें या काळीं प्रसिद्ध होऊं

लागली होती. "विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनी महाराष्ट्रात स्वत्व आणि स्वाभिमान जागृत करण्यासाठी इ. स. १८७४ साली निबंध-माला सुरू केली आणि त्याबरोबर नियतकालिकांच्याच नव्हे, तर अखिल मराठी वाङ्मयाच्या इतिहासांतील नवीन युगाला प्रारंभ झाला.

२

## वर्तमानपत्रें

दर्पण
[इ.स. १८३२]

मराठी भाषेतील पहिलें वृत्तपत्र 'दर्पण' हें होय. हें इ. स. १८३२ त निघालें. "त्यावेळेस मुबईत मराठी व इंग्रजी भाषेत नेटिव्ह लोकांनीं चालविलेलें असे एकहि वर्तमानपत्र नव्हते. तेव्हां एक दोन पैकेवाले गृहस्थ मिळून दर्पण या नांवाचें मराठींत व इंग्रजींत वर्तमानपत्र काढण्याचें योजिलें व त्याचे बाळशास्त्री यांस एडिटर नेमिले. शास्त्रीबोवानीं तें काम मोठ्या मनोत्साहानें कांहीं दरमहा न घेतां पत्करिलें. त्या वर्तमानपत्रानें त्यांची मोठी कीर्ति वाढविली व त्या वेळचे गव्हर्नर सर जेम्स कार्नाक यांहीं त्याच्या लिहिण्यावरून खूष होऊन त्यास 'जस्टिस ऑफ धी पीस' ही पदवी दिली." †

प्रभाकर
[इ. स १८४०]

यानंतर गोविंद विठ्ठल उर्फ भाऊ महाजन यांनीं इ. स. १८४० च्या सुमारास 'प्रभाकर' पत्र काढिलें. हें दर रविवारीं निघत असे व वार्षिक वर्गणी १२ रु. होती. रयतेच्या 'अडचणी' व 'गाऱ्हाणीं' स्पष्टपणें सरकारच्या नजरेस

† दादोबा पांडुरंग—आत्मचरित्र पृ. २२

आणण्याचें धोरण या पत्राने स्वीकारले होतें व तदनुसार 'वेठबिगार,'- 'युरोपियन अधिकाऱ्याचा अरेरावीपणा व बेफिकीर वृत्ति' इत्यादि गोष्टी संबंधींचे लेख या पत्रांत प्रसिद्ध झाले होते. याशिवाय 'ग्रेटब्रिटन देशाची राजनीति,' 'विधवाविवाह,' 'स्त्रीशिक्षण,' 'इंग्रजी राज्यामुळें झालेले तोटे' (सवाद), 'ताबुताची चाल' इत्यादि लेख ह्या साप्ताहिकांत आले होते.

भाऊ महाजन यांचा जन्म पेण येथे इ. स. १८१५ सालीं झाला.

**भाऊ महाजन**
(इ. स. १८१५–१८९०)

मराठी गद्यवाङ्मयाचे जनक सदाशिव काशिनाथ छत्रे यांचे हे मेहुणे. आठ वर्षांचे असताना ते विद्यार्जनासाठीं मुंबईस आले. त्यांनीं इंग्रजी, मराठी, संस्कृत फारशी इत्यादि अनेक भाषांचे सूक्ष्म व सखोल अध्ययन केलें होतें. 'दर्पण' पत्र चालविण्याच्या कामीं बाळशास्त्री जांभेकर यांना त्यांचें पुष्कळ साहाय्य मिळालें. त्यांनीं 'प्रभाकर' व 'धूमकेतू' हीं पत्रे सुरू केलीं होतीं. त्यांप्रमाणेच इ.स.१८५४ त त्यांनीं 'ज्ञानदर्शन'या नावाचें त्रैमासिकहि काढिलें होते. त्यांचे 'शद्बसिद्धि निबंध' हे पुस्तक इ. स. १८४३ त प्रसिद्ध झालें. त्यांचा स्वभाव निस्पृह होता. त्यांचे लेख स्पष्ट व सडेतोडपणें लिहिलेले असत. परधार्जिणेपणाचा त्यांना मनापासून तिटकारा असे.त्यांच्या मानी स्वभावामुळेंच या परतंत्र देशात त्यांच्या विद्वत्तेचे व अलौकिक गुणाचे चीज होऊं शकलें नाहीं. त्यांच्या 'प्रभाकर' पत्रांतील एक उतारा खाली देत आहे.

> " मनुष्य जात ही सर्व सृष्टीत मुख्य आहे, व ज्ञानेकरून इतर सर्व पशुपक्ष्यादिक प्राण्यांवर तिची सत्ता राहिली आहे. इतर पशुप्राण्यादि प्राण्यांत सर्वांचा कोणी संरक्षक, किंवा राजासारखा सत्ताधारी कोणी नाहीं, सर्व जनावरें आपआपल्ये मजेस येतें

त्याप्रमाणे वागतात परंतु मनुष्यजातीची तशी गोष्ट नाहीं. मनुष्य जातीनें आपले बुद्धिबलकरून अ . पाहिले कीं इतर प्राण्यांप्रमाणें केवळ स्वतंत्र वागावें यापासून फार तोटा आहे, व अगदी स्वतंत्रताही इतर प्राण्यांस जरीं नीट आहे तथापि ती मनुष्य जातीस योग्य नाहीं. तेव्हां कांहीं नियम करून मनुष्य जातीस प्रतिबंध केला असतां त्यापासून अनंत फायदे होऊन सर्वांस सौख्य होईल. यास दृष्टांत जर मनुष्यांस अगदीं स्वतंत्रता दिली तर एकानें दुसऱ्यास ठार मारलें तर त्यास शासन कांहींच होणार नाहीं, व हरएक मनुष्यानें आपले मर्जीस येईल त्याप्रमाणें चालावें असें केलें असतां जो शरीरेंकरून सुदृढ असेल तो सर्वकाळ अशक्तास मारील व सर्वत्र झोटिंगपाछाई होऊन कोणा एकासही सौख्य होणार नाहीं. तस्मात् मनुष्य जातीचे स्वतंत्रतेस कांहीं तरी प्रतिबंध करणे अवश्य आहे तेव्हां पुढे अशी अडचण प्राप्त होती कीं हे असे नियम कोणी करावे व त्या नियमाप्रमाणे सर्व लोक चालत आहेत कीं नाहीं याची चौकशी कोणी करावी ते सर्व लोकांचे हितार्थ ठरविलेले नियम उल्लंघन करील त्यास कोणी शिक्षा करावी. या सर्व गोष्टींचा निर्णय जा रितीनें हरएक मुलखांत जाहला असतो त्याप्रमाणें तेथील राज्यनीति भिन्नभिन्न प्रकारची होती, व हा सर्व अधिकार मग तो एके पुरुषास दिला असो किंवा बहुतांस दिला असो त्यास ‘ प्रभुसत्ता’ असे म्हणतात. ” *

**ज्ञानोदय**
**( इ. स. १८४२ )**

आजतागायत चालू असलेलें मराठी भाषेंतील सर्वांत जुनें पाक्षिक ‘ ज्ञानोदय ’ ( इ. स. १८४२ ) हें होय. “ हे पत्र रेव्ह. आर. डब्ल्यू. ह्यूम साहेब उत्तम प्रकारे चालवीत असत; हे गृहस्थ विद्वान असून हिंदु लोकांचे खरे मित्र होते. यांनीं त्यांच्या कल्याणार्थ अनेक

* प्रभाकर— २७ मार्च १८४२.

उद्योग व बहुत श्रम केले. " * यांत विविध विषयांवरील स्वतंत्र व भाषांतरात्मक लेख प्रसिद्ध होत असत. खिस्ती धर्माचा प्रसार करणें हें या पत्राचें मुख्य धोरण होतं. ह्या पत्राच्या पांचव्या पुस्तकांत 'कलकत्ता शहर-शहराचें वर्णन,' 'खिस्ती मंडळीची खबर,' 'चीन देशांतील भाषा व पुस्तकें,' 'पुनर्विवाह,' 'ब्राह्मणांची दुर्दशा,' 'मधमाशी आणि गांधील माशी,' 'लग्नासंबंधीं हिंदु लोकांचे मूर्खपण, 'सौम्यता' इत्यादि लेख आढळतात. त्यांपैकीं 'बाळ गंगाधरशास्त्री यांचें वर्णन' या लेखातील एक उतारा खालीं देत आहे.

"बाळगंगाधरशास्त्री मोठा विद्वान होता आणि त्यास साहेब लोक व नेटिव लोकांही मानीत होते. महाराष्ट्रांतील सर्व नेटिव लोकांपेक्षां ता शिकलेला होता व आपल्या लोकांमध्ये विद्या वाढवावी असी त्याची इच्छा होती. त्यानें आपल्या चांगल्या वर्तणुकीच्या योगाने व प्रोफेसरचें काम चांगलें चालविल्याने कित्येक विद्यार्थी बरे सुधारले. त्यांतील कित्येकानी विद्येची मोठी आवड धरून त्यांसारखेंच विद्या वाढविण्याविषयीं उत्कंठित व्हावे अशी आमची इच्छा आहे.

बाळ गंगाधर शास्त्री ऐन उमेदीमध्ये आणि पुढें कसे काय करायाचें या मसलती मनामध्यें करीत असतां मरण पावला. आणि याचप्रमाणे अतिशय मनुष्यांची गत आहे. लोक विद्या,द्रव्य,मान इत्यादि संपादन करायास फार उत्सुक असतात. परंतु ज्या परलोकीं आपले विशेष गुण व ऐहिक संपादलेलें एथच्यासारखें दिसणार नाहीं तेथें आम्ही लवकर जाणार हें मनांतहि आणीत नसतात. तर आपण लवकर जाणार असे समजून जे नेहमी ईश्वराची प्रार्थना करितात कीं मी आपले दिवस मोजीत राहावें

---

* बाबा पदमनजी—अरुणोदय पृ. ८७.

> व आपला जीव खऱ्या ज्ञानमार्गाकडे लावावा, त्यालाच ज्ञानी म्हणावें. जे द्रव्यवान, विद्वान, आणि सर्वमान्य ते मरणाला भीत नाहींत असें नाही आणि ते परलोकीं जाऊन सुख भोगितील असेहि नाहीं. परंतु जे पापाविषयीं मनःपूर्वक पश्चात्ताप करून ईश्वराच्या प्रीतीनें मन पूर्ण झाले तेच परलोकसंबंधींचे सुख भोगतील." †

**ज्ञानप्रकाश ( इ. स. १८४९ )**

इ. स. १८४९ साली पुणें येथें 'ज्ञानप्रकाश' या नावाचें साप्ताहिक पत्र सुरू झालें. कृष्णाजी त्र्यंबक रानडे हे त्या पत्राचे प्रकाशक होते. "या पत्रास प्रथम आश्रय रा. मोरो रघुनाथ दमढेरे व गोपाळराव हरी देशमुख यांचा होता. यांनीं मनःपूर्वक श्रम घेऊन हें काम चालविले. तें काम बरेच रेंगाळत चाललें होतें. कारण लोकांस वर्तमानपत्र वाचण्याची गोडी नव्हती व उपयोग काय हाही माहीत नव्हता. तरी त्यांच्या कर्त्यांनीं धैर्य सोडलें नाहीं. एकानें द्रव्यबळ व दुसऱ्यानें विद्याबळ खर्चून त्याला उत्तम स्थितीस आणलें." *

**विचारलहरी सद्धर्मदीपिका**

मिशनरी लोकांचा वाढत्या प्रचाराला आळा घालण्यासाठीं कृष्णशास्त्री चिपळूणकर यांनीं इ.स. १८५२ त 'विचार लहरी' पत्र सुरू केलें. त्यानंतर इ. स. १८५५ त बापू सदाशिव शेट यांनीं सद्धर्म मंडळीच्या आज्ञेवरून 'सद्धर्मदीपिका' या नांवाचें पाक्षिक काढिलें. तें दर एकादशीला प्रसिद्ध होत असे. "हिंदु लोकांस हिंदुधर्मतत्व कळावे व खिस्ती धर्मी जे पाद्री यांचे धर्माचा पोकळपणा त्यांच्या ध्यानांत आणून द्यावा" या उद्देशानें हें पत्र सुरू करण्यांत आलें.

---

† ज्ञानोदय ( पु. ५ ) पृ. १६५.

* ना. वि. जोशी—पुणें शहरचें वर्णन पृ. १२१

इ. स. १८६२ सालीं 'इंदुप्रकाश' पत्र सुरू झाले यांच्या सुरवातीच्या व्यवस्थापक मंडळांत लक्ष्मणशास्त्री हळवे, केशवशास्त्री गाडगीळ आणि महादेवशास्त्री कोल्हटकर यांची नावें आढळतात. न्यायमूर्ति रानडे, व जनार्दन सखाराम गाडगीळ हे या पत्रासाठीं लेख लिहीत. इ. स. १८६४ पासून विष्णुशास्त्री पंडित यांनीं ह्या पत्राचें संपादकत्व पतकरलें आणि त्याच्या द्वारें मराठी भाषेची व महाराष्ट्रीय जनतेची बहुमोल सेवा केली.

**इंदुप्रकाश ( इ. स. १८६२ )**

याशिवाय धूमकेतु, वर्तमानदीपिका, नेटिव्ह ओपीनियन, वृत्तवैभव, वृत्तप्रकाश इत्यादि अनेक वृत्त-पत्रें त्या काळीं प्रसिद्ध होत होतीं.

---

# परिशिष्ट

## १

## मासिकें

१ दिग्दर्शन—बाळशास्त्री जांभेकर, मुंबई, इ. स. १८३७.
२ ज्ञानचंद्रोदय—पांडुरंग बापू जोशी पावसकर,
मुंबई, इ. स. १८४०.
३ उपदेशचंद्रिका—मोरभट दांडेकर, मुंबई, इ. स. १८४४.
४ मराठी ज्ञानप्रसारक— मुंबई, इ. स. १८५०.
५ चंद्रिका— मुंबई, इ. स. १८५४.
६ त्रैमासिक ज्ञानदर्शन—भाऊ महाजन, मुंबई,
इ. स. १८५४.
७ सुमित्र—( स्त्रियांसाठीं ) मुंबई, इ. स. १८५५.
८ सर्वसंग्रह—माधव चंद्रोबा, मुंबई, इ. स. १८६०.
९ विचारदर्पण—( क्षात्रयांसाठीं ) मुंबई, इ. स. १८६०.
१० पुणे पाठशालापत्रक—श्रीकृष्णशास्त्री तळेकर,
पुणें, इ. स. १८६१.

११ आनंदलहरी–( लहान मुलांसाठीं )

मुंबई, इ. स. १८६१.

१२ कथाकल्पद्रुम–बापुजी मल्हार चिटणीस, मुंबई,

इ. स. १८६१.

१३ ज्ञानदर्पण– मुंबई, इ. स. १८६१.

१४ ज्ञानाकर– धारवाड, इ. स. १८६२.

१५ स्त्रीभूषण– मुंबई, इ. स. १८६४.

१६ विविधज्ञानविस्तार–रामचंद्र भिकाजी गुंजीकर,

मुंबई, इ. स. १८६७.

१७ विद्याकल्पतरु–रावजी केशवराव सांबारे, ठाणे,

इ. स. १८६८.

१८ ईस्ट इंडिया असोसिएशन सभेचें मराठी मासिक पुस्तक–

मुंबई, इ. स. १८६९.

१९ काव्यार्थदीपिका–वामन गोविंदशास्त्री इसलामपूरकर,

मुंबई, इ. स. १८७०.

२० स्त्रीज्ञानप्रदीप–लक्ष्मण शंकर अभ्यंकर, मुंबई,

इ. स. १८७०.

२१ गायनाब्धिसेतु–मौलाबक्ष बिनकार, विश्वनाथ रामचंद्र वकील, बडोदे, इ. स. १८७०.

२२ वऱ्हाड रिपोर्टर– अकोले, इ. स. १८७०.

२३ न्यायदीपिका–महादेव विनायक चौबळ, वामन रामचंद्र ओक, यशवंत महिपत खारकर, ठाणे,

इ. स. १८७०

२४ दंभहारक— मुंबई, इ. स. १८७१.
२५ ज्ञानसंग्रह— अकोले, इ. स. १८७२.
२६ बालबोधमेवा— मुंबई, इ. स. १८७३.
२७ सत्यदीपिका— पुणें, इ. स. १८७३.
२८ बृहत्संहिता—( वराहमिहिरकृत ) जनार्दन हरी आठल्ये, रत्नागिरी, इ. स. १८७३.
२९ श्रीवाल्मीकिरामकथामहोदय— मुंबई, इ. स. १८७४.
३० सुज्ञानामृत— कोल्हापूर, इ. स. १८७४.
३१ निबंधमाला—विष्णुशास्त्री चिपळूणकर, पुणें, इ. स. १८७४.

## २

## वृत्तपत्रें

१ दर्पण—बाळशास्त्री जांभेकर, मुंबई, इ. स. १८३२,
२ प्रभाकर—भाऊ महाजन, मुंबई, इ. स. १८४०.
३ ज्ञानोदय—( पाक्षिक ) मुंबई, इ. स. १८४२.
४ ज्ञानप्रकाश— पुणें, इ. स. १८४९.
५ विचारलहरी—कृष्णशास्त्री चिपळूणकर, पुणें, इ. स. १८५२.
६ वर्तमानदीपिका—भवानी विश्वनाथ कानविंदे, मुंबई, इ. स. १८५४
७ धूमकेतु—भाऊ महाजन, मुंबई,
८ सद्धर्मदीपिका—बापू सदाशिवशेट, मुंबई, इ. स. १८५५.

९ वर्तमानसंग्रह—विश्वनाथ कृष्णनाथ, कोल्हापूर,
इ. स. १८५५.(ग्रां.कॅ.)

१० शुभसूचक—रामचंद्र आपाजी चितळे, सातारा,
इ. स. १८५८ ( ग्रां. कॅ. )

११ वृत्तवैभव—खंडेराव बाळाजी, अहमदनगर,
इ. स. १८६१ (ग्रां. कॅ. )

१२ इंदुप्रकाश— मुंबई, इ. स. १८६२

१३ वृत्तप्रकाश—नारायण मोरेश्वर केळकर, पुणें,
इ. स. १८६२ ( ग्रां. कॅ. )

१४ नेटिव्ह ओपीनियन—विश्वनाथ नारायण मंडलीक,मुंबई,
इ. स. १८६३

१५ बेळगांव समाचार—भिकाजी हरि सावंत—बेळगाव,
इ. स. १८६४ ( ग्रां. कॅ. )

१६ जगद्धितेच्छु— पुणें, इ स. १८७०.

१७ ज्ञानचक्षु—गंगाधर गोविंद सापकर, पुणें, इ. स. १८७२.

१८ कथारत्नावलि— मुंबई, इ. स. १८७४.

१९ सुबोधपत्रिका— मुंबई, इ. स. १८७४.

---

# आधारभूत ग्रंथ व मासिकें यांची यादी


१ मराठी गद्याचा इंग्रजी अवतार—प्रो. द. वा. पोतदार

२ संक्षिप्त अर्वाचीन मराठी वाङ्मय ( चरित्र–खंड )–ग. रं. दंडवते

३ आजकालचा महाराष्ट्र—प्रभाकर पाध्ये, श्री. रा. टिकेकर

४ अर्वाचीन मराठी साहित्य–( सन १८७५–१९३५ )

५ मराठी भाषेची घटना–रा. भि. जोशी

६ महाराष्ट्रीय वाङ्मयसूचि—यं. रा. दाते, रा. त्र्यं. देशमुख

७ निबंधमाला—वि. कृ चिपळूणकर

८ आत्मचरित्र—दादोबा पांडुरंग

९ मौंट स्टुअर्ट एल्फिन्स्टन चरित्र–कृ. ब. गोडबोले

१० महाराष्ट्रीय नाटककार–शं. बा. मुजूमदार

११ तंजावरचे राजघराणें–द. ब. पारसनीस

१२ अरुणोदय–बाबा पदमनजी

१३ विष्णु परशुरामशास्त्री पंडित यांचे चरित्र–श्री. स. पंडित

१४ मराठी कथात्मक वाङ्मय–( वि. ज्ञा. वि. पु. ४३ अं. १–२ )
श्री. कृ. कोल्हटकर

१५ विविधज्ञानविस्तार

१६ बालबोध

१७ नवयुग—नोव्हेंबर सन १९१३, जानेवारी १९१४, फेब्रुआरी १९१४, जुलै, १९१४, जून १९१५

१८ लोकशिक्षण—जुलै–ऑगस्ट १९३६

१९ History of Serampore Mission Vol. I-II John Clark Marshman.

२० Memoir of William Carey-E. Carey

२१ The Life of William Carey-Mary. E. Farwell

२२ Memoir of Rev. Robert Nesbit-Rev J.Murray Mitchell

२३ Remarks on the Marathi Catalogue-M. G. Ranade

२४ The Growth of Marathi Literature M. G. Ranade

२५ Catalogue of Native Publications in the Bombay Presidency ( II Edition ) Sir A. Grant Bomb. 1867

२६ Catalogue of the Library of the India Office Vol. II (Part V) Marathi and Gujarti Books London 1908

२७ Catalogue of Marathi And Gujarati printed Books in the Library of the British Museum London 1892

२८ Oriental Christian Spectator

# संदर्भ–सूचि

## १

## व्यक्ति

† **दुरुस्ती**—पान २०० वरील पहिल्या ओळींतील "नाशिक येथील मिसेस फारार" या वाक्यांऐवजीं **"मुबई येथील मिसेस विल्सन"** असें वाचावें.

## संस्था